शारदाश्रम पुरस्कृत ग्रंथमाला-पुष्प १२ वें

# हिंदुस्थाना तूं कुठें ?



( हिंदुस्थानचें संरक्षण व राष्ट्रीय फौज या विषयावरील अभ्यासाचीं टिपणें. )

लेखक

डॉ. भास्कर महादेव टेंबे,

एल. आर. सी. पी. ॲन्ड एस. (एडिंब्रा).

सेविका, शिशुसंवर्धन, मातृपद, चाळिशी उलटल्यावर, विद्यार्थी आणि आरोग्य, आरोग्यशास्त्र, अन्न आणि शरीर वगैरे पुस्तकांचा कर्ता.
ऑ. सेक्रेटरी रायफल असोसिएशन, प्रेसिडेंट हिंदुस्थान स्काउट असोसिएशन यवतमाळ जिल्हा.
ऑ. सेक्रेटरी नारिंगी स्वस्तिक मंडळ वगैरे.







सन १९४०



किंमत १-८-० रु.

" कांहींएक करतां होतें । न करतां मागें पडतें ।
यास्तव असावधपण तें । असोंचि नये ॥ १ ॥

" जो दुसऱ्यावरी विश्वासला । तयाचा कार्यभाग बुडाला ।
जो स्वयेंचि कष्टत गेला । तोचि भला ॥ २ ॥

श्रीसमर्थ दासबोध



मुद्रकः– रा. रा. **विठ्ठल हरि बर्वे**, आर्यभूषण मुद्रणालय,
घ. नं. ९१५।१ पेठ भांबुर्डा, पुणें ४.
प्रकाशकः–**डॉ. भास्कर महादेव टेंबे**, यवतमाळ, ( वऱ्हाड ).

# समर्पण



विश्वविद्यालयीन कालांतील बंधुसमस्नेही डॉ. गोपाळराव देशमुख,
F. R. C. S., डॉ. ज. शं. निरूरकर B. Sc., D. P. H. ( मुंबई ),
डॉ. बाळासाहेब परांजपे, M. S. व बॅरिस्टर गोविंदराव देशमुख
( नागपूर ), तसेंच १९२० मधील विपत्प्रसंगीं पोटच्या मुला-
प्रमाणें धीर देऊन ज्यांनीं वऱ्हाडांत कार्यप्रारंभीं आशीर्वाद
देऊन उत्साह दिला ते तीं. स्व. सर अण्णासाहेब व तीं.
स्व. सौ. लेडी जोशी आणि यवतमाळमधील गेल्या
अठरा वर्षांत ज्यांनीं अत्यंत जिव्हाळ्यानें मला सख्ख्या
भावाप्रमाणें प्रेमळपणानें वागवलें ते श्री. अण्णासाहेब
जतकर, तात्यासाहेब हूड, आबासाहेब भेदी, हरी-
भाऊ दामले, नानासाहेब अभ्यंकर, शंकररावजी
सरनाईक, गणपतराव माळवी, सदाशिवराव
बल्लाळ, बाबासाहेब बापट, अमृतराव साकळे,
नानासाहेब ओक, डॉ. शिवाजीराव पट-
वर्धन, डॉ. भोजराज, दादासाहेब कोल्हे,
बॅ. रामरावजी देशमुख, ना. रा.
बामणगांवकर, तसेंच डॉ. ना. रा.
ठोसर व दाजीसाहेब बेदरकर
यांस "शारदाश्रम" मालेंतील
हें १२ वें पुष्प अत्यंत आद-
रानें व प्रेमानें अर्पण
करीत आहें. वरील
सर्व देशभक्तांचा
ऋणी व प्रेमी

यवतमाळ
दत्तजयंती शके १८६२

—भास्कर म. टेंबे

# लोकनायक माधव श्रीहरि ऊर्फ बापूजी अणे यांची प्रस्तावना

या अत्यंत उद्बोधक व महत्त्वाच्या ग्रंथाचे लेखक डॉ. काकासाहेब टेंबे म्हणजे उद्योगप्रियता, सच्छील, सौजन्य आणि राष्ट्रप्रेम यांची मूर्ति! दिवसांतील एक क्षण देखील वाया दवडावयाचा नाहीं, हा त्यांचा बाणा. ते एक नामांकित व कुशल डॉक्टर असल्यामुळें धंद्याच्या कामाची निकड त्यांचेमागें चोवीस तास सारखी लागलेली असते. त्यांतूनहि त्यांना जो वेळ वांचवितां येतो, त्याचा उपयोग अनेक सार्वजनिक कार्यांचा परामर्श, वाचन व लेखन यांत ते नियमानें करीत असतात. आजपर्यंत त्यांनीं पांच ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. शिशुसंवर्धन, मातृपद, विद्यार्थी आणि त्यांचें आरोग्य, चाळिशी उलटल्यावर आणि अन्न आणि शरीर या पांच विषयांवर त्यांनीं केलेली ग्रंथरचना तज्ज्ञांस पसंत पडली असून सामान्य लोकांस अत्यंत उपयुक्त अशी झाली आहे. त्यांचें लिहिणें जितकें शास्त्रसंमत असतें तितकेंच तें सुबोधहि असतें. यामुळें अपरिचित विषयहि सामान्य वाचकांस सहज आकलन करण्यास त्यांच्या पुस्तकांचें फार सहाय्य होतें. आतांपर्यंत केलेल्या ग्रंथरचनेचे विषय हे ते ज्या विषयांत पारङ्गत आहेत असा त्यांचा यथार्थ लौकिक आहे त्या विद्येला आनुषङ्गिक असेच होते. परंतु गेल्या कांहीं वर्षांत काकासाहेबांचें लक्ष जागतिक राजकारण व परिस्थिति यांच्या अभ्यासाकडे विशेष लागलेंसें दिसतें. त्याचप्रमाणें हिंदी माणसांतील मृतप्राय झालेली क्षात्रवृत्ति ही पुनश्च जागृत झाली पाहिजे याचीहि त्यांच्या मनास सारखी तळमळ लागून राहिली आहे. रायफल क्लबसारख्या संस्था स्थापन करणें व चालविणें व लष्करी शिक्षणाचें महत्त्व लोकांस पटवून देणें हें त्यांच्या सद्यःकालीं चालू असलेल्या उद्योगाचें प्रधान अंग आहे असें म्हटलें तरी चालेल.

"हिंदुस्थाना, तूं कुठें?" असा मार्मिक प्रश्न प्रत्येक हिंदवासीयानें आपले मनासच विचारावा अशी त्यांची प्रबळ इच्छा आहे. "हिंदुस्थानचें संरक्षण व राष्ट्रीय फौज" या महत्त्वाच्या प्रश्नाचा व्यापक दृष्टीनें अभ्यास करणाऱ्यांस

जगांतील सुधारलेल्या आक्रमक राष्ट्रांच्या उद्योगाचें विहङ्गम दृष्टीनें तरी निरीक्षण करणें अवश्य आहे. मनुष्यमात्र निवळ जगण्यांत समाधान मानीत नाहीं. एखादी व्यक्ति फार काळ म्हणजे शंभर वर्षें या मानीव मानवी आयुर्मर्यादेच्याहि पलीकडे पांच सहा वर्षें जगली असें समजलें तर ऐकणारास कौतुक वाटतें. पण तें केवळ क्षणिक असतें. उलट "काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुंक्ते" असलीं सुभाषितें सामान्य जनतेच्या अंतःकरणांत वृथाजीवित घालविणाऱ्या दीर्घायुषी ऐदी वृद्धांबद्दल वाटत असलेला तिरस्कार स्पष्टपणें प्रकट करीत असतात. "जिजीविषेम शत ॅ समाः" किंवा " जीवेम शरदः शतम् । मोदाम शरदः शतम् । प्रब्रवाम शरदः शतम् । अजिताः स्याम शरदः शतम् " इत्यादि श्रुतिमंत्रांतून ज्या दीर्घजीवित्वाची प्रशस्ति केली आहे, तें कर्तृत्वसंपन्न जीवित होय. किम्बहुना जिजिगीषे इतकीच विजीगिषाहि मनुष्यांत प्रबल असावयास पाहिजे, तरच मनुष्य आपल्या वैय्यक्तिक जीविताचें, त्याचप्रमाणें राष्ट्रीय व सांस्कृतिक जीवनाचें साफल्य करूं शकतो.

विजिगीषा म्हणजे पराक्रम करण्याची इच्छा ही जशी व्यक्तींत तशीच व्यक्तिसमूहानें बनलेल्या राष्ट्रांतहि असते, व ती आहे याचा अनुभव हिन्दुस्थानास दुर्दैवानें एक हजार वर्षांपासून तरी सारखा येत आहे. आजहि भारतवर्ष हा परतंत्र देश आहे. त्याला जगतांत सुधारलेल्या राष्ट्रांच्या पंक्तींत बसण्याची योग्यता नाहीं, या अपमानाचें शल्य ज्याच्या अन्तःकरणांत बोचत नाहीं असा भावनाशून्य कोण असूं शकेल ? परंतु या परावलंबी स्थितीचीं कारणें काय याचा तपास करण्याचा उद्योग करणारे मात्र त्यांत फारसे मिळावयाचे नाहींत. जे थोडेबहुत तपासाला निघतात त्यांना आपल्या अपकर्षांच्या, अवनतीच्या आणि अधःपाताच्या कारणांचा शोध लागला तरी त्यांच्या निराकरणार्थ उपाययोजना करण्याची यातायात करावयास, त्यांतून फारच थोडे लागूं शकतात; व अशा उद्योगांत सांपडलेल्यांत सुद्धां चार दोनच टिकून राहतात व अखेरी गांठूं शकतात.

डॉ. टेंबे यांनीं तरुणांच्या पुढें जगांतील पराक्रमी समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांतून मागील जागतिक युद्ध व प्रस्तुतचें युद्ध यांच्या दरम्यानच्या काळांत लष्करी, आरमारी व वैमानिक दलाची प्रगति करण्याचे बाबतींत कशी चुरशीची चढाओढ सुरू होती याचें चित्र ठेवण्याचा या ग्रंथांतून मोठ्या मेहनतीनें प्रयत्न

केला आहे, व अशा चढाओढीच्या मुळाशीं कोणत्या वृत्ति प्रबळ आहेत याचेंहि त्यांनीं यथावकाश वर्णन केलें आहे. जर्मनी व जपान यांसारखीं राष्ट्रें जी धडपड करीत आहेत त्याचें स्वरूप काय हें मराठी वाचकांस या पुस्तकावरून कळेल. इतर देशांतून जी लष्करी प्रगति झाली आहे व जिचा परिणाम जागतिक युद्धाच्या स्वरूपांत होणें हें अपरिहार्य होतें तें युद्ध उपस्थित झाल्यास हिन्दुस्थान हा आपला बचाव करण्यास किती असमर्थ आहे याचेंहि विवेचन या ग्रंथांत आलेलें आहे. त्यामुळेंच "हिंदुस्थाना, तूं कुठें ?" असा सवाल वाचकांच्या समोर आपोआप उभा राहतो. अशा आपत्तीच्या काळीं हिंदुस्थानला आपलें संरक्षण करतां येण्यासाठीं काय करावयास पाहिजे, व सरकारचे आज प्रत्यक्ष युद्ध सुरू असतां चालू असलेले प्रयत्न सर्वतोपरी उपेक्षणीय नसले तरी कसे अत्यन्त अपुरे पडतात याची कल्पना या पुस्तकाचे वाचनानें येईल.

ग्रंथकर्त्यांनें ग्रंथाचे शेवटच्या परिच्छेदांत "असा हिंदुस्थान, स्वतंत्र हिंदुस्थान, जगतांत मानानें राहूं इच्छील तर त्यास राष्ट्रीय फौज निर्माण केल्याशिवाय गति नाहीं" हा जो सिद्धान्त मांडला आहे तो सर्व सुज्ञ इतिहासज्ञ स्वातंत्र्यप्रेमी सद्गृहस्थांस संमत असाच आहे. सृष्टींतील नित्य व प्रत्यक्ष व्यवहार ज्या मार्गानें जात असलेला पहात असतो, तो समजून घेऊन जर हिंदुस्थानला आपल्या स्वातंत्र्याच्या उद्योगास लागावयाचें असेल तर हिंदुस्थानच्या संरक्षणाच्या प्रश्नाकडे व तत्संबंधीं कर्तव्याकडे उपेक्षा करून निभाव लागणार नाहीं हें निश्चित. डॉ. काकासाहेब टेंबे यांनीं परिश्रमपूर्वक हा ग्रंथ लिहून या महत्त्वाच्या प्रश्नाकडे मराठी वाचकांचें लक्ष वेधलें याबद्दल त्यांचे आभार मानून हा प्रस्तावलेख समाप्त करितों.

यवतमाळ, श. १८६२ विक्रम संवत्<br>मार्गशीर्ष, व॥ ४ थी, बुधवार<br>ता. १८ डिसेंबर, १९४०

माधव श्रीहरि अणे

# लेखकाची प्रस्तावना



स्वातंत्र्य ही एक मोठी जबाबदारी आहे, खेळ नव्हे. ज्याला स्वराज्य पाहिजे त्यानें स्वराष्ट्राच्या संरक्षणाची जबाबदारीही घ्यावयास पाहिजे व ही जबाबदारी घेण्याचें शिक्षण म्हणजे लष्करी शिक्षण त्यास असावयास पाहिजे. लष्करी शिक्षण स्वतंत्र देशांतील प्रत्येक नागरिक स्त्री–पुरुषांस मिळूं शकतें, परंतु या बाबतींत हिंदुस्थान देश परतंत्र असल्यामुळें स्वतंत्र राष्ट्रांप्रमाणें येथील नागरिकांसाठी तशी कांहींच सोय नाहीं. खर्चाच्या अडचणी पुढें येतात व या विषयास या सबबीवर आजपर्यंत मागें ढकललें गेलें. हिंदी लोक अनुपयोगामुळें संरक्षण बाबतींत पूर्णतया परावलंबी आहेत व हें कारण हिंदी लोकांच्या स्वातंत्र्यसंपादनाचे आड येतें. जगतांत नसलेले भेद हिंदी लोकांत दाखविण्यांत येतात व ते म्हणजे ( १ ) लढाऊ, व ( २ ) बिनलढाऊ. हीं कारणें खरीं आहेत कीं काय व हिंदुस्थानांत विशिष्ट भौगोलिक विभागांतच वीरता अंगीं जन्मतः असते कीं कसें, व हिंदुस्थानांतील लोक खरोखरीच जगतांत दास म्हणूनच राहण्यास योग्य आहेत, कीं त्याची सद्यःकालची परावलंबी परिस्थिति कांहीं राजकीय धोरणावर अवलंबित होती व अजून आहे, याचा निर्णय होण्यासाठीं म्हणून या विषयावर सांपडतील तीं साधनें उपलब्ध करून त्यांचा अभ्यास करीत असतां मधून मधून घेतलेलीं टिपणें मनोरंजक व बोधप्रद झालीं व त्यांचा व्यवस्थित संग्रह केल्यास त्याचा थोडाबहुत तरी उपयोग होईलसें वाटल्यावरून हा संग्रह या पुस्तकांत केला आहे याशिवाय या पुस्तकास अधिक किंमत नाहीं. लहानपणीं प्राथमिक शाळांतून ५० वर्षांपूर्वी अभ्यास करीत असतां त्यांत लहानशा ब्रिटिश फौजेनें असंख्य हिंदी शिपायांस जिंकलें, श्रीछत्रपति शिवाजी लुटारु होते वगैरे असत्य विधानें घोकीत असतांहि खरीं वाटत नसत, व पुढें मोठेपणीं हिंदवासी लोक राजकारणांत व संरक्षण विषयांत असमर्थ आहेत हें प्रतिपादन ऐकत असतां विषाद वाटे व स्वराज्य आपण मिळविलेंच पाहिजे हेंहि मनापासून वाटे, व त्याचा परिणाम म्हणजे कॉंग्रेसमधील कै. लोकमान्यांचें राजकारणाकडे लक्ष वेधून त्याची परिणति, वेळ पडेल तेव्हां परिस्थित्यनुरूप

कॉंग्रेसच्या सर्व पुढाऱ्यांच्या तात्त्विक बोलांचा अभ्यास व विचार करणें व शक्यनुरूप चळवळींत भाग घेणें, यांत झाली. हिंदुस्थानांतील लोकांस लष्करी शिक्षणापासून अलग केल्यानें आज ते संरक्षणक्षम नाहींत पण ते नेहमीं करतां तसे नसून कारणपरत्वें आहेत व त्यांस खरी ओळख पटल्यास बुद्धिभेदानें कांहींजणास वाटणारें दौर्बल्य नाहींसें होऊन ते मूळपदावर खास येतील या हेतूनें हें पुस्तक माहितीवरून लिहिलें आहे. यांतील माहिती लष्करी विषयांवरील तज्ञ लोकांच्या लिखाणांतील असून त्या सर्व ग्रंथकर्त्यांचीं नांवें ग्रंथ-कोशांत दिलीं आहेत. यांत स्वतःचे विचार फारच थोडे असून सर्व माहिती संकलित पद्धतीनें अशीच मांडली आहे. हिंदुस्थानच्या सुशिक्षित लोकांचें लक्ष, कांहीं थोडेसे पुढारी वगळल्यास, या महत्त्वाच्या विषयाकडे फारसें जात नाहीं तें जावें, व महाराष्ट्रांतील एकवेळ मर्दुमकी गाजवणाऱ्या पण गेल्या शेंदीडशें वर्षांत विशेषतः मागें पडलेल्या लोकांस ही माहिती वाचून त्यांचेवर पुनः उजळा चढावा हा एकच हेतु या लिखाणाचा आहे. मी मराठी साहित्यिक नाहीं, अधिकारी पुरुष नाहीं, लष्करी तज्ञ नाहीं, विचारी तत्त्वज्ञ नाहीं किंवा नांवाजलेला अथवा मागासलेला पुढारीही पण नाहीं. असें असतां केवळ मातृभूचा एक उपासक व राष्ट्राचा सेवक व हिंदुस्थानचा एक स्वातंत्र्येच्छु नागरिक या नात्यानें केवळ कोणीहि राष्ट्रप्रेमी भारतीयानें गैरसावध राहूं नये या एकाच बुद्धीनें स्वतःचा अभ्यास जनतेपुढें मांडण्याचें धाडस केलें आहे. त्याचा यत्किंचितहि उपयोग थोड्याफार लोकांस झाला तरी त्यांत मला समाधान राहील.

ईश्वर करो व हिंदवासीयांस त्यांची आकांक्षा जें पूर्ण स्वराज्य तें मिळ-विण्याचें व राखण्याचें मुख्य साधन लष्करी सामर्थ्य व वीरवृत्ति ही त्यांस प्राप्त होवो.

या पुस्तकास आपुलकीनें प्रस्तावना लिहून दिली याबद्दल अखिल भारतीय, महाराष्ट्रीय, व वऱ्हाड मध्यप्रांताचे एकमेव पुढारी लो. ना. माधव श्रीहरि ऊर्फ बापूजी अणे यांचेविषयीं मी कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून त्यांचे आभार मानतों. पुस्तकाचें लिखाण वेडेवांकड्या अक्षरांत पुरें केल्यावर त्याची सुंदर रेखीव अक्षराची प्रत छापखान्याकडे पाठविण्यासाठीं तयार करून दिली या-बद्दल माझे स्नेही सदाशिवराव बल्लाळ, माजी संपादक लोकमत, यांचाही मी आभारी आहें. ज्या ज्या पुस्तकांचा नामनिर्देश पुस्तकारंभीं झाला आहे,

त्यांचे प्रकाशक व लेखक यांचाही मी अत्यंत आभारी आहें. माहिती गोळा करीत असतां मला पाहिजे असलेलीं कांहीं टिपणें करून दिल्याबद्दल सौ. उषाबाई दामले यांचेहि आभार मानावयास पाहिजेत. त्याचप्रमाणें मेजर जनरल राजवाडे-साहेब ग्वाल्हेर व सर शिवस्वामी अय्यर यांनीं डिफेन्स सब् कमेटी ऑफ राऊन्ड टेबलच्या रिपोर्टास जोडलेल्या भिन्न मतपत्रिकेची छापील प्रत मला ताबड-तोब पाठविल्याबद्दल माननीय भगिनी श्रीमंत सौ. राणी लक्ष्मीबाई राजवाडे यांचा मी अत्यंत आभारी आहें. लो. ना. बापूजी अणे यांनीं असेंब्ली प्रोसी-डिंग्जचीं पुस्तकें व डिफेन्स एस्टिमेटस वगैरे पुस्तकें दिलीं व जिल्हासभा ( District-Association ) यवतमाळ या संस्थेनें अनेक पुस्तकें अभ्यासा-साठीं दिलीं याबद्दल बापूजी अणे व जिल्हासभा यांचा मी फार आभारी आहें. पुस्तकाचे मुखपृष्ठावरील सुबक व अर्थपूर्ण चित्र काढून दिल्याबद्दल रा. रा. रामभाऊ दामले वकील यांचेही आभार मानणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें पुस्त-काचें इंडेक्स अगदीं थोडक्या वेळांत तयार करून दिलें याबद्दल माझे स्नेही रा. शंकरराव गोडबोले वकील यांचा मी फार ऋणी आहें.

नेहमींच्या प्रेमानें माझ्या लिखाणाचा स्वीकार करून छपाईचें सुबक व सुंदर काम करून पुस्तक अल्पावधींत कुरकुर न करतां आनंदानें छापून दिलें याबद्दल आर्यभूषण प्रेसचे दुय्यम व्यवथापक रा. रा. वि. अ. पटवर्धन व मुख्य व्यवस्थापक रा. बर्वे यांचे आभार मानणें माझें कर्तव्यच आहे.

अखेरीस एक वेळ दोनतीनशें वर्षें स्वातंत्र्य कमावून शत्रूस अटकेपार हांकून हिंदुस्थानचे वैभवावर उजळा चढविणारे महाराष्ट्रीय लोक आपली संरक्षक जबाबदारी घेण्यास पुढें सरसावोत व राजकारण व संरक्षक वीरवृत्तीनें भारत-मातेच्या स्वातंत्र्यप्राप्तींत सुयश मिळवोत व या कार्यांत ईश्वर त्यांस सर्व भार-तीयांचे सहाय करो अशी आशा व्यक्त करून पुरें करतों.

यवतमाळ, १५ डिसेंबर १९४०<br>
दत्तजयंति श. १८६२.

—भास्कर म. टेंबे.

# ग्रंथ-सूचि

1. Encyclopaedia Britannica Vol. 2, 9th Edition.
2. Indian Statutory Commission Report Vol. 2.
3. Joint Committee on Indian Constitutional Reform Vol. 1
4. Indian Statutory Commission Vol. 1.
5. Marathe ani Ingraj by N. C. Kelkar, Poona. (मराठे आणि इंग्रज)
6. Report of the Auxiliary and Territorial Committee or Lt. Gen. Shea Committee Vol. 1.
7. Budget Estimates of Expenditure on Defence Services for 1939-40.
8. The Indian Annual Register Vol. 1. 1923. (Inchcape Committee).
9. The Indian Annual Register Vol. 1. 1921. (Esher Committee).
10. Indian Defence problem by Capt. G. V. Modak.
11. Speeches of G. K. Gokhale.
12. Legislative Assembly Debates Vol. 1, Part 2, 1921.
13. The Military strength of the Powers, by Max Werner.
14. The Army in my time by Maj. General J. F. C. Fuller.
15. Some aspects of India's Military Defence. by D. H. Limaye.
16. Air Defence of Britain by Air Commander L. E. O. Charlton and others.
17. If War Comes by Prof. B. P. Adarkar.
18. Legislative Assembly Debates Vol. 3, No. 2. (15-3-39).

19. Legislative Assembly Debate Vol. 3, No. 1. (14-3-39).
20. Do Do Vol. 6, No. 2. (13-9-38).
21. Do Do Vol. 2, No. 2. (8-3-39).
22. Do Do Vol. 3, No. 6. (20-3-39).
23. Dissenting Minute of Sir P. A. Sivaswami Iyer and Maj. General Raja G. R. Rajwade. Indian Military College Committee 1931.
24. A summary of important matters concerning the defence services in India, 1937-38.
25. The Indian Year Book "Times of India" 1938.
26. Indian Annual Register 1930 Vol. No. 1.
27. Indian Annual Register 1930 Vol. No. 2.
28. Indian Annual Register Vol. No. 1. 1931.
29. Modern Armaments by Prof. A. M. Low. 1939.
30. Tomorrow's War by Stephen Possony. 1938.
31. The Navy by Admiral Sir Herbert Richmond K. C. B. C. B. 1937.
32. Sea Power in the next-War, 1938, by Commander Russel Grenfell R. N.
33. Air Power in the next-War, 1938, by J. M. Spaight C. B. C. B. E.
34. Tanks in the next-War, 1938, by Major E. W. Sheppard D. B. E. M. C.
35. The Chinese Soldier by Captain Anatol M. Kotener 1937.
36. भारतमें-अंग्रेजीराज भाग १, २, ३.

# अनुक्रमणिका







# हिंदुस्थाना तूं कुठें !

## भाग १

## जागतिक शस्त्रसामर्थ्य

### १९३९ पूर्व-

जगतांत शांतता नांदून सर्वांनीं सुखांत नांदावें म्हणून कितीही खटपटी झाल्या तरी ईश्वरी संकेत अथवा न्याय ही बाब वेगळीच असल्यानें भांडणाचीं कारणें उत्पन्न होतात. त्यांतूनच भाऊबंदकी पुढें येते व अखेर घरादारांचा नाश होऊन नवीन कुटुंबव्यवस्था तयार होते. आजपर्यंत अनेक संस्कृति जन्मल्या, वाढल्या व कालोदरांत नाहींशा झाल्या. युरोपमध्यें ग्रीक व रोमन साम्राज्यें रसातळास गेलीं, त्यांस जिंकणारे व्हॅन्डोल्स व व्हिसिगॉथ्स लोकांनीं स्थापलेली सत्ता नामशेष झाली व त्यांतूनच आजची युरोपीय राष्ट्रांची निर्मिती व वाढ झाली. १९१९ मध्यें महायुद्धोत्तर शांतता स्थापण्यास्तव व्हर्सायचा तह पुढें आला, पण त्यांतच भावी युद्धाची तयारी सांठवली होती. आज युरोपावर पसरलेली भीषण परिस्थिति एका-एकीं निर्माण न होतां तिचीं बीजें वेगळाल्या देशांत पेरलीं जात होतीं. १९३२ मध्यें जपाननें चीनवर प्रथम हल्ला करून मँचुको घशांत घातला व नंतर १९३४ मध्यें हेर हिटलर जर्मनीचा सर्वाधिकारी होतांच त्यानें तहाचे वेळीं यशस्वी फ्रान्सच्या हट्टानें जर्मनीवर लादलेले अपमानास्पद करार मोडण्यास प्रारंभ करून प्रथम निःशस्त्र केलेला र्‍हाईनलँड स्वाधीन करून घेतला, सारप्रांत परत इलेक्शन जिंकून मिळविला व आपली नीट वाढ व्हावी म्हणून आपला कट्टा शत्रु पोलंड याच्याशीं तह करून थोडी शांतता केली व नंतर ऑस्ट्रिया गिळला, सुडेटन जर्मन परत मिळवून थोड्याच दिवसांत झेकोस्लोव्हाकिया गिळला, मेमेल हस्तगत केला व डॅन्झिग बंदर व कॉरिडर प्रांत परत मिळावा म्हणून भांडण उकरून पोलंड-वर स्वारी करून तें राष्ट्र हातीं घातलें व नंतर पश्चिमेकडे मोर्चा वळवून आपल्या यंत्रसुसज्जसेनेच्या बळावर नॉर्वेवर आक्रमण करून तें पोटांत टाकलें व त्याच-

बरोबर हॉलंड, डेनमार्क गट्ट करून बेल्जियमवर आक्रमण करून तें पादाक्रांत केलें व तेथील सरकारांस शरणागति करावयास भाग पाडलें व नंतर दोस्त राष्ट्रांतील राहिलेल्या प्रमुखांपैकीं फ्रान्सवर हल्ला करून त्या राष्ट्राची पीछेहाट करून तेथील सरकारास माघार घ्यावयास लावून युद्ध थांबविण्याची विनंति करण्यास भाग पाडलें व यापुढें लोकसत्ताशाहीचे पुरस्कर्ते म्हणजे ग्रेट ब्रिटन व त्यांच्या वसाहती आणि हिंदुस्थान या संघाशीं युद्ध करावयाचा हव्यास चालू ठेवला आहे.

जगताकडे नजर फेंकल्यास जिकडे तिकडे खाकी पोषाखाची आवड सुरू झाली आहे असें दिसेल. ऑस्ट्रेलिया, न्यूझीलँड, चीन, जपान, हिंदुस्थान, अरेबिया, ईजिप्त, इटाली, फ्रान्स, इंग्लंड, पोलंड, जर्मन, आणि इतर सर्व राष्ट्रांतील बरेचसे लोक खाकी पोषाखांत हिंडतांना आढळतील. सर्व राष्ट्रांची आपलें स्वातंत्र्य रक्षणार्थ धडपड चालू असून ज्यांचें स्वातंत्र्य तूर्त तरी नष्ट झालेलें दिसत आहे अशीं सर्व माणसें आपापल्या राष्ट्रनागरिकांचे वेगळाले संघ करून त्यांच्या फौजा पुनश्च उभारून दोस्त राष्ट्रांच्या मदतीला धांवून जात आहेत. सर्व राष्ट्रांतून आतां पावेतों गेल्या वीस वर्षांत अनेक कारखाने निघालें व या सर्वांचा रोख एकच दिशेनें दिसत होता, तो म्हणजे शस्त्रवाढ. प्रत्येक राष्ट्रानें वैमानिक दल उभारलें, त्याची शक्त्यनुसार वाढ केली व वैमानिक आक्रमण व वेग यांची वाढ करून एकमेकांस जिंकण्यास अथवा स्वतांचें संरक्षण करण्यास सर्व सुसज्ज झाले. आपणावर दुसऱ्या राष्ट्राचें आक्रमण होईल म्हणून एक राष्ट्र शस्त्रवाढीस प्रोत्साहन देतें तर दुसरें गत युद्धांत आपणांस अपयश आल्यामुळें आपल्या इभ्रतीस लागलेला कालिमा धुवून टाकण्यासाठीं म्हणन शस्त्रसुसज्जता करण्याचे मागें लागतें ! या प्रकारें जेतीं व जितराष्ट्रें परस्परांच्या आक्रमक धोरणामुळें मनांत परस्परांविषयीं सदासर्वदा साशङ्क राहून शस्त्रवाढीस प्रोत्साहन देतात. "महाजनो येन गतः स पन्थाः" या न्यायानें इतर राष्ट्रेंहि त्यांचें अनुकरण करूं लागतात व सर्वत्र जय्यत तयारी आहे असें दिसूं लागतांच दारूच्या कोठारांत लहानशी ठिणगी पडतांच जसा एकाएकीं स्फोट व्हावा तद्वत् एखादी अकल्पितपणें घडलेली लहानशीदेखील गोष्ट युद्धासच नव्हे तर महायुद्धास कारणीभूत होते ! "असणारे" ( haves ) व " नसणारे " (have-nots) किंवा संपन्न व विपन्न या अवस्थांचा झगडा जगतितलावर सारखा चालूं असून ज्यास भाग्य प्राप्त झाल तें मिळविलेल्या भाग्याचें रक्षण करण्याकरतां झटतें; उलटपक्षीं, ज्या राष्ट्रास कांहीं नाहीं, किंवा असून अधिक मिळावें

अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न होते तें राष्ट्र अधिक मिळविण्यासाठीं धरपड करूं लागतें. असल्या स्वार्थी चढाओढीमुळें सर्वत्र साशंकतेचें राज्य प्रस्थापित होतें, त्यांतून भय उत्पन्न होतें व त्यांतूनच युद्धस्फोट उद्भवतात. एवंच, राष्ट्रसंघासारखी जगड्व्याळ संस्था शान्तता प्रस्थापित करण्याकरतां अहर्निश झटत असतां समरक्षमतेचे पाठ घेण्यांतच आजचीं राष्ट्रें आपलें शक्तिसर्वस्व खर्च करीत असल्याचें दृश्य आज सर्वत्र दिसत आहे !

" इतिहासाची पुनरावृत्ति होते " ही उक्ति कांहीं अंशीं खरी असली तरी " रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव " हें म्हणणेंहि खोटें नाहीं, व मागच्या युद्धांप्रमाणें पुढील युद्ध होईल असें म्हणणें वस्तुस्थितीला धरून होणार नाहीं. पाश्चात्य देशांतील युद्धाचा इतिहास ज्यांनीं वाचला असेल त्यांना हें सहज समजेल कीं प्रत्येक युद्धाचे वेळीं अननुभूत व अकल्पित असे नवेच पेचप्रसंग निर्माण झाले, व अशा प्रसंगीं आतां काय करावें हा प्रश्न मोठमोठ्या रणधुरंधरांपुढें दत्त म्हणून उभा राहिला. तो सोडविण्याकरितां नवीन कल्पत्या शोधून काढाव्या लागल्या. यावरून सर्व प्रसंग सारखे नसतात, व म्हणून मागील घडून आलेल्या गोष्टींतून निघालेलें अनुभवजन्य ज्ञान बाजूस न सारतांहि भविष्यकाळीं होणाऱ्या गोष्टींचें ज्ञान करून घेण्यासाठीं सद्यःस्थितींत चालू असलेल्या घडामोडींकडे तुच्छतेनें दुर्लक्ष केल्यास आपला नाश झाल्याशिवाय राहणार नाहीं हें लक्ष्यांत ठेवणें अवश्य आहे. १९०२ सालीं झालेल्या बोअर युद्धामध्यें इंग्रजी सैनिक-शिक्षण कसें अपुरें पडलें व त्यामुळें तें युद्ध कां लांबलें व त्यांतून उत्पन्न झालेल्या ज्ञानाचा उपयोग १९१४ च्या महायुद्धांत फारसा कां झाला नाहीं हें लष्करी तज्ज्ञच सांगतात. मॉर्टिमर मेन्पीज आपल्या "वॉर इंप्रेशन्स" या ग्रंथांत लिहितो: " It is nothing but drill, drill, drill, the soldier's individuality is not encouraged; therefore the man's mind does not grow with the body. One gleans a very fair illustration of that by examining the contents of Tommy's pockets which will be found to be precisely what they were ten or fifteen years ago at the Board School. ( "*Army in my time*" by General Fuller, p. 101. ) " सदैव ड्रिल, ड्रिल, ड्रिल, दुसरें कांहीं नाहीं. सैनिकाचें व्यक्तिवैशिष्ट्य वाढविण्यास कोठें म्हणून जागा नाहीं व म्हणून शरीराप्रमाणें त्याच्या मनाची वाढ होत नाहीं. या गोष्टींची सत्यता टॉमीच्या

खिशांतील वस्तु पाहिल्यानें लक्ष्यांत येईल. शिपाई पंधरा वर्षांपूर्वी प्राथमिक शाळेंत जें शिकला त्यांत मुळीं देखील वाढ झाली नाहीं." लाइन्समन आपल्या "मेकॅनिझम् ऑफ वॉर" १९२७, या पुस्तकांत म्हणतोः "Teach our men to think of the task they are at, of its importance, of its purpose. Teach them to project themselves, as it were, into the enemies' ranks, to guess the likelihood of time and mode of the enemies' attack, and incidentally how to meet it......teach him to remember his own value, how that alive he is invaluable, dead but a nuisance and a moral deterrant to his side. Teach him to appraise his officers properly, not as indispensable, but as aids which he himself can supply if they are absent or destroyed. Teach him, in short, the whole art of fighting." ("*Army in my time*" by General Fuller, pp. 101–02) "आपल्या शिपायांना आपल्यापुढें असलेलें त्यांचें महत्त्व व उद्दिष्ट यांचा विचार करावयास शिकवा. शत्रूच्या फळींत घुसून, त्यांचा हल्ला केव्हां व कसा होईल व त्याचा प्रतिकार कसा करावा याचा विचार करावयास त्याला शिकवा. आपलें वैयक्तिक महत्त्व, म्हणजे जीवंत असतां उपयोग व मेल्यावर उपद्रव व पक्षास लांछन. शिपायानें आपल्या अधिकाऱ्यांची योग्यता ओळखावी, पण ते जागीं नसल्यास अथवा मेल्यास त्यांची जागा आपणांसच भरून काढावी लागेल ही जाणीव त्यांस असावी. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्यांस युद्धशास्त्राचें पूर्ण ज्ञान द्या."

सांगकाम्या चाकर व स्वबुद्धीनें काम करणारा नोकर यांत जो फरक तोच युद्धांतील अशिक्षित व सुशिक्षित सैनिकांतहि दिसतो. मोठमोठीं पायदळ सैन्यें दुसऱ्याच्या देशांवर स्वारींत नेऊन त्यांचे हातून यश मिळवावयाचें व सैन्याचा मोठा तळ देऊन तेथून शत्रूच्या प्रदेशांत हालचाली करावयाच्या ही संवय झालेल्या सैन्यास चढउताराचा प्रदेश दिसतांच कांहीं सुचेनासें व्हावें यांत नवल नाहीं. सपाट जमिनीवर युद्ध करणाऱ्या व मोठ्या संघानें कवाईत करणाऱ्या सैनिकांस एकटे दुकटे पडल्यास कसें वागावें हें माहीत नसल्यानें इंग्रज सैन्याचे बोअर युद्धांत फार हाल झाले. इंग्रजी घोडदळांतील स्वारांस बोअर रायफलमनची निशाणबाजी व एकटे हिंडून कार्यभाग करण्याची कला नसल्यानें त्यांचें फार नुकसान

झालें असें डेनिसरीट्झ म्हणतोः "From start to finish it was obviously a mounted rifleman's war... Ignorant of the rifle, ignorant of the horse, we were also ignorant of the spade." ("*Army in my time*" by General Fuller). प्रथमपासून अखेरपर्यंत बोअरयुद्ध म्हणजे निशाणबाज स्वाराशीं युद्ध होतें...रायफल; घोडा व फावडा या सर्वांविषयीं आम्ही पूर्ण अज्ञानी होतों."

१९१४ पूर्वी शत्रुपक्षाच्या प्रदेशांत घुसावें, ठाण मांडून रहावें व समोरासमोर सैन्यें उभीं करून लढावें व जिंकावें असा प्रघात बरींच वर्षें सुरू होता. पण बोअरयुद्धांत या प्रयोगास कलाटणी मिळाली, व १९१४ मध्यें तर (ट्रेंचवॉर) खंदकयुद्धपद्धति अमलांत आली व त्यामुळें शत्रुसैन्य परत फिरविणें अथवा जागच्या जागीं थोपवून धरणें सोपें होऊं लागलें. यावर खंदक फोडण्यासाठीं तोफांची सरबत्ती सुरू करण्यांत आली व खंदकावर सोडलेले गोळे फुटून जिकडे तिकडे खडबडीत जागा झाल्यानें चाकीवाहनांची वाहतूक बंद पडून रसदबंदीची वेळ आली व त्यामुळें पायदळाची हालचाल बंद होऊन वेढा घालून दोन्हीं सैन्यें बसलीं राहिलीं. हा वेढा उठावा कसा व दोस्त सैन्यांची पुढें चाल व्हावी कशी? पूर्वींच्या युद्धांत तोफखाना पायदळ सैन्यास मदत करी व तोफखान्याचा मारा जितका लांब जाई त्याचे आंतल्या अंतरांत फौजेची हालचाल होई; पण या युद्धांत खंदक खणून बसलेल्या लोकांस पळावयास लावावयाचें म्हणजे तोफखाना पुढें करून त्याचे मागें पायदळास चालावें लागे. त्यामुळें तोफांच्या गतीवर पायदळास पुढें सरकावें लागे व त्यामुळें काम भागेना. अशा वेळीं थोडक्या वेळांत थोडकीं माणसें घेऊन भराभर रस्ता काढीत शत्रुपक्षांत शिरून त्यांचे शिपाई जखमी करावे व चौफेर गोळीबार उरकून त्यांची फळी फोडून त्यांतून आपलें सैन्य पुढें सरकवतां यावें अशी पद्धति अमलांत आणणें जरूर होतें, व या साठीं शत्रूच्या गोळ्या फुटूनही आपलें नुकसान न होतां आपले सैन्यास पुढें घुसतां यावें ही युक्ति रणगाड्यांच्या (tanks) सहाय्यानें प्रथमतः १९१७ मध्यें अमलांत आली, व २० नोव्हें. १९१७ रोजीं ३८७ रणगाड्यांनीं फक्त १२ तासांत १० हजार यार्ड शत्रुसैन्यानें रोखून धरलेल्या भागांत विजय संपादन करतां आला. रणगाड्यांमुळें फौजेंतील शिपायांची मृत्युसंख्या व अपघातांचीहि संख्या कमी झाली, व ८ ऑगस्ट १९१८ रोजीं ४१५ रणगाडे पुढें

करून ॲमीन्सची लढाई जिंकतां आली (" *Army in my time,*" by General Fuller, p. 139 ). यापुढें रणगाड्यांचा उपयोग अधिक करावयाचा असें अनुभवांनीं मार्शल फॉश व सर हेनरी वुइल्सन यांनीं ठरविलें.

याप्रमाणें बोअरयुद्धांत शिकलेले धडे १९१४ चे महायुद्धांत कामीं आले नाहींत. नव्या प्रसंगीं नव्याच कृल्त्या योजाव्या लागल्या, पण त्या शोधून काढण्यास तीन वर्षांचा कालावधि लागला व तोंपर्यंत अपरिमित मनुष्यहानि व द्रव्यहानि झाली. असो. याचप्रमाणें वैमानिक दलाचा उपयोग हळुहळू अधिकाधिक होऊं लागला. परंतु तोहि पायदळ फौजेस मदत करण्यापुरताच झाल्यानें त्याचा आजच्या प्रमाणें तितकासा उपयोग झाला नाहीं. तथापि १९१७–१८ मध्यें या वैमानिक दलाचाहि उपयोग चांगलाच जाणवला व तोच प्रकार मशिनगन्सचा झाला. १९१४ पूर्वीं फौजेंत पायदळ, घोडदळ व तोफखाना यांचा उपयोग अधिक होई, परंतु नंतर नंतर सुमारें १९१६-१७-१८ चे सुमारास घोडदळाचा उपयोग जवळ जवळ शें. ५० कमी झाला, व पायदळाचा उपयोग शें. २५ घसरला व फौजेची मुख्य धुरा जीवंत प्राण्यांतून वळून यंत्रसामर्थ्यांत घुसली, व यामुळें जीवापेक्षां यंत्रसामर्थ्यांकडे अधिक भर पडूं लागली हें पुढील आंकड्यांवरून सहज ध्यानांत येईल.

| वर्ष महिना | घोडदळसंख्या | पायदळ | तोफखाना R. F. A. |
|---|---|---|---|
| १९१४ ऑगस्ट | ४५११० | ऑगस्ट २२९३४२ | ५१२२८ |
| १९१६ ऑक्टोबर | १३२४७९ | १९१७मे२०६३६८८ | १९१७ एप्रिल ३५००४६ |
| १९१८ नोव्हेंबर | ७४०८६ | नोव्हें. १६३८५१३ | १९१८ नोव्हें. ३११८४५ |

नवीन यंत्रसामर्थ्य म्हणजे वैमानिक द[illegible] F. C., रणगाडे Tank corps, व मशिनगन कोअर M. G. C. यांची वाढ कशी झाली तें पाहण्यासारखें आहे.

| वर्ष | वैमानिक दल | रणगाडे | मशिनगन्स |
|---|---|---|---|
| १९१४ | १२०० | ... | ... |
| १९१६ | .. | १२०२ | ३५३६ |
| १९१८ | १४४०७८ | २८२९९ | ऑगस्ट १२०७७२<br>नोव्हेंबर ११९९८६ |

यावरून महायुद्ध जसजसें लांबत गेलें तसतशी यंत्रसामर्थ्याची फौज वाढून पायदळ व घोडदळाचें महत्त्व आक्रमक युद्धांत कमी झालें, व या दोन दलांचा विशेष उपयोग संरक्षक कारणांकडे अधिक होऊं लागला. महायुद्धांत यंत्रसामर्थ्याची कृप्ति नवीनच जन्मास आलेली असल्यामुळें तिची वाढ तितकीशी झाली नव्हती; परंतु गेल्या वीस वर्षांत या बाबतींत मोठाल्या सुधारणा व शोध होऊन आज सर्व राष्ट्रांनीं या दिशेनें आपली प्रगति फार झपाट्यानें चालविलेली असून यंत्र-सामर्थ्यावर विजय मिळवितां येतो हें जवळ जवळ गेल्या स्पेनयुद्धांत, चनि-जपान युद्धांत व हर हिटलरच्या झेकोस्लोव्हेकिया, पोलंड, बेल्जियम, फ्रान्सवरील आक्र-मण प्रसंगांत जगाच्या पूर्ण प्रत्ययास आलें.

नवीन शास्त्रीय शोधांमुळें एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं औद्योगिक क्रान्ति होऊन मानवी जीवनांत यंत्रसाथ्र्याची भर झपाट्यानें पुढें पाऊल टाकत गेली व त्यामुळें संसारांत लागणाऱ्या सर्व सुखदायक वस्तूंचा पुरवठा हस्तकौशल्य म्हणजे मनुष्यबळावर अवलंबून न राहतां त्याची ओढ यंत्रसामर्थ्याकडे धांव घेऊं लागली. दररोजच्या जीवनांत शस्त्रानें घडवून आणलेला हा बदल संरक्षणाचे बाबतींत म्हणजे लष्करी जीवनांतहि व्हावयास पाहिजे ही गोष्ट मात्र लष्करी तज्ज्ञांचे ध्यानीं बरेच दिवस आली नाहीं. यामुळें १९१४ च्या महायुद्धास प्रारंभ होईं-पर्यंत लष्कराचे हालचालींत प्राणिबल म्हणजे माणसें, घोडे व खेचरें यांचेंच प्राबल्य अधिक असे. शत्रूला तोंड देण्यासाठीं लष्करी सामर्थ्य म्हणजे पायदल, घोडदळ व तोफखाना हे तीन लष्करी विभाग प्रमुख असत व यांचें सामर्थ्य म्हणजे माणसें व घोडे यांची भरपूर संख्या असली कीं झालें. परंतु १९१४ मध्यें युद्धाच्या हाल-चाली पूर्वीप्रमाणें न राहतां सैन्यें जमिनींत खंदक खणून त्यांतून युद्ध चालूं ठेवण्याची पद्धति अमलांत आल्याबरोबर तडकाफडकी युद्धसमाप्ति होईना व समोरासमोर सैन्यें उभीं न राहिल्याकारणानें सर्व युद्धाची प्रगति थांबली, व यांतून मार्ग सुकर करण्यासाठीं रसदबंदी करून वेढा घालण्याचे पद्धतीला जोर आला. परंतु त्यामुळें दारूगोळा व माणसें यांचें नुकसान अधिक होऊं लागलें. युद्ध जितकें लांब तितका खर्च अधिक वाढे व त्यामुळें मनुष्य, दारूगोळा व अन्नसामग्री यांचा खर्च वाढूं लागला, व मग दोन सैन्यांची परस्परांशीं लढाई न राहतां या भांडणाची मजल शत्रुराष्ट्रांतील सर्व प्रजेची उपासमार करणें या मार्गापर्यंत गेली ! यावेळीं लढाई-साठीं लागणाऱ्या जिनसा शेल्स, कापूस, रबर, तांबें, दारूसाठीं लागणारे नायट्रे-ट्स, पेट्रोल, तेल वगैरे जिनसांचा पुरवठा शत्रूस न होऊं देण्यासाठीं जर्मनीचा

कोंडमारा करण्याचा प्रयत्न झाला. गोळीनें मारण्याऐवजीं उपासमारीनें मारण्याची पद्धति प्रचालित झाली, व याचा अर्थ हा कीं शत्रुसैन्यांतील शिपायांस दारूगोळा, अन्न व वाहतुकीच्या साधानांच्या उपासमारीची शिक्षा देणें भाग पडलें.

जर्मन सैन्यासच नव्हे, तर जर्मनींत राहणाऱ्या माणसांस, म्हातारेकोतारे, तरुण, मुलें, आजारी, बाळंतिणी इत्यादिकांस अन्नसामग्री मिळेनाशी झाली म्हणजे भुकेनें व्याकुळ झालेले जर्मन लोक गिल्ला करून आपल्या सैन्यास लढाई थांबविण्यास भाग पाडतील, व मग आपण त्यांस सांगूं तसा तह होईल हा या कोंडमाऱ्याचा अर्थ ! इंग्लंड हें दोस्त राष्ट्रांस लागणाऱ्या जिनसांचें मुख्य कोठार-घर असल्यामुळें त्यास हतबल करण्यासाठीं ब्रिटिश व्यापारी जहाजें व त्यांचीं संरक्षक जहाजें यांवर जर्मन पाणबुड्या बोटींनीं हल्ला करून इंग्लंडला पोंचणारें सामान बुडविण्याचा प्रयत्न केला, व त्याचा प्रतिकार म्हणून इंग्लंडनें जर्मनीचा समुद्रावरून पूर्ण कोंडमारा केला. १९१४ च्या महायुद्धांत एकूण झालेल्या मनुष्यहानीची कल्पना पुढील कोष्टकावरून होईल. आजारी माणसें वगळतां १४ मार्च १९२० पर्यंत झालेली मनुष्यहानि पुढीलप्रमाणें आहे.

| रणक्षेत्र | अधिकारी | इतर सैनिक |
|---|---|---|
| फ्रान्सचें रणक्षेत्र | १२८२०५ | २६३२५९२ |
| इतर रणक्षेत्र | १४४१३५ | २९५३२५७ |

लांबलेल्या लढायांत तर भयंकर मनुष्यहानि झाली; ती पुढील कोष्टकांत दिली आहे.

| लढाई | काळ | अधिकारी | इतर |
|---|---|---|---|
| सॉम १ | १ जुलै १९१६ त ३१ नोव्हें. १९१६ | २३०८० | ४७४९७४ |
| अरास | ९ एप्रिल १९१७ ते ६ जून १९१७ | ९३६७ | १७८४१६ |
| मेसीनीस | ७ जून १९१७ ते ३० जुलै १९१७ | ५३७७ | १०३५०५ |
| येप्रे | ३१ जुलै १९१७ ते ३१ डिसें. १९१७ | २०७२५ | ३८०३३५ |
| कॅंब्रॉय | २० नोव्हें. १९१७ ते ३१ डिसें. १९१७ | ४२९६ | ७१३८५ |
| सॉम व लीज् | २१ मार्च १९१८ ते ३१ मे १९१८ | १६४८२ | ३२७३३० |
| सॉम वगैरे | २७ मे १९१८ ते ७ ऑगस्ट १९१८ | १४७०८ | ८२९५९ |
| ॲर्मान्स | ८ ऑगस्ट १९१८ ते १४ नोव्हें. १९१८ | १७८४१ | ३४५३७६ |

वरील मनुष्यहानींत वेगळाल्या शाखांच्या हानीचें प्रमाण वेगळालें आहे तें असें:—

| शाखा | मारले–मेले | जखमी | कैदी किंवा बेपत्ता | एकूण |
|---|---|---|---|---|
| घोडदळ | ०·२५ | ०·७२ | ०·११ | १·०८ |
| तोफखाना | १·५४ | ५·७३ | ०·३१ | ७·५८ |
| इंजीनिअर्स | ०·५२ | १·८८ | ०·१८ | २·५७ |
| पायदळ | १७·१७ | ५७·१७ | १२·७३ | ८६·०७ |
| एम्. जी. सी. | ०·४३ | १·६३ | ०·४० | २·४६ |
| रणगाडे | ०·०३ | ०·१७ | ०·०४ | ०·२४ |
| एकूण | १९·९४ | ६६·२९ | १३·७७ | १००·०० |

यावरून मनुष्यहानींत पायदळाच्या विभागांत फार नुकसान झालें व तेंच रणगाड्याच्या सरदारांत सर्वांत कमी झालें हें स्पष्ट दिसतें.

महायुद्धापूर्वी युरोपखंडांतील लष्करी शिक्षण Clawsewitz चे युद्धनीतिशास्त्रावर अवलंबून असून स्वदेशावर संकट आल्यास सर्व नागरिकांनीं फौजेंत सामील व्हावयाचें व संरक्षकदल वाढवून मनुष्यबळावर देश जिंकावयाचा ही पद्धति सर्वत्र अमलांत असे. महायुद्धांत मनुष्यबळाचें नितकेंसें काम नाहींसें दिसतांच ज्या कालांत युद्ध सुरू होतें तो काल औद्योगिक प्रगतीचा असल्यामुळें मनुष्यबळाला औद्योगीकरणाची मदत मिळणेंच अवश्य होतें, व म्हणून "खंदकयुद्धपद्धतीनें युद्ध सुरू होतांच सर्वत्र गोळे ( shells ), कापूस, रबर, तांबें, नायट्रेट्स, पेट्रोल, तेल वगैरे जिनसांची वाढ एकदम होण्यास्तव भराभर कारखाने काढणें भाग पडलें; कारण युद्ध खंदकांत व्हावयाचें म्हणजे लांबावयाचें व त्यासाठीं युद्धसामग्रीचा पुरवठा फार मोठ्या प्रमाणांत व्हावयास पाहिजे हें खरें होतें व याकरितां शत्रुराष्ट्रांस वरील जिनसांचा पुरवठा न होतां आपणांस व्हावा ही दोस्त राष्ट्रांची इच्छा व धडपड असणें स्वाभाविक होतें. यांतूनच शत्रुपक्षावर आर्थिक सहाय्यबंदी घालून त्यास जर्जर करण्याच्या धोरणाचा जन्म

झाला. रसद्‌बंदीच्या मार्गाशिवाय गत्यन्तर नव्हतें व तें फक्त माणसांचीच उपासमार नसून त्याबरोबर युद्धसामग्रीचाहि तुटवडा पडून त्यास जरीस आणावयाचें या युक्तीचा अवलंब करावा लागला. यामुळें समोरासमोर छातीठोकपणें उभें राहून युद्ध न करतां एकमेकांची दुरून गळचेपी करण्याचे प्रयत्न करण्यांत येऊं लागले, व म्हणून जर्मनीवर समुद्रावरून वेढा घालण्यांत आला. १९१४ पावेतों शिपाई व औद्योगिक वाढ यांचें प्रमाण व्यस्त असें, परंतु यानंतर मात्र सैनिकांस उद्योगधंद्यांचीच मदत घेणें अवश्य झालें व त्यामुळें मनुष्यबळापेक्षां यांत्रिक सामर्थ्यावर अधिक जोर दिला गेला, व नंतर युद्धाचें भवितव्य एकदम पालटलें व मागें सांगितल्याप्रमाणें सैन्यांतील यांत्रिक भागामुळें यशाचा कल दोस्तराष्ट्रांकडे वळला. मनुष्यबळापेक्षां मोटारसिद्ध फौज व रणगाडे यांचें बळ म्हणजे संख्या यांजवर यश मिळालें. जगतांतील सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत भौतिक शास्त्रांनीं झालेल्या प्रगतीला सैन्याची जोड करूं दिल्यास युद्धकार्य अधिक यशस्वी होईल ही कल्पना पुढें येतांच युद्धांतील मनुष्यसंहार कमी होऊन शांतता लौकर स्थापन करतां येईल व कारखान्यांतील उत्पन्न होणाऱ्या मालाची वाढ हजार पटींनीं वाढूनसुद्धां यांत्रिक सुधारणांमुळें काम करण्यास अधिक माणसें लागत नाहींत हें जसें खरें तसेंच सैन्यांतील हालचाल करण्यास लागणारीं साधनें गाड्या, घोडीं, खेंचर हीं कमी करून त्यांची जागा यंत्रसामग्रीनें भरून काढल्यास प्राण्यांचा संहार कमी होईल व वहातुकीस लागणारा कालावधि कमी करतां येईल म्हणजे गति वाढवितां येईल ही गोष्ट खरी. याप्रमाणें धोरण ठरतांच घोडदळ स्वारांपेक्षां अधिक जलद चालणारें सैन्य मोटरवाहनांचे म्ह. चिलखती गाड्या करून युद्धाला जास्त उग्र व प्रभावी स्वरूप देण्यांत आलें.

रणगाड्याचें सामर्थ्य वाढलें याचें कारण मनुनष्यहानि नसून तें पाहतांच शत्रुसैन्याच्या मनांत धडकी भरे हें होय, व हीच गोष्ट वैमानिक दलासंबंधीं आहे. रणगाडे शत्रूची भूमि कबज्यांत घेत असतां वैमानिक दल वरून टेहळणी करी व शत्रुप्रदेशांत आघाडीवर जाई. या प्रकारें या दोन यंत्रविभागांच्या सहकार्यानें शत्रूवर मात करणें सुलभ झालें. शिवाय वैमानिक दलाचा उपयोग नुसत्या युध्यमान फौजेपुरताच न राहतां त्यास न लढणाऱ्या भागांतील शत्रुप्रजेला त्राहि भगवन् करितां येई व अशा प्रकारें त्यांजवर शरणापन्नतेचा प्रसंग आणून शत्रुसैन्यास युद्धपराङ्मुख करण्यास भाग पाडतां येई.

कोणत्याहि उघड्या जागेवरून रणगाड्यांना फिरतां आल्यानें त्यांना पक्क्या रस्त्यांची मुळींच गरज नसते, व म्हणून पायदळ सैन्याप्रमाणें एकाच रेषेंत राहून न लढतां रणगाडे अधिक जागा व्यापूं शकतात. युद्धशास्त्रांत भौतिक शास्त्रांची भर पडल्यामुळें त्यांत कल्पनातीत क्रान्ति घडलेली दृष्टीस पडते. त्यामुळें पुढील धोरण आखतां येतें तें असें कीं—

( १ ) यांत्रिक पद्धतीमुळें पुढें होणाऱ्या युद्धांत जीवहानि व वित्तहानि पूर्वीं-इतकी न होतां तिचें प्रमाण कमी होईल, व पूर्वकालच्या युद्धांतील शारीरिक हानीपेक्षां नूतन पद्धतीनें शत्रूचें मन व ज्ञानतंतु यांजवर अधिक परिणाम होईल, व त्याचा परिणाम शत्रुपक्षाच संघटन व उत्साह यांचा नाश करण्यांत होईल.

( २ ) पूर्वींप्रमाणेंच शत्रूचे सैन्याचा पराजय होण्याऐवजीं शत्रुपक्षीय प्रजेचीं अंतःकरणें भीतीनें व्याप्त होतील, म्हणजे बाह्याङ्ग अथवा कवटीला हात न लावतां फळांतील गीर घ्यावा, तद्वत् शत्रुपक्षाचा गाभाच हातीं येऊं शकेल. शत्रूचें मुख्य साधन म्हणजे अन्न व सैनिक यांचा पुरवठा, यावरच त्यानें घाव घालतां येतो. मुलकी लोकांचें सरकार तयार होतें व सरकार अस्तित्वांत राहि-ल्यास तें अधिकार गाजवून युद्ध सुरू ठेवतें. मुलकी लोकांवर आघात होतांच ते ओरडूं लागून आपलें सरकारावर दडपण आणून युद्ध सुरूं ठेवतात तसेंच मुलकी लोकांवर आघात होतांच ते ओरडूं लागून आपलें सरकारावर दडपण आणून युद्ध बंद पाडूं शकतात, व म्हणून नवीन युद्धपद्धतींत मुख्य सैन्यापेक्षां आक्र-मणाचें मोटें दडपण न लढणाऱ्या मुलकी लोकांवरच अधिक पडतें.

( ३ ) यामुळें पूर्वींप्रमाणें मनुष्याच्या संख्याबलावर युद्ध जिंकणें, समोरा-समोर उभें राहून युद्ध करणें या पद्धाति सोडून यापुढें जमिनीवर रणगाडे व आकाशांत मोटरशक्तानें चालणारीं विमानें यांचें सहकार्य घडवून शत्रुपक्षावर आपली मात करून त्यांस शरण आणावयाचें व माणूस व मालमत्ता यांचें फारसें नुकसान न करतां सुखासमाधानानें तह व तो टिकाऊ घडवून आणावयाचा.

हें सर्व व्हावयाचें म्हणजे जुनी लढाऊ युद्धपद्धति व युद्धनीति बदलून आधुनिक पद्धतीचा प्रसार करावयास पाहिजे, व तो प्रसार झाल्यामुळें जगतां-तील सर्व राष्ट्रांच्या सैन्यांची प्रगति कमी अधिक प्रमाणांत याच दिशेनें झाली हें पुढें सहज लक्षांत येईल. १९१९ च्या तहपरिषदेनंतर शस्त्रसामग्रींत काय फरक झाला तो पाहूं.

१९१९ च्या व्हर्साइच्या तहानंतर जी तात्पुरती शांति झाली ती अखेर तात्पुरतीच ठरून एका अभूतपूर्व महायुद्धानन्तर त्याला मागें टाकूं पाहणाऱ्या दुसऱ्या महायुद्धाची सिद्धता झाली असेंच म्हणावें लागतें ! व्हर्साइच्या तहानंतर युरोपांत वरून शांतता दिसत होती, व ती टिकेल असें वरवर दिसे. १९३४ मध्यें युरोपमधील सर्व स्वतंत्र राष्ट्रांचे सत्ताधीश असें म्हणत कीं निदान दहा वर्षें तरी युद्ध व्हावयाचें नाहीं. असें म्हणणारांत सिनॉर मुसोलिनी, डॉ. बेनिस, हंगेरीचे रीजंट, जुगोस्लाव्हिया व बल्गेरियाचे राजे हे सर्व एकाच मताचे होते. परंतु १९३२ नंतर जर्मनीनें आपल्या देशांत चालू केलेल्या शस्त्रवाढीमुळें हें भविष्य खोटें ठरलें, व सर्व राष्ट्रें सुसज्ज बनून कोणी रणांगणावर जाऊन बसले होते, तर कोणी बोलवणें येतांच जाण्याच्या तयारींत होते. अशा वेळीं गेल्या वीस वर्षांत (१९२० ते १९४० ) युद्धनीतींत व युद्धकलेंत काय फरक झाला तो दृष्टीखालून घालणें अवश्य आहे. आपण शस्त्रसामग्रींत व युद्धसामग्रींत मागें पडून कामाचें नाहीं हें पाहून जर्मनीनें यापुढें आपलें शस्त्रवाढीचें धोरण ठरवून त्याप्रमाणें आरंभ केला, व आतांपावेतों याच दिशेनें या राष्ट्रानें फार प्रगति केली, व त्याचप्रमाणें इतर राष्ट्रांनींहि आपली सुसज्जता वाढविली. हें धोरण कोणतें व तें कसें पार पडलें हें संक्षेपतः पाहिलें पाहिजे. मनुष्यहानि विशेष होऊं न देतां व कालाचा फारसा व्यय होऊं न देतां शत्रूवर मात करतां यावी हा नूतन युद्धपद्धतीचा विशेष आहे, व यासाठीं कोणतींहि कामें करावयाचीं तीं ठरल्यावेळीं व ठरलेल्या मुदतींत म्हणजे पूर्वनियोजित " टाइमटेबलास " अनुसरून पार पाडण्याची व्यवस्था करण्यावर अवलंबून राहील. याकरितां वाहनाची गति व वेग हीं वाढविलीं पाहिजेत. म्हणून १९१४ च्या महायुद्धांत शेवटीं शेवटीं कमी पडलेली युद्धसामग्री म्हणजे यंत्रसिद्धता वाढवावी असें ठरून रणगाडे, मशिनगन्स व विमानें वाढवून त्यांची गति व वेग वाढविण्याचे शोध सुरू झाले, व आज रणगाडे व वैमानिक दल यांच्या सुसज्जतेवर राष्ट्रांच्या स्वातंत्र्याचें अस्तित्व राहूं शकतें असें दिसूं लागलें आहे. हें प्रमाण कोणत्या देशांत केवढें होतें तें पाहूं.

जर्मनांपासून पुनः आपणांस उपसर्ग पोहोंचूं नये म्हणून फ्रेंचसरहद्दीवर विशिष्ट प्रकारचें तटबंदीचें धोरण आंखून शत्रुसैन्यास आंत शिरतां न यावें म्हणून फ्रेंच व जर्मन राष्ट्रांचें सरहद्दीवर फ्रेंचांनीं मॅगिनो लाइन बांधून तटबंदी केली. यास तोड म्हणून जर्मनांनीं आपल्या भागांत सीगफ्रीड लाइन बांधून आपली रण-

गाड्यांची संख्या वाढविली, रशियानें आपल्या वैमानिक दलाची जय्यत तयारी केली; व ब्रिटिशांनीं आपलें आरमार तयार ठेविलें. याप्रमाणें प्रत्येक मोठ्या राष्ट्रास आपल्या सुरक्षिततेसाठीं एकेक बाजू संभाळावी लागली, पण बाकीच्या सैनिक विभागाचें व विशेषत: वैमानिकदलाचें काय ? याचें उत्तर इटालो-ॲबीसीनियन युद्ध होय. स्पेनमधील अन्तस्थ यादवीचें युद्ध व सायनो-जपानी युद्ध यांनींहि या प्रश्नाचें उत्तर दिलेंच आहे. वैमानिकदलाचें महत्त्व इटलीनें ॲबीसीनियन युद्धांत पटवून दिलें असून स्पॅनिश राज्यक्रान्तींतहि जर्मनीच्या वैमानिक दलानें केलेली कामगिरी सर्वांच्या पुढेंच आहे. वैमानिक दलामुळें जपानला चिनी फौज मागें रेटतां आली. यापुढें ही युद्धसामग्री ज्या राष्ट्रांचे हातीं असेल तीं राष्ट्रेंच आपलें अस्तित्व टिकवूं शकतील, व या ठिकाणीं जगावयाचें असेल तर इतर बलिष्ठ राष्ट्रांप्रमाणेंच प्रत्येक राष्ट्रास कमीअधिक प्रमाणांत याच दिशेनें आपली सुसज्जता राखणें अवश्य आहे. याकरितां आज युरोपांतील राष्ट्रांच्या बलाबलाची सुसज्जता पाहूं या.

## वॉर पोटेन्शल—युद्धसामर्थ्य.

प्रत्येक राष्ट्राचें युद्धसामर्थ्य तीन गोष्टींवर अवलंबून असतें, ( १ ) मनुष्यबळ, ( २ ) आर्थिक अनुकूलता, व ( ३ ) या दोहोंना दिलेलें लष्करी स्वरूप. ज्या देशांत या तीन साधनांचें वैपुल्य व साहचर्य असेल तोच देश युद्धसामर्थ्याचे बाबतींत तयार आहे असें म्हणतां येईल. नुसतें मनुष्यबल असून कामाचें नाहीं, कारण या सर्वांस कार्यक्षम करण्यास त्यांना पोसणें अवश्य व पोसावयाचें म्हटलें कीं अन्नाचा भरपूर पुरवठा व लढण्यासाठीं युद्धसामग्री यांची सिद्धता आलीच. याकरितां युध्यमान राष्ट्रांस मनुष्यबलाचे मागें आर्थिक साधनांचेंहि वैपुल्य असेल तरच तें राष्ट्र टिकाव धरूं शकेल व म्हणून युद्धसामर्थ्याचा पाया म्हणजे आर्थिक संपन्नता होय. औद्योगिक सामर्थ्यापेक्षां आर्थिक अनुकूलता अधिक महत्त्वाची आहे, कारण कारखान्यांस लागणाऱ्या जिनसा म्हणजे कच्चा माल व अन्न या दोन बाबी म्हणजेच आर्थिक साधनसामर्थ्य. पूर्वीच्या लष्कराला लागणाऱ्या जिनसा कशातरी जमवितां येत, परंतु नवीन युद्धनीतीमध्यें यंत्रसामर्थ्य व रासायनिक पदार्थ वापरूं लागल्यामुळें नवीन पद्धतीच्या सैन्यासाठीं कच्च्या मालाची अधिक जरूरी लागते, व युद्धास लागणारा सर्व प्रकारचा कच्चा माल ज्या उद्योग-

प्रधान देशांत अधिक प्रमाणांत होतो तोच देश अधिक संपन्न व सामर्थ्यशाली ठरतो.

दोन देश औद्योगिक सामर्थ्यांत तुल्यबल असतां त्यांपैकीं ज्या देशांत मनुष्यबल व आर्थिक संपन्नता ( म्हणजे अन्न व कच्च्या मालाचा पुरवठा ) अधिकीची असेल तो देश अधिक सामर्थ्यवान, व जास्त दिवस टिकाव धरूं शकतो. रशिया व जर्मनी या दोन्ही देशांनीं औद्योगिक संपन्नता ( industrial potentials ) सारखी वाढविली असूनहि कच्च्या मालाचें उत्पादन व वाढतें राखीव मनुष्यबल यांचा पुरवठा रशियाला अधिक असल्यामुळें रशियाचें युद्ध-सामर्थ्य जर्मनीपेक्षां अधिक आहे असें म्हटलें पाहिजे. रशियानें अंगिकारिलेल्या पंचवार्षिक आर्थिक पद्धतीनें ( Five Years Plan ) युरोपस्थ राष्ट्रांच्या युद्धसामर्थ्यमापनांत क्रान्तिच घडवून आणली आहे हें खरें. तरी केवळ आर्थिक साधनसंपन्नतेवरच राष्ट्राचें युद्धसामर्थ्याचें मोजमाप ठरविणें चुकीचें होईल. आर्थिकसाधनसंपन्नता उच्च प्रकारची असूनहि लढाऊ राष्ट्रांत यद्धप्रवणतेची अवश्यकता असते. सर्व साधनें असूनहि अंगीं लढण्याची वृत्ति कमी असेल तर तें राष्ट्र फार वेळ टिकाव धरूं शकत नाहीं, याची साक्ष आपलें विजयानगरचें वैभवशाली राज्यच देईल ! शेजारच्या मुसलमान राजांनीं स्वारी केली कीं त्यांच्याशीं युद्ध न करतां लक्षावधि रुपयांचे नजराणे देऊन त्यांचे हल्ले परतविण्याच्या धोरणाचें इंगित म्हणजे विजयानगरची बलहीनता होय हें मुसलमान लोकांच्या लक्षांत आलें व या सामर्थ्यहीनतेचा फायदा घेऊन मुसलमान राजांनीं दिवंगत लक्ष्मी व वैभव भोगणाऱ्या विजयानगरच्या राज्याचा अंत केला ! याकरितां युद्धांत यश मिळवावयाचें असेल तर केवळ शिरगणतीनें म्हणजे संख्येनें काम न साधतां त्यांत युद्ध करण्याची सिद्धता—कडेकोट लष्करी तयारी हीहि सैनिकांत असली पाहिजे. नूतन युद्धपद्धतींत संग्रामाचे सुरुवातीलाच अगणित मनुष्यबल व आर्थिक साधनांची व शस्त्रसामुग्रीची जुळवाजुळव फार मोठ्या प्रमाणांत करावयास पाहिजे, व हें ज्यास तडकाफडकी करतां येईल त्यानेंच यशाची अपेक्षा करावी. १९१४ चे महायुद्धांत आरंभाला जर्मन सैन्यांतील १०० डिव्हिजन्सला दिलेल्या मशिनगन्सपेक्षां अधिक संख्या आज त्याच सैन्याच्या ५ डिव्हिजन्सला पुरविण्यांत आल्या आहेत. पुढील होणाऱ्या युद्धांत वरील तत्त्वांना मान्यता मिळेल असें जनरल व्हॉं मेत्झ Vow Metzsch

व सोव्हिअट युनिअनचा लष्करी तज्ज्ञ स्वेत्शिन Svietshin यांचें मत आहे. मेत्झ म्हणतो, "युद्ध पुकारतांच ज्या प्राथमिक चकमकी होतील त्यांचें यशापयश देशाच्या लष्करी सज्जतेच्या व विशेषतः देशांतील लष्करी शिक्षणानें सज्ज असलेल्या रिझर्व्हसच्या, तसेंच युद्धास लागणाऱ्या भरपूर युद्धसामुग्रीच्या पुरवठ्यावर अवलंबून राहील." तसेंच स्वेत्शिन म्हणतो "आधुनिक शस्त्रांचा अगणित सांठा युद्धांत एकदम पुरविला पाहिजे. अगणित सांठा ही शक्ति असून तिचा पुरवठा हात राखून ठेवून करतां कामा नये. या दृष्टीनें युद्धांत प्रयोग व मितव्यय उपयोगी नाहीं." (Modern weapons must be flung in the battle at once and in great numbers. They represent a force which must not be expended in driblets. In this sense there must be no economy and no experiments in battle.") याचा अर्थ सर्व तयारी म्हणजे मनुष्यबल आणि औद्योगिक सामर्थ्याचें लष्करीकरण यांची जुळवाजुळव युद्ध जुंपल्यावर करीत न बसतां युद्धास प्रारंभ होण्यापूर्वीच करून ठेवणें अवश्य आहे. या दृष्टीनें पाहतां आजची युद्धाची तयारी १९१४ चे युद्धाचे तयारीपेक्षां प्रत्येक राष्ट्रानें कितीतरी पटींनीं अधिक केलेली आहे. आधुनिक युद्धसामर्थ्याचे बाबतींत वेळेला (Time) अतिशय महत्त्व आहे. जनरल कलमन या फ्रेंच लष्करी तज्ज्ञाच्या मतें युद्ध पुकारल्यानंतर गोळे शेल्स वगैरे अपरिमित प्रमाणावर तयार करण्यास जवळ जवळ सहा महिने लागले, व तोफा अत्यन्त मोठ्या प्रमाणावर ओतण्यास तर जवळ जवळ एक वर्ष लागलें. त्याचप्रमाणें अतिशय प्रचण्ड प्रमाणावर लढाऊ वैमानिक दल तयार करण्यास १९१६ मध्यें प्रारंभ झाला. परंतु नूतन कालांत मात्र ही स्थिति राहिली नसून युद्ध पुकारतांच लष्कराच्या सर्वांगांत माणसें, शस्त्रें, अन्न व इतर साधनें यांची चंगळ उडेल व सामग्री नाहीं म्हणून फुकट वेळ जाणार नाहीं. याप्रमाणें गेल्या वीस वर्षांत सर्व युद्धनीतींतच क्रान्ति झाली असून तिचा परिणाम त्या त्या देशांवर झालेला आहे. जर्मनी व रशिया या दोन राष्ट्रांनीं आपल्या राष्ट्राची लष्करी सुसज्जता राखण्यासाठीं आपल्या सर्व आर्थिक पद्धतीला लष्करी वळण दिलें असून औद्योगिक कारखान्यांनाहि लष्करी धोरणाशीं जोडून दिलें आहे, व यामुळें शांततेच्या काळींहि कारखान्यांस स्वतंत्रता नसून त्यांस लष्करी सुसज्जतेसाठीं सर्व माल तयार करावा लागतो व कारखान्यांतील यंत्रसामग्रीहि लष्करी धोरणास अनुसरून उत्पन्न करावी लागते. अमेरिकेचें औद्योगिक

सामर्थ्य जर्मनी व रशियाच्या. औद्योगिक सामर्थ्याहून कितीतरी श्रेष्ठतेला गेलें आहे, परंतु यामुळें या दोन राष्ट्रांपेक्षां अमेरिका युद्धसामर्थ्यांत मोठी आहे असें म्हणतां येत नाहीं. याचें कारण हेंच कीं औद्योगीकरण व आर्थिक बळ या बाबतींत अमेरिका इतर राष्ट्रांपेक्षां श्रेष्ठ असली तरी आज सैनिक बळांत म्हणजे सुसज्ज सैनिकांचे गणतींत रशिया व जर्मनी यांचाच क्रम वर लागेल. यामुळें युध्यमान राष्ट्रास जय मिळवावयाचा असेल तर त्यास राष्ट्राची सर्व संपत्ति म्हणजे कच्चा माल, मनष्यबल, व औद्योगिक सामर्थ्य या सर्वांची वाढ अपरिमित करणें अवश्य आहे. या दृष्टीनें पाहूं गेल्यास आज राष्ट्राराष्ट्रांतील भेद सहज कळण्या-सारखा आहे. सर्व युध्यमान राष्ट्रांमध्यें जर्मनी व रशिया हे आर्थिक सामर्थ्य व युद्धसामर्थ्य या बाबतींत सर्वत्र श्रेष्ठ आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं, व त्यांतहि रशियाचा नंबर वर लागेल. याचें कारण हें कीं जर्मनी व रशिया हे दोन्ही औद्योगिक सामर्थ्यांत समसमान असले तरी मनुष्यबल व कच्चा माल रशियाइतका जर्मनीजवळ नाहीं व शिवाय जर्मनीनें शस्त्रास्त्रवाढीला प्रारंभ करण्यापूर्वींच रशियानें त्या दिशेनें आपलें बल वाढवून ठेविलें आहे. रशियांत निसर्गसंपत्ति म्हणून खनिज द्रव्यें व अन्नसामग्री, लोकसंख्या आणि औद्यो-गिक कारखाने यांची वाढ प्रथमपासूनच भरमसाट व लष्करी सामर्थ्य या दृष्टीनें केली असल्यानें आज या सर्व बाजूंनीं रशिया सर्वांत श्रेष्ठ राष्ट्र आहे. दुसरें सदर म्हणजे आर्थिक सामर्थ्य हें श्रेष्ठ असूनहि युद्धसामर्थ्याचें लष्करीकरण न केलेलीं राष्ट्रें म्हणजे इंग्लंड व फ्रान्स. या दोन्ही राष्ट्रांस आर्थिक संपन्नतेंत (म्ह. पैसा व कच्चा माल) कोणी जिंकूं शकत नाहीं, पण या राष्ट्रांनीं जर्मनी व रशिया प्रमाणें आपल्या देशांतील औद्योगिक विभागास १९३८ पर्यंत लष्करी वळण दिलें नाहीं. या राष्ट्रांजवळ कच्चा माल व मनुष्यबल यांचा सांठा वरील दोन्ही राष्ट्रांपेक्षां कोणत्याही तऱ्हेनें कमी नसून त्यांनीं आर्थिक, औद्योगिक व मनुष्य-बळास लष्करी वळण दिलें नाहीं यामुळें या दोन्ही राष्ट्रांजवळ युद्धारंभीं लष्करी सामर्थ्य कमीच राहिलें. तिसरें सदर म्हणजे ज्यांस आर्थिक सामर्थ्य जेमतेम, परंतु ज्यांनीं आपल्या राष्ट्रांचें युद्धबळ बऱ्याच अधिक प्रमाणांत वाढविलें आहे यांत इटली व जपान हीं राष्ट्रें येतात. या राष्ट्रांनीं आपल्या देशांतील माणसांचें लष्करी सामर्थ्य वाढविलें असलें तरी यांचेजवळ इतर साधनसामग्री म्हणजे आर्थिकबल व कच्च्या मालाचा पुरवठा हीं पुरेशीं नसल्यानें या राष्ट्रांस लष्करी

सामर्थ्य असूनहि त्यांची उपासमार होण्यास मुळींच उशीर लागावयाचा नाहीं. याप्रमाणें पाहूं जातां युद्धांत मनुष्यबळ प्रचण्ड असूनहि इंग्लंडपुढें जपान व इटली यांस नमावेंच लागेल, यानंतर राहिले जर्मनी व रशिया. या दोन राष्ट्रांत युद्धसामर्थ्याच्या दृष्टीनें वरवर जरी तुल्यबलता दिसली तरी जर्मनीला कच्चा माल व पैसा या दोन गोष्टींचा तुटवडा युद्ध जसजसें लांबेल तसतसा पडल्याशिवाय राहणार नाहीं. इंग्लंडला वसाहतींचें पाठबळ, व आरमारीबळाचे जोरावर आपली उपासमार थांबवितां येईल, परंतु जर्मनीला तसें बल नसल्यानें अखेरीस त्याला आर्थिक अडचण उत्पन्न होईल, व मग उपासमार झाल्यानें मागें घ्यावें लागेल असा कयास बांधण्यास हरकत नाहीं. परंतु युद्धाची तयारी प्रथमपासूनच ठेवल्यामुळें युद्धारंभीं त्याची सरशी होण्याचा संभव, व तसाच प्रकार गेल्या वर्षांत झालासुद्धां. चौथें सदर म्हणजे ज्या देशांत औद्योगिक सामर्थ्य बेताचेंच व लष्करी सामर्थ्य मध्यम प्रतीचें. या सदरांत युरोपांतील पौर्वात्य लहान लहान राष्ट्रें येतात, उ० ज्युगोस्लाव्हिया, रुमानिया, पोलंड वगैरे.

## शस्त्रास्त्रसुसज्जता

१९३९ साल लष्करी बाबतींत १९१४ सालापेक्षां कितीतरी पटीनें पुढें गेलें होतें. आज १९१४ पेक्षां पंधरा ते वीस पट अधिकीनें मशिनगन्सचा पुरवठा सैन्यांत वाढला असून तिपटीनें तोफखान्यांची वाढ झाली आहे, व पूर्वीं माहित नसलेलीं व आज अस्तित्वांत आलेलीं शस्त्रास्त्रें जसें रासायनिक युद्धकला ( chemical warfare ), युद्धविमानें व रणगाडे वगैरेंची गणती करणें जवळजवळ अशक्यच आहे. रणगाड्यांची संख्या १९१८ मधील म्हणजे युद्धसमाप्तीच्या काळापेक्षां आठदहा पटींनीं अधिक वाढली आहे, व शिवाय नवीन शस्त्र म्हणजे Automatic canon हें आज हाताशीं आहे. शस्त्रसंख्याबलाबरोबरच शस्त्रांचे गुणहि वाढले आहेत. पूर्वींचे रणगाडे ताशीं ३-४ मैल चालत असत व फिरतीचा पल्ला १८-२० मैल असे, पण आजच्या रणगाड्यांच्या गतीचें मान दर ताशीं ३० ते ३५ मैल असून त्यांचा काम करण्याचा पल्ला १८० मैलांपर्यंत वाढला आहे ! १९१८ ची वैमानिक गति ताशीं ७५ ते १०० मैल असे, व फिरतीचा पल्ला १५० ते १८० मैल होता, पण आज वैमानिक गति तासाला २५० ते ३०० मैलांपर्यंत वाढलेली असून त्यांच्या फिरतीचा पल्ला ७०० पासून २०००

मेलांपर्यंत पोहोंचला आहे ! ! याप्रमाणें शस्त्रांची कार्यक्षमता म्हणजे प्राणसंहारकता अत्यन्त वाढली असून सैन्याची हालचाल व युद्धनीतिबल हींहि अधिक वाढलीं आहेत. युरोपांतील पहिल्या प्रतीच्या सैन्याकडे पाहतां त्याचे जवळ अंदाजें २५ हजार विमानें, ३० हजार रणगाडे, ५० हजार गन्स, २ लक्ष मशिनगन्स तयार सांपडतील ! व याप्रमाणें प्रथम भेटीला गोळीबार करण्याची शक्ति मोठ्या प्रमाणांत वाढलेली दिसून येते. महायुद्धाचे अखेरीस युद्धसामग्री तयार करण्यासाठीं जी कारखान्यांची तयारी असे, व जितकी शस्त्रसंख्या १९१८ अखेर तयार करतां येई तितकी एकदम नवीन युद्ध सुरू झाल्यास पहिल्या महिन्यांतच करतां येईल अशी व्यवस्था कारखान्यांतील यंत्रकलांत ठेवण्यांत आली आहे. मोटरशक्तीचा उपयोग सबंध लष्करांतील विभागांत सरास करण्यांत येऊं लागल्यानें व यंत्रकलेचा उपयोग शस्त्रवाढीकडे झाल्यानें आज युद्धपद्धतींत फार मोठी क्रान्ति घडून आली आहे. पूर्वींचें पायदळ व घोडदळ जाऊन त्यांचे जागीं मोटर कॅव्हलरी व मोटर पायदळ आजच्या सैन्याच्या हालचालींत दिसतात. पूर्वीप्रमाणें रूटमार्च करीत रस्ते पायानें न तुडवितां मोटारींतून भराभर पायदळाची हालचाल सुरू होते, व केवळ जमिनीवरच नाहीं तर अंतरिक्षांतूनहि पायदळाची हालचाल होऊं लागली आहे, व त्यासाठीं रशियन लष्करांत तर स्पेशल वैमानिक पायदळ व वैमानिक लढाऊ सैन्याचे विभाग ठेवण्यांत आले आहेत. याचप्रमाणें पूर्वीचे तोफखाने अवजड प्रकारचे होते, व त्यांची हालचालही अवघड असे; पण आजचे तोफखाने गतिसुलभ व पायदळाचे बरोबरीनें जलद गतीनें जाण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. या सर्वांचा परिणाम काय होईल याचा कयास लष्करी तज्ज्ञांच्या मतेंच पाहणें रास्त होईल.

१९१८ मध्यें विमानांची मारकशक्ति व चलनशक्ति फार कमी असे, व त्यामुळें जर्मनीनें ह्यावर्षीं केलेल्या पॅरिसवरील वैमानिक हल्ल्यांत १५ टन बॉंब टाकल्यावरहि जखमी व मृत माणसांची संख्या फक्त ८६९ च भरली. तसेंच इंग्लंडच्या अनेक शहरांवर १११ वेळ हल्ले चढवूनहि त्यांना जखमी व मृत असे फक्त ४८०० च करतां आले. पण आज ही परिस्थिति राहिली नसून विमानांच्या यांत्रिक पद्धतींत, ठेवणींत, गतींत व अंतरिक्षांतील वातावरणावर ताबा मिळविण्याचे बाबतींत फारच प्रगति झालेली आहे. त्यामुळें आज शत्रुप्रदेशा-

गात करण्याची शक्ति या यांत्रिक सहाय्यानें वाढल्यामुळें इटॅलियन जनरल

डूहे Douhe याच्या मतें १०००बॉंबर्स ठेवणाऱ्या राष्ट्रास इतर राष्ट्रांवर सहज विजय मिळवितां येईल. इंग्रज तज्ज्ञ जनरल ग्रव्हज् याच्या मतें ५०० उत्तम बॉंबर विमानांच्या योगानें जर्मनीचे शस्त्रास्त्रोत्पादक कारखाने सहज बंद पाडतां येतील. कर्नल व्हॉं ब्युलो हा जर्मन १९३८ मध्यें जर्मनीच्या लष्करी मासिकांत (१९३६) म्हणतोः--" आज कोणाच्याच देशांत असा प्रांत किंवा जिल्हा नाहीं कीं ज्यावर शेजारच्या शत्रुपक्षाच्या सैन्याचा हल्ला चालूं शकणार नाहीं." आज डूहे किंवा जनरल ग्रव्हज् यांच्या मताला फारशी किंमत नाहीं, कारण त्यांचा अंदाज फारच कमी पडतो, व आज फ्रेंच, जर्मन किंवा सोव्हिएट रशियन लष्करी वाङ्मयाकडे दृष्टि टाकली तर वैमानिक दलांत सर्व प्रकारचीं वैमानिक यंत्रें १० हजार पर्यंत एकदम रणांत उभीं करणें अगदीं सुलभ झालें असून यांत ३ हजार ते ४ हजार बॉंबर्स सहज पुढें करतां येतील असें मत दिसतें.

याप्रमाणें आज वैमानिक दल हा सैन्यांत एक नवा विभाग असून त्याकडे हल्ल्याचें कार्याचें प्रमुखत्वहि देण्यांत येत असलें तरी सैन्यांतील इतर विभागांस स्थान नाहीं हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. युद्धांचे सुरुवातीसच एकदम वैमानिक हल्ला चढवून गैरसावध राष्ट्रास आपत्तींत आणणें शक्य असलें तरी तेवढ्यानें कार्यभाग साधणार नसून जिंकलेल्या देशाचें शत्रूच्या हल्ल्यापासून संरक्षण करण्यास, व वैमानिक दळाचा तळ जिंकलेल्या भागांत सुरक्षित ठेवण्याचें काम इतर सैन्य विभागास पडेल, व त्यांतल्या त्यांत विशेषतः याचा बोजा मोटारित सैन्य व यांत्रिक रणगाडेदल यांवर अधिक पडणार हेंहि स्पष्टच आहे, व म्हणून कोणत्याहि राष्ट्रास सामर्थ्यवान वैमानिक दलाचा कितीहि उपयोग असला तरी केवळ त्या एकाच विभागावर विसंबून न राहतां त्याबरोबरच रणगाडे व मोटारित दल हे विभागहि मोठ्या प्रमाणांत वाढविणें अवश्य आहे. आणि म्हणूनच आज युद्धेच्छु राष्ट्रें आपलें रणगाडादळ मोठ्या प्रमाणांत वाढवीत असून पहिल्या हल्ल्यांत या सैन्यविभागाकडून सुसंघटित व खात्रीलायक कामगिरी कशी करवून घेतां येईल या विचारांत आहेत. रणगाडेदलाचे १० विभाग व प्रत्येकीं ५००० रणगाडे याप्रमाणें सैन्य सुसज्ज ठेवण्याची धडपड सुरू आहे. आधुनिक युद्धांत रणगाड्याचा उपयोग अधिकांत अधिक कसा करतां येईल याविषयीं फ्रेंच लष्करी तज्ज्ञ कर्नल लॅन्सनचें मत पुढील प्रमाणें आहे. तो म्हणतो, " युद्धाचा पुकारा होतांच जर एखादें राष्ट्रास युद्धभूमीवर प्रथमारंभींच ८ ते १० यांत्रिक दलें पाठवितां

आली तर त्यांची आक्रमक शक्ति इतकी वाढेल कीं सद्यःस्थितींत तिचा प्रतिकार करणें इतर राष्ट्रांस अशक्य होईल; या तत्त्वावर विचार करतां अशा सुसज्ज सैन्याचा युद्धारंभ म्हणजे त्या राष्ट्राची खात्रीलायक यशस्वी युद्धसमाप्तिच होय. " कर्नल लॅन्सचें हें मत बरोबर दिसतें.

## फिरतें युद्ध ( War of movement ) कीं स्थायी युद्ध ( Positional warfare )

पूर्वींचीं युद्धें प्रथमतः स्थायी अथवा तळ देऊन बसणारीं असत. त्यामुळें त्या युद्धांत प्रारंभीं लहान लहान चकमकी होत, व मनुष्यबळ व शस्त्रास्त्रें यांची जुळवा-जुळव मागाहून करतां येई. पण यापुढील युद्धांच्या हालचालींची ठेवण अजिबात बदलली असल्यानें यापुढें स्थायी युद्ध फारसें न होतां फिरतीं युद्धें अथवा ज्यांत चलनक्षमतेचा अधिक अवलंब करतां येईल अशा लढाया होतील असें आधुनिक लष्करी तज्ज्ञांचें मत आहे. वैमानिक दल व रणगाडे यांचा भरपूर सांठा असल्यानें युद्ध स्थायी किंवा अचल न राहतां तें गमनशील अथवा फिरतें राहील. याचें कारण शस्त्रसामर्थ्यांत विमानें व रणगाडे यांची पडलेली भर हें होय. या संबंधांत वेगळाले तज्ज्ञ काय म्हणतात तें पाहूं. जर्मन जनरल व्हॉं मेत्श म्हणतो, "मागील जागतिक युद्धांत सर्व बाजूंवरील युद्धआघाडीवर केलेल्या स्थायी युद्धपद्धति आतां अजीबात सोडल्या पाहिजेत. कांटेरी तारेच्या कुंपणाची दिक्कत ही कांहीं अनुल्लंघनीय अडचण वाटणार नाहीं. जमिनीवर पेरून ठेवलेले स्फोटक बॉंब फुटण्यापूर्वींच ओळखतां येऊन दूर सारतां येतील. खंदकांत वरून वायूची प्रेरणा करतां येईल, व वायु-संरक्षक मुखवट्यांचा तितकासा उपयोग होईलसें वाटत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे भावी युद्धांत स्थायी युद्धपद्धतीला फारसा वाव मिळणार नाहीं," वगैरे. ( Military Strength of Powers, p. 30. ) ह्याच सेनापति पुढें म्हणतो, " भावीयुद्ध १९१४ ते १९१८ च्या महायुद्धाहून वेगळें होईल. भावी युद्धाचें मुख्य तत्त्व म्हणजे जमीन व अंतरिक्ष यांजवरील अमर्याद चलनक्षमता होय; अशा युद्धांत अचुक यश ज्या जागीं निश्चित मिळेलसें वाटतें त्या ठिकाणीं अगणित युद्धसामर्थ्य एकदम एकवटतां येण्याकडेच सेनानायकांची प्रवृत्ति राहील व यामुळें भावी युद्धांत फिरत्या युद्धपद्धतीनेंच अचुक यश मिळवितां येईल, व त्याबरोबर असंख्य युद्धसामग्रीचाहि फडशा उडेल. " ( पान ३१ ) व हें बेल्जियम व फ्रान्समध्यें पूर्ण प्रत्ययास आलें.

फ्रेंच लष्करी तज्ज्ञ ॲलेहॉटाच्या मतेंहि भावीयुद्ध १९१४ ते १९१८ च्या स्थायीयुद्धाप्रमाणें होणें अशक्य आहे. फ्रेंच मॅगिनो लाइन व जर्मन सिगफ्रीड लाइन या सरहद्दीवर संरक्षक बांधणी असल्यानें या भागापेक्षां पूर्वयुरोपांत फिरतें युद्ध अधिक कार्यक्षम होईल. फिरत्या युद्धपद्धतीनें युद्धकाल कमी होईल व शस्त्रांचा उपयोग प्रचण्ड वाढेल. यासंबंधांत रशियन जनरल गॉलोव्हिन म्हणतो— "भावी युद्धाचें वैशिष्ट्य स्थायीच्या जागीं फिरतें युद्ध राहील. भावी युद्धांत मागच्या युद्धापेक्षां लष्करी तळाच्या हालचाली अधिक राहतील व या हालचाली बंद होण्यापूर्वींच युध्यमानराष्ट्रांमधील एकाची सरशी होऊन दुसऱ्या राष्ट्रास तहाची याचना करण्यास भाग पाडतां येणेंहि शक्य आहे."

रणगाड्याच्या दलांचा पुरस्कर्ता ऑस्ट्रियन जनरल ईमॅन्स बर्गर तर याहि पलीकडे जाऊन म्हणतो कीं भावी युद्धाचा प्रारंभ, मध्य व अंत यांच्या मर्यादा पुढीलप्रमाणें राहतील. तो म्हणतो:—" युरोपांत होऊं घातलेलें नवीन युद्ध किती काळ चालेल याचा कयास बांधावयाचें ठरविल्यास असें म्हणतां येईल कीं, ज्यास आपण यशाचा चिन्हकाळ म्हणतों तो पहिल्या सहा महिन्यांत येणार नाहीं, व त्यानंतर त्याची लांबण दुसऱ्या सहा महिन्यांपलीकडे जाणारहि नाहीं. सबंध युद्धकाळाचे तीन खंड पाडतां येतील; ( १ ) पहिले सहा महिने, ( २ ) दहा महिने अखेर, व ( ३ ) अखेरीस एक वर्ष संपल्यावर. आजच्या काळांतील लष्करी तज्ज्ञांचें युद्धपद्धतीबद्दल एकमत असें आहे कीं भावी युद्धाचे धोरणासंबंधीं मुख्य जोर गति, अचानकपणा, फिरत व हालचाली यांजवर राहील." पोलिश जनरल सिस्कॉर्स्की म्हणतो, " भावी युद्ध म्हणजे अकल्पित आणि जोरदार विपत्ति यांची जोड राहील व त्यांतून कोणाहि एका युध्यमान राष्ट्राचा पराभव संभवेल." त्याचप्रमाणें फ्रेंच तज्ज्ञ सोझे म्हणतो, " विरुद्ध बाजूकडून होणाऱ्या आकस्मिक व अचानक अपेशी युध्यमान राष्ट्रास मागचे मार्नची लढाई लढणें शक्य होणार नाहीं." पश्चिम युरोपांत फ्रान्सच्या मॅगिनो तटबंदीमुळें व जर्मनांच्या सिगफ्रीड तटबंदीमुळें या प्रदेशांत फिरत्या युद्धपद्धतीचा तितकासा जोर राहणार नसून पूर्व युरोपांतील राष्ट्रांच्या सरहद्दीच्या विशिष्ट भौगोलिक ठेवणीमुळें या भागांत मात्र या फिरत्या तळ–युद्धपद्धतीचा फार उपयोग होईल, व मध्य युरोपांत प्रिमेट ते एल्बमधील प्रांत तसेंच ड्यूना व ओडर या दुआबामधील भागांत वरीलप्रमाणें तटबंदी नसल्यामुळें तर या पद्धतीस विशेष रंग चढेल, व

शस्त्र व यंत्र-सुसज्जतेनें धांवतें युद्ध जोराचें होऊन भौगोलिक परिस्थितीमुळें या भागांतील युद्धाचा शेवटहि लौकर होईल हें खरें, व तें पोलंडच्या युद्धांत सर्वांच्या नजरेस आलेंहि आहे.

## राष्ट्रांचें बलाबल. रशियाचें वाढतें लष्करी सामर्थ्य

रशियाच्या पूर्वेतिहासांत कधींहि न घडलेली गोष्ट म्हणजे जगांतील सर्वश्रेष्ठ असें लष्कर तयार ठेवणें ही होय. राज्यक्रान्तीनंतर स्थिरस्थावर होऊन राष्ट्र-संसाराची घडी नीट बसविण्यास पहिलीं दहा वर्षें दिल्यानंतर पुढील दहा वर्षांत रशियानें आपलें लष्करी सामर्थ्य वाढविण्याची पराकाष्ठा करून आज जगतांतील सर्व राष्ट्रांच्या लष्करांत जवळ जवळ पहिला नंबर पटकाविला आहे. झार-शाहींचें रशियन सैन्य, क्रान्तिकालामधील यादवींत गुंतलेलें रशियन लष्कर व आजचें "लाल लष्कर" यांस एकमापानें मोजणें चुकीचें होईल. १९२९ नंतर रशियानें आपल्या लष्करीनीतींत दूरदृष्टीनें अमित क्रान्ति घडवून आणली आहे. हें कसें तें पाहू.

कित्येक तज्ज्ञांचे मतें रशियाचें सैन्य फक्त स्वदेशाचें संरक्षण करण्यास समर्थ असून त्यास आक्रमकशक्ति मुळींच नाहीं असें आहे, व ही मोठी चूक आहे. रशियानें १९२९ नंतर आपल्या लष्करी धोरणांत दर दोन दोन वर्षांनीं परिस्थित्यनुरूप योग्य तो बदल करून सर्व विभागांत जबर प्रगति घडवून आणली आहे, व त्यामुळें आज युद्धारंभीं प्रथम स्वतःच्या राष्ट्राच्या संरक्षणार्थ एकदम असंख्य सेनेची उभारणी करून त्यांतूनच आक्रमक राष्ट्रावर प्रतिकार करणारें सैन्य न डगमगतां कसें उभारतां येईल याचें धोरणहि रशियन लष्करी तज्ज्ञांनीं तयार करून ठेविलें आहे. फ्रान्स व सोव्हिएट यांचा जो करार झाला त्यासंबंधीं फ्रेंच डेप्युटी आर्शिबाल्दनें फ्रेंच चेंबरमध्यें १९३५ च्या वादविवादांत सांगितलें कीं, रशियाचें सैन्य स्वसंरक्षणक्षम असलें तरी त्यास प्रसंग पडल्यास फ्रेंचांना आक्रमकस्वरूपाची मदत करतां येणार नाहीं, व म्हणून या रशियन-फ्रेंच कराराचा फ्रान्सला जर्मनीचे विरुद्ध फारसा उपयोग होणार नाहीं. परंतु हें मत त्याला १९३६ च्या २३ जूनला बदलावें लागलें. त्यानंतर त्याचें भाषण पहा. तो म्हणतोः—"माझें लाल लष्कराबाबतचें यापूर्वीचें मत मीं बदललें आहे व

आतां माझी खात्री झाली कीं त्यांनीं केलेल्या फ्रान्स–रशियन कराराअन्वयें त्यांचेवर पडणारी जबाबदारी ते निःसंशय पार पाडूं शकतील. १९२४ ते १९२८ या सालांत आपलें खडें सैन्य वाढवून, सैनिकांची लष्करांतील नोकरीची मर्यादा ठरवून, त्यांस त्यांनीं युद्धनीतीचे कायदेहि करून दिले, सैनिक अधिकारी वाढविले, व लष्करी शिक्षणशाळा व विद्यापीठें स्थापन करून आधुनिक शिक्षणपद्धतीनें सुसज्जता निर्माण केली. १९३३ च्या सुमारास रशियन सैन्यांत अगदीं नवीन पद्धतीची शस्त्रसामुग्री पुरविली; व यांत्रिक-पद्धतीचाहि अवलंब सैन्यांत मोठ्या प्रमाणांत करण्यांत आला. याचें प्रत्यन्तर व्होरोशिलॉव्ह या रशियन लष्करी व्याख्यात्याचे शब्दांत सांगावयाचें म्हणजे "आम्ही आपला तोफखाना अगदीं नवीन पद्धतीचा राखला असून बाकीच्या राष्ट्रांच्या बरोबरीसाठीं आम्हीं त्यांत हॉव्हिट्झर तोफा वाढविल्या आहेत. आमच्या राष्ट्रांत अगदीं प्रथमतःच आम्ही आपला लष्करी जड तोफखाना तयार केला आहे. याशिवाय आम्ही प्रतिकारक विमानांचे कारखाने काढून त्यांतून आम्हांस पुरेशीं विमानें तयार करतां येतात, व त्याचप्रमाणें ॲन्टीटॅंक्स व टॅंकगन्स हीं आम्ही तयार करून त्यांनीं युक्त अशीं दलें उभारलीं आहेत, व शिवाय लहान-तोंडी तोफांचाहि भरणा वाढविला आहे. कारण यांचा उपयोग लहान लहान पायदळ सैन्य-विभागास फार होतो." १९३२ मध्यें रशियानें पश्चिम युरोपियन लष्करांची युद्धसामुग्रींत बरोबरी करून त्यानंतर आजवर तें राष्ट्र फारच पुढें गेलें आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. १९३५ मध्यें रशियाजवळ १०००० रणगाडे तयार होते, तर १९३८ मध्यें त्यांची संख्या १५ ते २० हजारपर्यंत वाढविण्यांत आली! यांखेरीज १०००० लढाऊ विमानें तयार ठेवून १९३९ मध्यें सर्व बाबतींत म्हणजे तोफा, रणगाडे, विमानें व मशिनगन्स वगैरे बाबतींत सर्व राष्ट्रांस मागें टाकूं ही धमक रशियानें आपल्या राष्ट्रांत उत्पन्न केली आहे. १९३७ मध्यें प्रत्येक सैनिकामागें १२ अश्वशक्तीचें यंत्रसामर्थ्य सुसज्ज असे. जर्मन जनरल ग्वीडेरिन यांच्या मतें "रशियाजवळ १० हजार रणगाडे, १॥ लक्ष टॅंकर्स व १ लक्ष इतर मोटर वाहतुकीचीं यंत्रें तयार आहेत." ही माहिती १९३५ मधली आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. रशिया, जर्मनी व फ्रान्स यांचे मनुष्यबळाचा अंदाज पुढें दिला आहे. १९३५ ते १९४० या वर्षांत तयार होणाऱ्या सैनिकांचें बळ पुढीलप्रमाणें आहेः—

| वर्ष | सोव्हिएट युनियन | जर्मनी | फ्रान्स |
|---|---|---|---|
| १९३५ | १८५०००० | ६०२००० | ३२३००० |
| १९३६ | २१७०००० | ४६४००० | २०५००० |
| १९३७ | १३४०००० | ३४५००० | १६५००० |
| १९३८ | १४६००००० | ३१०८०० | १७१००० |
| १९३९ | ११६०००० | ३२१००० | १९७००० |
| १९४० | १६७०००० | ४७३००० | २१७००० |
| | | | Max Wernur, p. 56 |

वरील आंकड्यांवरून इतर राष्ट्रांच्या मानानें रशियाचें बळ कसें वाढतें आहे हें दिसेल. या सर्वांची सरासरी काढतां १९३५ ते १९४० या पांच वर्षांत रिक्रूट–भरतीची संख्या रशियांत १६ लक्ष, तर जर्मनींत ४ लक्ष २० हजार व फ्रान्समध्यें फक्त २ लक्ष १७ हजार भरते. याचा अर्थ हाच कीं आज सबंध युरोपियन राष्ट्रांच्या दृष्टीनें केवळ शिरगणतीनेंहि रशिया मनुष्यबळांत अग्रेसर आहे. युद्धकालाचा विचार करतां खड्या सैन्यांत लागणारी रिक्रूट–भरती प्रतिवर्षी रशियांत ६॥ लक्षांची होत असते, व शिवाय २॥ लक्ष टेरिटोरीयल सैन्यासाठींहि रिक्रूट–भरती होत असते. यापैकीं फक्त अर्धा भाग युद्धांत जातो व अर्धा राखीव सैन्यासाठीं असतो. १९३६ पासून रिक्रूट–भरतीचें वय २१ काढून १९ केलें असल्यानें तर खड्या सैन्याकरितां अधिकीची रिक्रूट–भरती होणारी आहे. १९३६ मध्यें १९१४ तील सर्व, १९१५ मधील अर्धी मुलें लष्करी शिक्षणार्थ भरती केलीं गेलीं, व १९३७ मध्यें १९१५ चीं बाकीचीं अर्धीं व १९१६ चीं सबंध मुलें बोलावण्यांत आलीं. याचा अर्थ लष्करी शिक्षण देण्यासाठीं म्हणून १९३६ ते १९४० या चार वर्षांत प्रतिवर्षी सोव्हिएट रशियांत २४ लक्ष तरुण भरती करण्यांत येतील !

## जर्मनीचें लष्कर

व्हर्साय तहान्वयें जर्मनीला फक्त १ लक्ष सैन्य ठेवण्याची मुभा होती; परंतु जर्मनीचा सर्वाधिकारी हेर हिटलर यानें आपल्या हातांत सूत्रें घेतल्यानंतर

हें सर्व पालटून टाकलें, व अवमानित जर्मन तरुणांनीं लढण्यास सिद्ध झालें पाहिजे असें ठरवून आपलें लष्करी मनुष्यबळ वाढविण्यास प्रारंभ केला. प्रथम फक्त खडें सैन्य व रिझर्व सैन्य वाढवून त्यांचा परिपोष होण्यासाठीं म्हणून रिक्रूट-भरतीचें वयोमान वाढविलें व जे लष्करी विभाग इतर राष्ट्रांतील सैन्यांत होते ते प्रथमतः वाढवून इतर मोठ्या राष्ट्रांच्या बरोबरीनें सैनिक मनुष्यबळ वाढविलें, व नंतर त्यांतील विशेष उपयुक्त अथवा आक्रमिक शक्तीचा भाग जो वैमानिक दल ह्याची पुनर्घटना करून तो विभाग, तसेंच घोडदळाचे जागीं रणगाडादळ ( tank corps ) हे अतोनात मोठ्या प्रमाणांत वाढविण्यास प्रारंभ केला. त्यांत जनरल गोअरिंगनें फार पुढाकार घेतल्यानें आज वैमानिक दलास "गोअरिंगची वायुशक्ति" "Goering's Air Force" असें म्हणतात. १९३६ मधल्या जर्मनांच्या लष्करी छापील लिखाणांतून प्रसिद्ध झालेल्या आंकड्यांवरून जर्मनीजवळ एकूण ३०० विभागांचें सैन्य असून त्यांत २० मोटरित विभाग व १० कॅव्हलरी विभाग आहेत. शिवाय १०५०० रण-गाडे व ९००० विमानें आहेत असें दिसेल. १९१८ मध्यें जर्मन लष्कराचे २३६ विभाग होते. पूर्वीच्या सैनिकाहून आधुनिक सैनिकाला शस्त्रसुसज्जता व यंत्रसामर्थ्याचा पुरवठाहि अधिकीचा आहे, व यामुळें तर आधुनिक शिपाई युद्ध-सामर्थ्य साधनसंपन्न असल्यानें त्याची १९१४ ते १९१८ चे सैनिकाशीं तुलना करणें बरोबर होणार नाहीं. मागील महायुद्धाचे वेळीं जर्मन सैन्यास तितकेंसें सुसज्ज मनुष्यबळ नव्हतें, व त्यामुळें जर्मनीचा पराभव झाला असें जनरल लुडे-नडार्फ म्हणतो. " युद्धपूर्व जर्मन सैन्यांत आठ आर्मी कोअर अधिकीचे असते तर जय ठेवलेला होता ! " युद्धारंभीं जर्मनींत ५५ लक्ष लोक लष्करी शिक्षण न घेतलेले, व ६ लक्ष शिकलेले, पण लष्करांत सामील न केले गेलेले असे रिकामे ठेवल्यानें युद्धांत जर्मनीनें शें. ५४ टक्के युद्धक्षमवयाचे लोकच आघाडी-वर पाठविले होते असें हा जनरल म्हणतो. १९१४ मध्यें महायुद्ध सुरू झाल्या-वर पॅरिसवर चाल करून जाण्याकरितां निघालेल्या जर्मन फौजेंत ५५ मॉर्टर्स, २७०० मशिनगन्स व ७३३२ बंदुका होत्या. शिवाय त्यास सैन्यविभागांचे परस्परांतील दळणवळण, सिग्नल किंवा सूचक चिन्हपद्धति, व सर्वत्र हुकूम वेळे-वर अचुक पोंचविण्याची तजवीज या बाबतींत जर्मनी मागसलेलाच होता. आज त्यानें ही परिस्थिति पार बदलून टाकली असून जर्मनींत लढाऊ वयाचा माणूस

म्हणजे १८ ते ६० वर्षें यांतील प्रत्येक माणूस सरास लष्करी शिक्षण घेतलेला असून त्यास लष्करी बाबींत सर्व तऱ्हेचें शिक्षण देऊन प्रवीण केल्यानें युद्धारंभींच जर्मनीस भरपूरच नव्हे तर अप्रमाण संख्येचें मोठें सैन्य आघाडीवर टाकतां येईल अशी तयारी ठेविली आहे, व यांत वैमानिक दलविभागावर अधिक जोर देण्यांत येत होता. जर्मन लष्करीतज्ज्ञ मेजर ई बार्ट्स जर्मन वैमानिक मासिकांत म्हणतो, " आज यांत्रिक कला व सामर्थ्य वाढल्यानें युद्धारंभ–कालांतच आक्रमिक, अखण्डित व अचानक बॉंबिंग पद्धतीनें शत्रुराष्ट्राचे प्रतिकारांतील शारीरिक व नैतिक शक्तीला मोठा धक्का सहज देतां येईल. " ( Max Werner p. 136 ) जर्मनीच्या वैमानिक दलाच्या सामर्थ्याविषयीं इतर राष्ट्रांचे तज्ज्ञ म्हणतात कीं, वैमानिक दलांतील यंत्रांत शें. ५० ते ६० टक्के बॉंबर्स विमानें आघाडीच्या विभागांत सापडतील, व याचें प्रत्यन्तर जर्मनीनें स्पॅनिश सिव्हिल वॉरमध्यें दाखविलेंहि आहे. स्पेन मधील यादवीयुद्धांत जर्मनीचे वैमानिक सैनिक इटलीच्या विमानी सैनिकाहून अधिक हुषार होते व जर्मनीचे फाइटर वैमानिक दलानें तर आपल्या युद्धकौशल्याची पराकाष्ठा करून दाखविली. १९३५ मध्यें जर्मनीला फक्त ४ हजार विमानांचीच पैदास करतां आली व विमान–पैदाशी कारखान्यांची वाढ जोरानें करावयाचे जर्मनींत सारखे प्रयत्न सुरू होते. दरमहिन्यास निदान २ हजार विमानें व ४ ह. एंजिन्स तयार करतां येतील अशी कारखान्यांची पैदासशक्ति वाढवितां यावी असा प्रयत्न सुरू होता. रशियन तज्ज्ञांच्या १९३६ च्या माहितीप्रमाणें १९३७ मध्यें जर्मनीजवळ ४००० लढाऊ विमानें तयार राहून त्यांत २६०० आघाडीवर ठेवतां येतील असा कयास होता. १९३६ पर्यंत लढाऊ विमानांची यांत्रिक घडण इतर पाश्चात्य राष्ट्रांच्या मानानें कमदर्जाची होती, परंतु गेल्या दोनतीन वर्षांत जर्मनीनें या बाबतींतील आपलें सामर्थ्य वाढविलें असून टिकाऊ, लढाईंत न दगावणारीं व भरपल्ला गांठणाऱ्या विमानांची पैदास भरमसाट वाढविली आहे. १९३७ मध्यें जर्मनीनें काढलेलीं यंत्रें ब्रिटिश व फ्रेंच विमानी एंजिनांची बरोबरी करणारीं होतीं. जंकर्स ८६, लाइट फास्ट बॉंबर्स हेंकेल १११, आणि डार्नियर १७ या विमानांची दरताशीं २०० पासून २५० मैल गति होती. १९३६-३७मध्यें सर्व जुनीं विमानें काढून टाकून त्या जागीं वैमानिक दलांत अगदीं नवीन प्रतीचीं सुधारलेलीं विमानें वाढविण्यांत आलीं. जर्मन इरो-इंडस्ट्रीमध्यें इटली, इंग्लंड व फ्रान्सच्या इंडस्ट्रीहून मोटार व

इरोप्लेन कारखाने कमी असले तरी जे आहेत ते फार मोठे असून त्यांतून उत्पन्न होणारी पैदास फार मोठी आहे. जर्मन इरो इंडस्ट्रीनें असंख्य वस्तूंची पैदास हें धोरण ठेवल्यानें त्यांची मोटर व विमानांची पैदास इंग्लंड व फ्रान्सच्या कारखान्यांच्या पैदाशीहून अधिक होती असें मॅक्सवर्नरचें म्हणणें आहे. विमानांत आघाडीवर लढत घेणारीं विमानें (fighter planes), शत्रुराष्ट्रावर बाँबचा वर्षाव करणारीं हलकीं व मध्यमवजनीं (light and medium heavy bombers) व भारी बाँबर्स (heavy bombers.) हे प्रकार विमानांचे असतात. याप्रकारें लढणारीं, बाँब वर्षाव करणारीं, टेहेळणी करणारीं वगैरे जर्मन विमानें नानाप्रकारचीं असून त्यांतील उत्तम पुढीलप्रमाणें आहेत. मेसर श्मिट बी. एफ्. १०९, दि हेन्केल ११२, दि अराडो ६० व ८०, फॉकवुल्फ १५९ व ८७, व अगदीं नवीन दोन एंजिनी मेसर श्मिट १० हीं लढणारीं विमानें झालीं. शिवाय जंकर्स ८६, दि हेंकेल १११ व ११९, दि हेनशेल १२६ आणि दि अराडो ८१ हीं हलकीं व मध्यम बाँब सोडणारीं विमानें आहेत. जंकर ८९, ९०, दि फॉकवुल्फ ५७, दि डॉर्निअर १९ हीं भारी बाँब टाकणारीं असून यांशिवाय अधिकीचीं बाँब टाकणारीं विमानें म्हणजे हेंबुर्ग १३७, दि हेनशेल १२३, आणि जंकर ८७. याच प्रमाणें जर्मन हायड्रोप्लेन्स हीं उच्च प्रतीचीं असून त्यांत प्रमुख म्हणजे दि अराडो ९५, दि डार्निअर १८ ई, १८ फ व २४ हीं असून त्यांचें उड्डाणाचें क्षेत्र २००० ते ३००० मैलांचें आहे. १९३८ मध्यें झीकोस्लोव्हेकियावरील आक्रमणाचे वेळीं हिटलरनें स्वतःच जाहीर केलें होतें कीं १९३८ मध्यें जर्मनीनें आपलें वैमानिक दल दुपटीनें वाढविलें आहे. फ्रान्सचा वैमानिक माहिती देणारा पॉल रिव्हर्स याच्या मतें १९३८ च्या ऑक्टोबरमध्यें जर्मनीच्या वैमानिक दलांत आघाडीस ठेवण्यासाठीं म्हणून ४५०० ते ५००० विमानें असावींत व याच तज्ज्ञाच्या मतें १९३९-४० मध्यें जर्मनीनें वैमानिक दलांत ८००० ते १०००० विमानें आघाडीला ठेवण्याची व्यवस्था करण्याचें योजिलें होतें.

विमानाप्रमाणेंच खुष्कीच्या सैन्याच्या हालचालीसाठीं लागणारीं वाहतुकीचीं अनेक साधनें जर्मनीनें आपल्या सैन्यांत पुरविलीं आहेत. त्यांत १ लक्ष ३५ हजार लॉरीज, ४० ह. मोटर कार्स, व ६० हजार मोटर सायकल्स असून ट्रॅक्टर्सचीं संख्या कळत नाहीं. या क्षेत्रांत काम करण्यासाठीं नाझी जर्मन सैन्यांत ४ लक्ष ते ५ लक्ष सैनिक तयार असून त्यांची २१ विभागांत वांटणी केली आहे. यांखेरीज १० हजार ५ शें रणगाडेहि आहेत.

## फ्रान्सची शस्त्रास्त्रसामग्री

युरोपांत सर्व राष्ट्रांपेक्षां फ्रान्सला जर्मनीचें भय जास्त, व या दृष्टीनें फ्रान्सच्या लष्करी सामर्थ्याकडे पाहणें अवश्य आहे. १९२९ ते १९३० या अवधींत जर्मनीला व्हर्सायि तहाचीं बंधनें असल्यामुळें लष्करी बाबतींत परिस्थित्यनुरूप फ्रान्सचें लष्करी सामर्थ्य अधिक होतें; परंतु हेर हिटलरच्या उदयानंतर जर्मन लष्करी धोरण पार बदलून त्यांत एक प्रकारची विलक्षण क्रान्ति झाली, व जर्मनीनें आपल्या शस्त्रास्त्रांची असंख्य व अपरिमित वाढ करावयाचें ठरवून त्याकरितां औद्योगिक क्रान्तिहि घडवून आणिली, व त्यामुळें फ्रान्स व जर्मनी यांची लष्करी सामर्थ्यांत उलटसुलट बाजू होऊन फ्रान्स मागें पडलें. या संबंधांत फ्रेंच जनरल वेगंड १९३६ मध्यें एका फ्रेंच लष्करी मासिकांत लिहितो— "१९२८ च्या लष्करी कायद्यान्वयें ठरल्याप्रमाणें तयार असलेलें फ्रान्सचें सैन्य जर्मनीपासून आपलें संरक्षण करूं शकत होतें, कारण व्हर्सायच्या तहान्वयें जर्मनीचें लष्करी सामर्थ्य खच्चीच केलें होतें." परंतु जर्मनीनें आपली शस्त्रसुसज्जता व लढाऊ मनुष्यबळ वाढवावयाला झपाट्यानें प्रारंभ केल्यावर १९३५ मध्यें फ्रेंच तज्ज्ञ मार्शल पितें हा आपल्या पुस्तकांत लिहितो—"आमचें आजचें लष्करी बळ पूर्वीच्या तहांत ठरलेल्या फ्रेंच–जर्मन कराराप्रमाणें असलें तरी आज जर्मन–फ्रेंचांच्या लष्करी सामर्थ्यांत फार फरक झाला आहे, व आज या दोन लष्करांत पडलेला फरक फ्रान्सला मारक झाल्याशिवाय राहणार नाहीं." हें जरी सर्व खरें असलें तरी फ्रान्सनें आपलें लष्करी धोरण बदलून जें सामर्थ्य वाढविलें त्याचा आढावा १९३८–३९ च्या धोरणावरून घेतां येईल. युरोपखंडांत फ्रान्स राष्ट्र आर्थिक संपन्नतेंत बलिष्ठ असून त्यानें केवळ लष्करी सामर्थ्य वाढविण्यासाठीं ३५० मिलार्ड फ्रँक खर्च केले होते. सर्व प्रकारच्या लष्करी जिनसा, यंत्रें व मालमसाला तयार असून निमिषमात्रांत सबंध युद्धक्षम खडी फौज एकदम पूर्णत्वांत उभी करण्याचें सामर्थ्य या राष्ट्रांत होतें. युद्ध सुरू झाल्यास युद्धांत भाग घेण्यासाठीं ६० लक्ष सैन्य झेंड्याखालीं फ्रान्सला उभें करतां येतें ! व यापैकीं ४५ लक्ष लष्करी हुकमतींत तयार असलेलें राखींव सैन्य होतें. या बाबतींत सबंध युरोपांत रशियाशीं बरोबरी करणारें राष्ट्र फक्त फ्रान्सच होतें, कारण फ्रान्सच्या राखीव सैन्यांत सैनिकांबरोबर लष्करी अधिकारी देखील पूर्ण शिक्षण घेऊन तयार झालेले असे जवळजवळ २७ हजार

होते. याशिवाय फ्रान्सच्या वसाहतींत राहणारीं माणसें व सर्व कच्चा पक्का माल यांचा मनमुराद पुरवठा पुरवणीसाठीं आहे तो वेगळाच, व यांचा उपयोग फ्रान्सला वाटेल तेव्हां करतां येता. युरोपीयन राष्ट्रांच्या मानानें फ्रेंचांचें आरमारी सामर्थ्यहि दांडगें आहे, व फ्रेंच राष्ट्रांतील तटबंदी जगतांतील सर्व तटबंदींत प्रमुख व नाणावलेली होती. परंतु या सर्व गोष्टी जमेस धरूनहि १९३९ च्या प्रारंभाला फ्रान्सचें सैन्य फक्त स्वसंरक्षणक्षम असून त्यांत आक्रमक शक्तीचा अभाव होता हें कबूल करावयास पाहिजे व याचें प्रत्यन्तर म्हणजे फ्रान्सचें मनुष्यबळ व आर्थिक सामर्थ्य अपरंपार असूनहि शांतताकाळीं या राष्ट्राचें खडें सैन्य इतर राष्ट्रांच्या मानानें फार कमी होतें यांतच दिसेल. १९३९ मध्यें फ्रेंच खड्या सैन्याची स्थिति पुढीलप्रमाणें होतीः—

२० इनफंट्री डिव्हिजन्स.

४ नॉर्थ आफ्रिकन इन्फंट्री डिव्हिजन्स.

५ कलोनियल डिव्हिजन्स.

२ स्पॅनिश ब्रिगेड्स.

३ कॅव्हलरी डिव्हिजन्स (शिवाय १ डिव्हिजन लाइट मोटराइझ्डपद्धतीची करण्यांत येत आहे.)

१ लाइट मेकॅनाइझ्ड डिव्हिजन.

रिझर्व्हज ऑफ सुप्रीम कमँड (टँक्स अँड आर्टिलरी.)

या सर्व विभागांत मिळून ५ लक्ष मनुष्यबळ असून त्यांत धंदेवाईक शिपाई असे १ लक्ष होते. तुलनात्मक दृष्टीनें पाहतां रशियाच्या $\frac{१}{४}$ व जर्मनीच्या $\frac{१}{३}$ सैन्याच्या बरोबरीचें व खुद्द फ्रान्सच्या १९१४ मधील सैन्याच्या $\frac{१}{२}$ सैन्याइतकेंच हें सैन्य होतें. याचा अर्थ हाच कीं युद्धास प्रारंभ होतांच शत्रूला तोंड देऊन त्याला थोपवून धरण्यास व स्वदेश रक्षण करण्यास पुरेल इतकेंच खडें सैन्य फ्रेंच राष्ट्राजवळ असल्यानें त्यास आक्रमण किंवा चढावाचें युद्ध पुकारतां येणार नव्हतें, व युद्धाच्या सुरुवातीलाच आक्रमक फौज थोड्या अधिक प्रमाणांत शत्रूला जरब बसविण्यासाठीं असावयास पाहिजे तिच्या अभावीं फ्रेंच सैन्यास एकप्रकारें मोठा धोकाच होता. शत्रूला तोंड देण्यासाठीं सरहद्दीवर व त्यांच्यामागें युद्धपद्धतीचे फौजेचे खडे विभाग उभे केल्यावर (Covering Troops) त्यांच्या मागच्या बाजूस नवशिक्षित व पूर्वशिक्षित लोकांचें सैन्य जमवून त्यांस युद्धक्षम

करून एका सूत्रांत गोंवण्यास कमीअधिक वेळ लागणार व तो रशियन माहिती-प्रमाणें पुढीलप्रमाणें असूं शकेल. युद्ध सुरू होतांच आठव्या दिवशीं पूर्वसरहद्दीवर प्रथम २० इन्‌फंट्री डिव्हिजन्स पाठवितां येतील, तर विसाव्या दिवशीं दुसरे २० डिव्हिजन्स पाठवितां येतील, व दोन महिन्यांनंतर एकूण ६० डिव्हिजन्स पुरे करतां येतील. पहिल्या सहा महिन्यांत ८० व वर्षअखेर एकूण १०० उभे करतां येतील. याप्रमाणें आघाडीवर पाठवावयास लागणारे सैन्यास भरपूर असा पुरवठा भराभर न मिळतां तो दिरंगाईनें मिळणें यांतच लढाऊ दृष्टीनें फार कमीपणा आहे; कारण याप्रमाणें हळुंहळू सैन्य जमविण्यांत जाणारा वेळ म्हणजेच यशाची सुवर्णसंधि गमावणें होय. कारण युद्धारंभीं भरपूर सैन्य असणारें राष्ट्रच आक्रमक धोरण ठेवील व त्यापुढें नुस्तें संरक्षणक्षम सैन्य फार वेळ टिकणार नाहीं.

## फ्रेंचांचें वैमानिक दल

या विभागांत मात्र संरक्षक व आक्रमक अशा दोन्ही बाजू फ्रान्सनें वाढविल्या असून फ्रेंच युद्धनीतिविशारदांनीं युद्धारंभीं आक्रमणाची मुख्य धुरा याच विभागाकडे सोंपविलेली होती, हें फ्रान्सचा माजी युद्धमंत्रि व चेअरमन ऑफ दि मिलिटरी कमिटी ऑफ् दि चेंबर ऑफ डेप्युटीज् हा काय म्हणतो यावरून सहज लक्षांत येईल. हा अनुभवी अधिकारी लिहितो: The Air should be given the conduct of the whole offensive section of the operations, and the land army should be given the thankless role of holding the field from the North Sea to the Jura and the Kingdom is impregnable. युद्धाचें चढावाचें काम वैमानिक दल–विभागावर सोंपवून खुष्कीचे सैन्यांकडे फक्त ज्यूरा ते उत्तर समुद्र या विभागाचें संरक्षणाचें काम सोंपवावें असें या तज्ज्ञाचें म्हणणें आहे. १९३० ते १९३८ या आठ वर्षांत फ्रेंच वैमानिक दलाच्या वाढीचा अहवाल सूचक आहे हें सहज दिसेल. १९१४ च्या महायुद्धांत व नंतर बरींच वर्षें वैमानिक दलाचे बाबतींतील अग्रेसरत्व फ्रेंचांकडेच होतें, व याचें कारण या बाबतींत फ्रेंचांनीं विशेष सुधारणा केली हें नसून त्या राष्ट्राशीं या बाबतींत इतर कोणीहि स्पर्धा केली नव्हती हेंच होय. महायुद्धानंतर झालेल्या लष्करी घडामोडींत फ्रेंच लष्करी तज्ज्ञांचें मत पुरोगामी नसल्यानें त्यांनीं या शाखेकडे बरेंच दुर्लक्ष केलें, व या शाखेचा उपयोग फक्त खुष्की सैन्याची मदतगार शाखा या नात्यानेंच करावा

असें त्याचें मत होतें. युद्धांत आपल्या सैन्याच्या दूरवर पसरलेल्या विभागांमधील जोड सांखळीचें कार्य, अथवा टेहेळणीचें काम किंवा तोफखान्याच्या सरबत्तीचें कार्य यांत मदत करणें एवढींच कामें वैमानिक दलाकडे येत व त्यामुळें वैमानिक दलाचें मनुष्यबळ व यांत्रिक सामर्थ्य यांची फारशी वाढ बरेच दिवस न झाल्यानें, लाल सैन्य ( रशियन ) व इटॅलियन सैन्य यांनीं आपापल्या वैमानिक शाखांतून केलेल्या प्रगतीपुढें व आंखलेल्या धोरणामुळें या बाबतींतील फ्रेंचांच्या अग्रेसरत्वाची फार पिछेहाट झाली होती, व त्यामुळें १९३४ मध्यें वरील दोन्ही राष्ट्रांनीं वैमानिक गति व आक्रमकशक्ति हीं अधिक कमावलीं, व फ्रेंच वैमानिक गति दरताशीं इतर राष्ट्रांच्या मानानें कमीच पडूं लागली, व तिचें प्रमाण फायटरप्लेन दरताशीं १२५ ते १९० मैल, व बॉंबर्स १०० ते १२० मैल हें राहून सर्वसाधारण बॉंब गोळ्याचें वजन दर यंत्राप्रमाणें $\frac{1}{2}$ टनापेक्षां कमी ओझें नेतां येईल इतकेंच राहिलें. ही गोष्ट पेरिकॉट व इतर फ्रेंच तज्ज्ञांनीं हाकाटी करून लक्षांत आणून दिल्यानंतर मात्र या बाबतींत या राष्ट्रानें १९३६ व १९३८ या दोन टप्यांत फार झपाट्यानें प्रगति केली. १९३४–३६ या कालांत वैमानिक दल–घटना, यांत्रिक रचनेंतील नाविन्य व वैमानिक युद्धपद्धति या विषयांत जबर क्रान्ति घडवून आणून १९३५–३६ मध्यें आघाडीवर एकदम १२०० विमानें ठेवतां येऊन त्यांपैकीं ७०० विमानें बॉंबर्स टाइपचीं होतीं, एवढी प्रगति करून ठेविली, व यांचें गतिप्रमाण वाढवून तें स्काउट व चेसर मशिनला दरताशीं १८० ते २५० मैल, तर बॉंबर्स दर तासाला १७० ते २०० मैलांचा पल्ला गाठूं शकतील असें केलें व बॉंबचें वजन दर विमानागणिक १ टन नेतां येईल असें करण्यांत आलें. जनरल डिनेनच्या भाषेंत बोलावयाचें तर यापुढें फ्रेंच वैमानिक दल "आकस्मिक हल्ल्याला आकस्मिक हल्ला व बॉंबला बॉंब देऊं" सें राहील असें फ्रेंच म्हणूं लागले. १९३६-१९३८ या कालांत वैमानिक सैन्याच्या वाढत्या हालचाली व आक्रमिक शक्तीची वाढ या बाबतींत विशेष लक्ष देण्यांत आलें. १९३७–३८ या सालांत वैमानिक शस्त्रवाढीची प्रगति प्रतिकूल परिस्थितींतहि केली, व यामुळें १९३७–३८ मध्यें ऐनवेळीं ३३ हजार प्लेन्स व ५५ हजार ईरो–एंजिन्स फ्रान्सला अवघ्या एका वर्षांत तयार करतां आलीं. एका रशियन तज्ज्ञाच्या मतें १९३५ मध्यें फ्रेंच वैमानिक कारखान्यांत युद्धारंभ होतांच त्या वर्षी २५ हजार प्लेन्स व ४० हजार ईरो–एंजिन्स तयार करतां

येतील ही सुसज्जता फ्रेंचांनी ठेविली होती. ही वस्तुस्थिति असली तरी १९३७ मध्येंहि फ्रेंच लोकांनीं रशिया, इटली व जर्मनीप्रमाणें आपलें वैमानिक उत्पादन मोठ्या प्रमाणांत ठेवलें नव्हतें असें दिसतें; कारण या वर्षी वैमानिक कारखान्यांत इंग्लंड व इटलींत ६० हजार माणसें, जर्मनींत १ लक्ष २० हजार माणसें व रशियांत २॥ लक्ष माणसें खपत असतां फ्रान्समध्यें मात्र या विभागांत फक्त ४० हजार माणसेंच होतीं. पेरिकोट नांवाच्या फ्रेंच तज्ज्ञाच्या मतेंहि फ्रान्समध्यें १९३५ मध्यें ७८५ लष्करी प्लेन्स व १९३६ मध्यें ८९० इतकेंच वैमानिक उत्पादन झालें, व १९३७ मध्यें तर फक्त ५०० एवढेंच उत्पादन झालें. इतर राष्ट्रांनीं निर्माण केलेल्या वैमानिक यंत्रांस तोंड देण्याच्या यंत्रांचें उत्पादन करणें अतिशय अवश्यक असूनहि फ्रान्सनें फक्त फायटर्सच्या १५ तऱ्हा, व मीडियम व लाइट बॉंबर्सच्या तितक्याच तऱ्हांचीं यंत्रें काढलीं आहेत. तथापि नवीन धोरणानुसार ( Guy la Chambre ) १९३८–३९ या वर्षात २६०० लढाऊ प्लेन्स उत्पादन करण्यांत येऊन १९४० मध्यें एकूण बॉंब ओझें एका वेळीं १५०० टन नेतां येईल अशी व्यवस्था आंखली होती. हें सामर्थ्य कांहीं लहानसहान नव्हे.

## मोटर व रणगाडे

आधुनिक युद्धाच्या कल्पनांप्रमाणें युद्धसामर्थ्य ठरविण्याचें प्रमुख साधन लष्करांचें–मोटर साधन हें होय. या बाबतींतहि वैमानिक दलाप्रमाणेंच फ्रेंचांनीं आपल्या लष्करी सामर्थ्यांत ज्यास्तींत ज्यास्त वाढ केली असून जर्मन माहितीप्रमाणें १९३४–३५ मध्यें फ्रेंच राष्ट्राच्या सैन्यांत ३००० रणगाडे तयार होते असें दिसतें. १९३८ मध्यें पुढील प्रमाणें मोटरित सैन्यविभाग तयार होता.

( १ ) लाइट मेकनाइझ्ड डिव्हिजन; दोन टँक रेजिमेंट्स; आड रस्त्यांनीं जाणारी सुसज्ज अशी एक रेजिमेंट ( Dragons Porte ), व मोटरित तोफखाना.

( २ ) अर्ध मोटरित पायदळांचे सात डिव्हिजन्स असून त्यांत इंजिनिअर्स सिग्नलर्स वगैरे येतात, व वाहतुकी यंत्रेंहि यांत आहेत. पायदळास दूरवर एकदम पोहोंचविण्यास भरपूर लॉरीज् आहेत.

( ३ ) तीन कॅव्हलरी मोटरित डिव्हिजन्स

( ४ ) रणगाड्यांचीं दहा रेजिमेंट्स मुख्य सेनानायकांचे दिमतीस म्हणून.

( ५ ) याशिवाय तोफखान्यांपैकीं शें. ४० टक्के तोफखाना मोटारलेला होता.

फ्रेंच लोकांनीं आपल्या सैन्यांत घडवून आणिलेल्या सुधारणांसंबंधीं स्तुति रशियन मोटर आर्मीचा मुख्य ऑफिसर चॅलेपस्की यानें मुक्तकंठानें केली होती हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

## इटलीची लष्करी प्रगति.

इतर राष्ट्रांप्रमाणेंच इटलीनेंही आपल्या राष्ट्रांत लष्करी शिक्षणाची वाढ झपाट्यानें करून इटलीचें युद्धसामर्थ्य वाढविलें असलें तरी जर्मनी, रशिया, फ्रान्स व इंग्लंड या बलाढ्य राष्ट्रांची इटली अजून बरोबरी करूं शकत नाहीं. रोम-बर्लिन ॲक्सिस् म्हणजे जर्मन-इटली संघ राजकीय दृष्ट्या एक झाला त्या वेळीं प्रो. झायलँडर, जर्मन वॉर अकॅडमीमधील एक अध्यापक लिहितो– "युरोपांतील कोणत्याहि राष्ट्राच्या तुलनेनें कच्च्या मालाच्या पुरवठ्याच्या बाबतींत इटली केव्हांहि मागसलेलाच आहे." याचा अर्थ जगतांतील कोणत्याहि राष्ट्राच्या तुलनेंत आर्थिक उत्पादन इत्यादि युद्धसामर्थ्याच्या बाबतींत इटलीचा नंबर बराच खालीं लागतो. आर्थिक बाबींत पाहिल्यास आधुनिक युद्धपद्धतींत लागणारीं द्रव्यें उत्पादनास अवश्यक असतात. या कच्च्या मालाचा पुरवठा इटलीला फारच कमी आहे. औद्योगिक उत्पादनास अवश्य असणारे मोठाल्या कारखान्यांची इटालीस बरीच उणीव आहे, व यामुळें आधुनिक काळांतील युद्धास लागणाऱ्या वाढत्या शस्त्रास्त्रसुसज्जतेचीं साधनें इतर बलिष्ठ राष्ट्रांप्रमाणें बेसुमार व मोठ्या प्रमाणांत इटलींत होऊं शकत नाहींत.

जर्मन इन्स्टिट्यूट ऑफ एकॉनॉमिक रिचर्सच्या अधिकृत आठवडी रिपोर्टांत ता. ५ ऑगस्ट १९३६ मध्यें नमूद केल्याप्रमाणें इटलीला भासणाऱ्या कच्च्या मालाच्या उणीवेचें प्रमाण पुढीलप्रमाणें आहे. इटलींत शस्त्रसुसज्जतेसाठीं लागणाऱ्या कच्च्या मालाची पैदास शेंकडा अशी आहेः–मिनरल तेल ०·७, रबर ०, कोळसा ३·२, लोखंड व पोलाद ३७·१, वुलफ्राम ०, फॉस्फेट्स ०, मँगनीज ओअर १४·२, टिन ०, यंत्रें १४·२, निकल ०·१, शिसें ६९·७, तांबें ३·२. नायट्रेट, झिंक ( जस्त ) व अल्युमिनिअम हे पदार्थ मात्र इटलींत भरपूर आहेत. तसेंच प्रयत्न केल्यास कोळसा व तांबें यांचीहि वाढती पैदास इटलीला करतां येईल एवढेंच. उत्तम सैन्य ठेवावयाचें झाल्यास लष्करी शिक्षण घेतलेलीं २० लक्ष माणसें, व समुद्रावरील वर्चस्वाकरितां मोठें आरमार तयार करण्यास

तीस साडेतीस लक्ष टन पोलाद व वीस टन पिग आयर्नची दरवर्षी पैदास करणें अवश्य आहे. पण जर्मनी व रशियाच्या तुलनेंत इटलींत १/२० पिग आयर्न व १/१० पोलाद इतकेंच फक्त उत्पादन होतें. जपानला निदान भरतीसाठीं कांहीं माल मँचुकोमधून मिळवितां येईल, पण इटलीला त्याचीहि वाणच ! समुद्रावर जपान पश्चिम पॅसिफिकवर मालकी तरी गाजवितो, पण इटलीला अगदीं आपल्या पायाखालच्या भूमध्यसमुद्रावर आधिपत्य गाजवितां येत नाहीं. कारण त्यावर मुख्यतः इंग्लंडचें व त्याचे खालोखाल फ्रेंचांचें आधिपत्य आहे व त्यामुळें युद्ध जुंपलेंच तर इटलीला गळचेपीची–ब्लॉकेडची–भीति फार, व तसें झाल्यास बाहेरून इटलींत कच्चा माल वेळेवर न पोहोंचल्यानें त्याची उपासमार झाल्याशिवाय राहणार नाहीं. कर्नल झायलँडरनें आपल्या पुस्तकांत दिलेल्या माहितीवरून १९३२ मध्यें इटलींत परदेशांतून उतरलेल्या ३ कोट टन मालापैकीं १ कोटी ७० लक्ष टन ग्रेटब्रिटनमधून व अमेरिकेंतून जिब्राल्टर सामुद्रधुनींतून, तर सुएझ कॅनल मार्गानें रशिया, आफ्रिका व ऑस्ट्रेलियांतून १ कोटी ८ लक्ष टन माल, डार्डनेल्स सामुद्रधुनींतून काळ्यासमुद्रावरील देशांतून १·२ मिलियन टन व ३ मिलियन टन भूमध्यसमुद्राजवळील देशांतून व युरोपच्या उत्तरसीमाप्रांतांतून ७ मिलियन टन याप्रमाणें माल इटलीमध्यें उतरला. यावरून महायुद्धाप्रीत्यर्थ तयारीसाठीं अवश्य असणारी शस्त्रसुसज्जता मोठ्या प्रमाणांत करण्यासाठीं लागणारी यंत्रसामग्री व प्रचण्ड कारखाने काढणें व त्यांत प्रचण्ड माल उत्पन्न करून त्या सर्वांस लागणारा कच्चा माल आपल्या देशांतल्या देशांत उत्पन्न करण्याचीं साधनें व त्यासाठीं लागणारा पैसा या सर्व गोष्टींचा इटलींत अभाव असल्यानें हें राष्ट्र युद्धांत फार काळ इतर राष्ट्रांच्या मदतीशिवाय तग धरूं शकणार नाहीं हें उघड दिसतें.

## इटलीची वैमानिक शस्त्रसुसज्जता.

वैमानिक विभागाकडून युद्धांत आघाडीचें आक्रमक काम करून घेण्याच्या युक्तीची मांडणी युरोपांत प्रथम इटलीच्या जनरल डुहेनें पुढें मांडली. खुष्की फौज व आरमाराच्या बाबतींत इतर मोठाल्या राष्ट्रांची बरोबरी करणें शक्य नसलें तरी वैमानिकदलाच्या बाबतींत आपण अग्रेसरत्व पटकवावें हें धोरण इटलीनें ठेवून त्याबाबतींत १९३७ चे सुमारास फ्रान्स व इंग्लंडची बरोबरी करून आपलें वैमानिक यंत्रसाहित्य व गति या बाबतींत जर्मनीच्यापुढें इटलीनें

आघाडी मारली, आणि आकाशांत अतिशय उंचीवर विमानें नेण्याची कला याच राष्ट्रानें प्रथम हस्तगत केली. त्याचप्रमाणें हेव्ही बॉंबर्स तयार करण्यांतहि या राष्ट्रानें जर्मनीला मागें टाकलें होतें, व इटॅलियन फायटर प्लेन्सची गति दरताशीं २५० ते २८० मैलांची आहे, व फिआट सी आर ३३, फियाट जी ५० हीं विमानें या सदरांत बसतात. जर्मनांच्या माहितीप्रमाणें इटलीचे शोध याप्रमाणें वैमानिक यंत्रपद्धतींत अधिक पुढें गेलेले असले तरी हीं विमानें मोठ्या प्रमाणांवर उत्पादन करणें इटलीला शक्य नाहीं व त्यामुळें बुद्धि असूनहि तिचा व्यावहारिक उपयोग इटलीला तितकासा करतां येत नाहीं, व त्यामुळें आज उत्पन्न होणारीं विमानें म्हणजे फायटर प्लेन्स ( फिआट सी आर ३३ ) चा वेग दरताशीं कमी दर्ज्यांचा आहे, व शिवाय इटॅलियन हेव्ही बॉंबर्स सेव्होइया ८१ ची संरक्षक बाजू कमी असल्यानें तिला चपळ गतीच्या फायटर प्लेन्सच्या सहाय्याशिवाय आक्रमण करतां येत नाहीं. २ ते ३ टन बॉंब ओझें आंत घेऊन दरताशीं २२० ते २८० मैल उडणारीं विमानें सेव्होइया ७९, फिआट बी आर २०, पिआगिओ १६, ब्रेडा ८२ हीं आहेत. याखेरीज लाइट फास्ट बॉंबर्स ब्रेडा ६५ व कॅप्रोनी १३५ यांची उंच उड्डाणगति जबर आहे. याचेच बरोबरीला १९३७ मध्यें इटलीनें १० हजार पायलट्स तयार केले होते.

हें सर्व जमेस धरूनहि इटली या बाबतींत फार पुढें जाऊं शकत नाहीं, याचें कारण सर्व प्रकारचीं उच्च जातीचीं विमानें मोठ्या प्रमाणांत उत्पादन करणारे कारखाने इटली जवळ नाहींत. इटलीच्या कारखान्यांत दरमहिन्याला फक्त २०० विमानें तयार होऊं शकतात व यासाठीं इटलीमधील कारखाने चोवीस तास सारखे चालू ठेवावे लागत आहेत. स्पेनच्या यादवी युद्धामध्यें इटलीनें पाठविलेल्या मदतगार विमानांच्या हालचालींवरून एक गोष्ट प्रमुखपणें दिसून आली ती ही कीं रशियन व फ्रेंचांचीं नवीन पद्धतीचीं विमानें यापुढें इटॅलियन विमानें कम दर्ज्याचीं ठरतात. शिवाय जर्मन, रशियन व फ्रेंच पायलटच्या मानानें इटॅलियन पायलटची सहनशक्ति व युद्धनैपुण्यहि कमी दर्ज्याचें आहे.

## इटॅलियन सैन्याचें आक्रमण—सामर्थ्य.

इटॅलियन लष्कराला तीन साधनांची जोड आहे ती अशी—( १ ) मनुष्यबळ ( २ ) पायदळाची उत्तम संघटना व ( ३ ) त्वरित गतीचीं दलें. याचा आपण क्रमशः विचार करूं.

( १ ) शांततेच्या काळांत इटलीचें सैन्य ७९ डिव्हिजन्सच असून युद्धप्रसंगीं इटलीचे सैन्यांत ८० लक्ष लढवय्ये तयार राहूं शकतील असें मुसोलिनीचें म्हणणें आहे. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिति ही नाहीं, याचें कारण युद्धांत मनुष्यबळाबरोबर युद्ध-सामग्रीचाहि भरपूर पुरवठा हवा असतो. इटलीच्या यंत्रकारखान्यांतील उत्पादक शक्तीकडे दृष्टि फेकली तर त्या देशांत एवढ्या सैन्यास पुरेशी सामग्री करणें अशक्य आहे, अशी स्थिति असल्यावर नुसतें प्रचण्ड मनुष्यबळ आहे म्हणून त्याचा उप-योग काय ? अशीच स्थिति जपानची आहे व पोलंडची होती. ज्यास्तींत ज्यास्त तर इटलीला ८० ते १०० डिव्हिजन्सचें सैन्य उभारतां येईल, याचा अर्थ २० लक्ष सैन्य ही त्याची कमाल मर्यादा होय.

( २ ) मुसोलिनीनें इटॅलियन सैन्यांत नवीन तऱ्हेची घटना घडवून आण-ल्यानें सैन्यांत मशिनगन्स, ट्रेंच मॉर्टर्स, व लाइट आर्टिलरीचा भरपूर पुरवठा झाला आहे; परंतु अजून हवातसा ॲन्टीटँक व ॲन्टी एअरक्रॅफ्ट म्हणजे रणगाडे व वैमानिक लढत यांशीं झुंज घेणारीं शस्त्रें यांचा पुरवठा इटलीस नाहीं.

( ३ ) तिसरें साधन मोटरित सैन्यः—इटलीजवळ ३ मोटाराइझ्ड्, ३ मोबा-इल डिव्हिजन्स, १ आर्मड ब्रिगेड व अनेक बर्सग्लिएर रेजिमेंट्स आहेत ही गोष्ट जमेस धरली तरी ही सर्व तयारी जर्मनी व रशियाचे तयारीपुढें अगदींच कुच-कामाची ठरते. सबंध इटॅलियन सैन्यांत १२०० पेक्षां ज्यास्त रणगाडे नाहींत व यांपैकीं बरेचसे हलक्या वजनाचे ३·५ ते ४ टन वजनी असून त्यांस जाड संर-क्षक आवरण नसून त्यांची आक्रमक शक्तिहि कमदर्ज्याची आहे. इटलीजवळ अधिक वजनी रणगाडे म्हणजे ८ टनी होत व तेहि फार नाहींत. पण रशियाचे सैन्यांत ८ टनी रणगाडे हलक्या वजनी प्रमाणांत बसतात व त्यांहून अधिक वजनी रणगाडे किती तरी मासल्याचे आहेत. कर्नल लिडेलहार्ट या इंग्रज तज्ज्ञानें इटॅलियन सैन्याचें वर्णन दिलें आहे तें असें. तो लिहितोः——

"There are three mobile divisions mainly motorised
" troops with a small proportion of armoured vehicles.
" Tanks have not been much developed. There are a few
" hundred Fiat–Tanks but they are very small, and
" limited in obstacle–crossing capacity. The infantry
" division is rather weaker in artillary support and also

" in automatic fire power than the French. The Italian " armies' progress towards mechanisation was for a " long time retarded by lack of money and reluctance " to be dependant on outside fuel supplies. It was thus " in form and outlook an old-style army which was " shipped out from Italy to Eritria in 1935. "

"मोटरित ट्रूप्स असलेले असे तीन फिरते (mobile) डिव्हिजन्स असून त्यांस लहानसा भाग पोलादी गाड्यांचाहि जोडला आहे. रणगाड्यांची वाढ फारशी नाहीं. शेकड्यांत भरणाऱ्या थोड्या रणगाड्या फिआट आहेत, परंतु त्या लहान असून अडचणींच्या जागा ओलांडण्याची शक्ति त्यांस फारशी नाहीं. पायदळ सैन्यास तोफखान्याची जोड कमी दर्ज्याची व फ्रेंच सैन्याच्या मानानें त्यांजवळ ऑटोमॅटिक सरबत्तीचींहि साधनें कमीच. बरेच दिवस इटलीच्या सैन्याचें यंत्रीकरण मागें पडलें होतें, याचें कारण एक तर पैशाची टंचाई व दुसरें असें कीं त्या राष्ट्रास यंत्रीकरणासाठीं लागणाऱ्या जळाऊ द्रव्याचे बाबतींत बाहेरच्या राष्ट्रांवर अवलंबून रहावेसें वाटेना हें होय. यामुळें बाह्यांग व अन्तरंगाचे बाबतींत इटलीचें सैन्य जुन्या पद्धतीचें होतें व असें सैन्य १९३५ मध्यें इटलीमधून इरिट्रियास पाठविलें होतें. "

एकंदरींत इटॅलियन राष्ट्रानें आपल्या लष्करी धोरणांत द्रुतगतिसाधनांची रेलचेल व जबरदस्त प्राथमिक आक्रमण या गोष्टींचा अवलंब केला. कारण दीर्घकालीन युद्धासाठीं लागणारा पुरवठा व कच्चा माल यांचा इटलींत तुडवडाच आहे. त्यामुळें तडकाफडकीनें उरकून ज्यांत यश हमखास आपल्या राष्ट्रास मिळेल अशीच पद्धत उचलणें श्रेयस्कर असें इटलीमधील युद्धशास्त्रविशारदांचें मत आहे. इटॅलियन वॉर मिनिस्ट्रीमधील जनरल पॅरियानी म्हणतो:—

" Italy is not rich in raw materials, and she can therefore not seek a protracted war involving great material expenditure, and in addition the idea of positional warfare is in-consistent with the dynamic character of the Fascist regime. "

("*Popola d' Italia.*")

"इटलीजवळ कच्च्या मालाची भरपूर समृद्धि नाहीं व म्हणून ज्यामुळें अधिक खर्च वाढेल अशा प्रकारचें लांबत जाणारें युद्ध त्यास नको. शिवाय एका जागीं बसून युद्ध चालूं ठेवणें हें फुरफुरणाऱ्या फॅसिस्ट राष्ट्राच्या धोरणाला विसंगत आहे."

## इटलीचें आरमार

इटलीनें वैमानिक दलाप्रमाणेंच आपलें नाविक दल वाढविण्याचा सपाटा चालविला असून पुढेंमागें या सैन्याचा भूमध्यसमुद्रांत उपयोग करावयाचा त्याचा विचार आहे. याचें प्रत्यन्तर १७ मे १९३७ रोजीं इटॅलियन वैमानिक मंत्र्यानें सीनेटपुढें केलेल्या भाषणांत दिसून आलें. या भाषणांत त्यानें म्हटलें कीं यापुढें इटलीच्या वैमानिक दलाचा मोर्चा उत्तर इटलींतून निघून भूमध्य समुद्र, तांबडा समुद्र व हिंदी महासागराकडे वळविला आहे. याचा अर्थ एवढाच कीं इतःपर इटलीला भूमध्य समुद्रांत आपलें वर्चस्व ठेवणें अवश्य वाटतें. १९३९ मध्यें इटलीच्या आरमारांत दोन नवीन बॅटलशिप्सची भरती होणार होती, व १९३८ मध्यें याचप्रमाणें नवीन दोन लढाऊ जहाजें बांधण्यास प्रारंभ होऊन त्याबरोबरच अधिकीचीं १२ मोठीं विनाशक जहाजें (Destroyers) हीं हातीं घ्यावयाचीं होतीं. दरताशीं ४४ नॉट्स द्रुतगतीचीं डिस्ट्रॉयर्स बांधावयाचीं असून पाणबुड्या बोटींचें प्रमाण जवळजवळ १०० वर न्यावयाचें होतें. हें सर्व खरें असलें तरी इटली या उत्पादनापलीकडे मजल मारूं शकत नाहीं, व त्यामुळें हें सर्व करूनहि फ्रान्स व इंग्लंड या दोन राष्ट्रांच्या संयुक्त आरमारांची बरोबरी इटलीला कल्पान्तापर्यंतहि करतां येईल असें मानावयास जागा नाहीं; इंग्लडनें आपलें भूमध्य समुद्रांतील नाविक दलाचें वर्चस्व वाढविण्याचा चंग बांधला आहे.

याप्रमाणें इटलीचें खुष्की सैन्य, आरमार व वैमानिक दल यांची वाढ कितीहि झाली तरी त्यापासून फार झालें तर युरोपांतील शान्ततेचा भंग होऊन कांहीं दिवस गडबडीचे जातील, परंतु जर्मनीचें पूर्ण सहाय्य घेऊनहि त्यास भूमध्य समुद्रांत फ्रान्स व इंग्लंडच्या संयुक्त आरमारापुढें टिकाव धरतां येणार नाहीं. तसेंच फ्रँको-इटॅलियन सरहद्दीवर प्रथम गडचड केली तरी फ्रान्सच्या खुष्की सैन्यापुढें इटालियन सैन्य फार दिवस तग धरूं शकणार नाहीं, परंतु वैमानिक दलाचा रोख भूमध्य समुद्राकडे वळविल्यानें फ्रान्सच्या दक्षिणेच्या बाजूवर त्यास

जोराचा प्राथमिक हल्ला करतां येऊन फ्रान्सला फार झालें तर त्रास देतां येईल; परंतु दीर्घकालीन युद्धांत इटलीस अखेर यश मिळण्याचा संभव नाहीं.

## पोलंडचें सामर्थ्य

जर्मनी व रशिया या दोन बलिष्ठ राष्ट्रांच्या कात्रींत सांपडलेला देश म्हणजे पोलंड होय. या राष्ट्रानें नाझी जर्मनीशीं दहा वर्षांचा तह ( Ten years pact ) करून आपले पश्चिम बाजूला तात्पुरती शांतता ठेविली तरी त्यास स्वसंरक्षणार्थ बलवान सैन्याची फार अवश्यकता होती. पण १९३० पासून रशिया व जर्मनीनें आपापल्या सैन्यांत आरंभिलेल्या नूतन कल्पत्या व युक्त्या यांचा पोलंडनें अवलंब न केल्यानें पोलिश सैन्य असावें तसें बलवान् नव्हतें. पोलंडमध्यें मोठमोठाले कारखाने नसल्यानें युद्धप्रसंगीं लागणारीं शस्त्रास्त्रें, रणगाडे, विमानें, मोटरी मोठ्या प्रमाणांत उत्पादन करणें या राष्ट्रास शक्य नाहीं व शिवाय नवीन राष्ट्र असल्यानें ( जर्मनीला खच्ची करण्याकरितां त्या साम्राज्याचीं शकलें पाडून एका भागांत व्हर्साय तहान्वयें नव्यानेंच प्रस्थापित केलेलें पोलंड राष्ट्र होय ) त्याजवळ मुबलक पैसाहि खर्च करावयास नाहीं, त्यामुळें पोलंडला आपलें सैन्य अद्ययावत् व बलवान् करतां आलें नाहीं. शांतता काळांतील पोलंडचें सैनिक सामर्थ्य म्हणजे ३० इन्फंट्री डिव्हिजन्स ( पायदळ ) व १५ घोडदळ ब्रिगेड्स. युद्धप्रसंगीं रशियन तज्ज्ञांच्या मतें ज्यास्तींत ज्यास्त ६० ते ७० पायदळ डिव्हिजन्स पोलंड उभारूं शकेल. परंतु याचा तादृश फायदा पोलंडला मिळूं शकणार नाहीं. कारण रशिया व पोलंड यांची सरहद्द इतकी दूरवर पसरलेली आहे कीं हें सैन्य एवढ्या मोठ्या लांबीवर अपुरें पडेल. शिवाय सैन्याचें मोटरीकरण इतर मोठ्या राष्ट्रांच्या बरोबरीचें नसल्यानें त्यास द्रुतगति येणें शक्य नाहीं. १९३७ मध्यें पोलंडजवळ फक्त २० हजार मोटरकार्स, ५९०० लॉरीज् व ९०० ट्रॅक्टर्स एवढीच यांत्रिक सिद्धता होती. १९३५–३८ या अवधींत पोलंडमध्यें फक्त ७०० हलके व मध्यमवजनी रणगाडे आणि ५०० लहान रणगाड्या तयार झाल्या. रशियन तज्ज्ञांच्या मतें युद्धारंभ झाल्यास पोलिश सैन्याजवळ जास्तींत ज्यास्त १००० ते १२०० रणगाडे, १२०० ट्रॅकेट्स, ६०० ते ७०० आर्मर्ड कार्स व १००० ट्रॅक्टर्स एवढीच यंत्रसामग्री राहील. पोलिश वैमानिक दलांत १४०० विमानें असून त्यांतील आघाडीवर जाण्यासारखीं फक्त ७०० च होतीं, व एकंदर बाँब वाहून नेण्याचें वजनी प्रमाण फक्त ७० टन इतकेंच आहे. याप्रमाणें कोणत्याही बाजूनें पाहतां

पोलंडला मोठ्या राष्ट्रांच्या मदतीशिवाय रशिया किंवा जर्मनी यांस तोंड देणें शक्य नव्हतें.

## जपानचें बलाबल.

युरोपांत इटलीचें जें स्थान तेंच अतिपूर्व देशांत जपानचें आहे एवढें म्हटलें कीं त्याच्या सामर्थ्याची कल्पना येईल. जर्मनीची बरोबरी जपान केव्हांच करूं शकणार नाहीं. या दृष्टीनें पाहूं जातां जपानी लष्कराचें सामर्थ्य जरी प्रचण्ड झालें असलें तरी तें युरोपीयन अवल दर्जाच्या राष्ट्रांच्या मानानें बैल व बेडूक याच प्रमाणांत राहणारें आहे. हें कां व कसें याचा विचार करूं.

कोणत्याहि राष्ट्राच्या युद्धसामर्थ्याची कसोटी म्हणजे मुख्यतः तीन गोष्टी, ( १ ) मनुष्यबळाचा पुरवठा ( २ ) औद्योगिक उत्पादनक्षमता व ( ३ ) आर्थिक संपन्नता. जपानच्या मालकीचा भूविभाग कमी असून त्यांत उत्पन्न होणारा कच्चा माल युद्धोपयोगी सामग्री करण्यास पुरेसा नसून त्या देशांतील पदार्थांची पैदासहि बरीच कमी आहे. युद्धसामग्री तयार करण्यास लागणाऱ्या मालांत लोखंड, मँगनीज याशिवाय इतर धातु, तेल, रबर, कापूस व लोंकर यांपैकीं कोणताहि कच्चा माल जपानांत पुरेसा उत्पन्न होत नाहीं. जपानला अवश्य असणाऱ्या तांब्यापैकीं अर्धेंअधिक जपानमध्यें तयार होतें, व तीच परिस्थिति लोखंड व झिंक ( जस्त ) यांची आहे. परंतु ॲल्युमिनियम्, टिन, शिसें व तेल यांचें उत्पादन जपानांत फारच कमी प्रमाणांत होतें. शिवाय जपानच्या लोखंडी व पोलादी कारखान्यांतून युद्धास पुरेसा माल निघूं शकत नाहीं, व त्यास शें. २० टक्के लोखंड परदेशांतून आणावें लागतें.

शिवाय युद्धबलास पोषक अशी इंजिनिअरिंगची उद्योगशाळा व शस्त्रास्त्रोत्पादनाची शाखा यांचीहि वाढ जपाननें मोठ्या प्रमाणावर केली नाहीं. म्हणून तोफा ओतणें, मशिनगन्स, बंदुकी, रणगाडे, लढाऊ विमानें यांचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊं शकत नाहीं. या बाबतींत जपानची विशिष्ट बाजू सोडली तर पोलंडशीं तुलना करतां येईल. सोव्हिएट रशियाशीं युद्ध झाल्यास पहिल्या दीड वर्षांतच जपानला ॲन्टी एअर क्रॅफ्ट गन्स व मोठ्या तोफा यांच्या पुरवठ्यासाठीं परदेशाकडे पहावें लागेल. १९३६ मध्यें टोयोडा वर्क्सला लॉरीज् व मोटर कार्स फक्त ४००० च तयार करतां आले. रणगाड्याच्या कारखान्यांत

दूरवर्षी फक्त ३००० च रणगाडे तयार करतां येतील, व त्यामुळें युद्धांत एका वेळीं १००० रणगाड्यांहून अधिक गाड्या जपानला युद्धप्रसंगीं उपयोगांत आणतां येणार नाहींत, व याहून अधिकांची पुस्ती जोडणें झाल्यास जपानला परदेशांतून रणगाडे आणावे लागतील व त्यामुळें रशिया व जर्मनीप्रमाणें या रणगाड्यांचा उपयोग सैन्याचे बाबतींत जपानला करतां येणार नाहीं. जर्मनी व जपानचें सूत अलीकडे बरींच वर्षें जमत होतें व म्हणून जर्मन तज्ज्ञांचें जपानच्या युद्ध-सामर्थ्यासंबंधाचें मत अधिक ग्राह्य धरतां येईल. २५ आक्टोबर १९३४ च्या " मिलिटार वोशनक्रुट " या मासिकांतील लेखांत म्हटलें आहे कीं:—

" At the moment the politico-military chances for Japan are about as un-favourable as they could be. A war between Japan and Soviet Russia at the moment would probably, end in the collapse of the Japanese economic system and therefore of the Japanese army ; because at present Japan has no hope whatever of reaching self-sufficiency in economic war supplies. "

" या क्षणीं राजकीय लष्करी योग जपानला असावेत तितके ज्यास्त अशुभ-सूचक आहेत. या वेळीं सोव्हिएट रशिया व जपान यांच्या दरम्यान युद्ध जुंपल्यास जपानच्या आर्थिक बैठकीचा म्हणजेच जपानच्या लष्कराचा नाश होईल. कारण सद्यःस्थितींत अर्थदृष्ट्या सुलभ युद्धसामग्री मिळविण्याचे बाबतींत जपान स्वयंपूर्ण होणें अशक्य आहे. "

चीनजपान युद्ध सुरू होऊन आज तीन वर्षें होत आलीं पण युद्धाचा निकाल जपानच्या मनाप्रमाणें लागत नाहीं, याचें कारण जपानच्या युद्धसामर्थ्यांत कोठें तरी कमतरता आहे हेंच होय. चीनच्या मानानें जरी जपानची तयारी अधिक असली तरी युद्ध लांबणीवर पडतांच जपानची कुचंबणा होऊं लागली आहे हें स्पष्टच दिसतें. जपानचें रिझर्व्ह सैन्य कमी आहे. त्याच्या खड्या सैन्यांत ३ लक्ष ३० ह. सैनिक आहेत, व राखीव सैनिक जपान जवळ २० ते २५ लक्ष आहेत. वस्तुतः कायद्यान्वयें वयांत आलेल्या व लष्करी शिक्षण घेण्यास योग्य अशा लोकांपैकीं फक्त $\frac{1}{5}$ लोकांनाच लष्करी शिक्षण दिलें गेलें. १९२३-२५ मध्यें जपाननें लष्करांत घडवून आणलेल्या सुधारणा याचे मुळाशीं आहेत व त्यामुळें तयार फौजेची संख्या बरीच घटली आहे. या सुधारणांचा मूळ हेतु

लष्करांतील संख्याबळ थोडें कमी करून त्याचें यांत्रिक सामर्थ्य अधिक वाढवावें हा होता, असें रशियन व जर्मन तज्ज्ञांचें मत आहे. मनुष्यबळ कमी करून खड्या सैन्यांतील शस्त्रास्त्रें अगदीं नव्या पद्धतीचीं ठेवून लष्करांतील इतर उणीवा भरून काढावयाच्या हा डाव होता. परंतु वस्तुस्थिति अशी झाली कीं शस्त्रास्त्र-वाढींत पाश्चात्य मोठ्या राष्ट्रांची बरोबरी न होतां लढाऊ मनुष्यबळ मात्र घटलें. जपानांत दाट लोकवस्ती असून सुद्धां त्या राष्ट्राजवळ फ्रान्सच्या निम्या व रशियाच्या $\frac{1}{3}$ इतकें ट्रेन्ड राखीव सैन्य आहे, व युद्ध सुरूच झालें तर मंगोलिया व समुद्रकिनारा या भागांत रशियाविरुद्ध १० लक्ष ते १५ लक्ष सैन्य पाठवावें लागेल. राष्ट्राच्या रक्षणार्थ बरेंच मोठें सैन्य ठेवून शिवाय उत्तर चीन व मँच्युरिआ यांचें चीनपासून रक्षण करण्यास आणखी कितीतरी सैन्य लागेल व हें सर्व करतांना जपानच्या नाकीं नव आल्याशिवाय राहणार नाहींत.

१९३२–३४ या वर्षांत नवीन शस्त्रास्त्रसुसज्जतेला जपाननें प्रारंभ केला व जपानी पायदळ, जपानचें अधिकारी दळ व लांब पल्ल्याचा गोळीबार यासंबंधांत केलेली प्रगति याबद्दल रशियन तज्ज्ञांनींहि जपानची स्तुति केली आहे. आज जपानच्या पायदळ विभागामध्यें ३२२ मशिनगन्स, चोवीस ३७ मिलिमिटर व चोवीस ७५ मिलिमिटर फील्ड गन्स, तसेंच चोवीस ७० मि. मि. हॉविट्झर्स, २४ अँटी टँक गन्स, पंचवीस ७५ मि. मि. डिव्हिजनल फील्ड गन्स, बारा १०५ मि. मि. डिव्हिजनल हॉव्हिटझर्स, व. ४ अँटी एअरक्रॅफ्ट गन्स इतकी युद्धसामग्री जपानजवळ आहे. युद्ध सुरू झाल्यास पायदळास ६१५ मशिनगन्स व ४८ डिव्हिजनलगन्स देण्यांत येतील. यास मदतगार म्हणून मुख्य भार हलक्या वजनाच्या तोफखान्यावर आहे. आधुनिक फिरता तोफखाना (mobile artillery), वैमानिक प्रतिकार तोफा, तसेंच रणगाडे प्रतिकारबंदुका यांचा फारसा पुरवठा जपानी सैन्यास नसल्यानें लष्करी विमानें व रणगाडे यांनीं सुसज्ज अशा रशियन सैन्यास तोंड देणें जपानला अवघड जाईल. जड तोफांच्या १३ जपानी रेजिमेंट्स असून थोड्याशा स्वतंत्र बॅटरीजूहि सैन्यांत आहेत. तोफखान्यांतील शस्त्रांचा पल्ला सारख्या लांबीचा नसून ७५ मि. मि. गन्स पैकीं कांहींचा ७ मैल, तर कांहींचा ४ मैलच आहे. १५० मि. मि. गन्सचा पल्ला कांहींचा ६॥ तर कित्येकांचा ५ व कांहींचा फक्त ३$\frac{3}{4}$ मैलच आहे. रशियन तज्ज्ञांच्या मतें १९३५ मध्यें तोफखान्यांतील जड विभागांत जपानजवळ एकशें अडुसष्ट १५० मि. मि.

हॉव्हिटझर्स व अठ्ठेचाळीस १०५ मि. मि. गन्स एवढीच सामग्री होती. १९३६ मधील रशियन तज्ज्ञ मासिकाच्या " आर्मर्ड फोर्सेस ऑफ जपान " च्या माहितीप्रमाणें जपानजवळ फक्त ४०० जड तोफा होत्या. या सर्वांचा अर्थ हाच कीं जपानचें युद्धसामर्थ्य विशेषतः पायदळाच्या बळावर अधिष्ठित आहे. तोफखाना मदतगार म्हणून बरा असला तरी स्वतंत्र विभाग म्हणून त्याची फारशी मातबरी नाहीं व त्यामुळें शत्रुसैन्याची फळी तोडून आंत घुसण्याच्या कामीं या विभागाचा फारसा उपयोग होणार नाहीं. जपानच्या पायदळांतील सैनिकाची सहनशक्ति व पदगति हे गुण अमोल असले तरी त्यांस यांत्रिक सामर्थ्याची जोड पुरेशी नसल्यामुळें त्यांचा उपयोग यांत्रिक सामर्थ्यसंपन्न राष्ट्राविरुद्ध तितकासा होणारा नाहीं. सबंध फौजेंत फक्त एकच मोटराइझ्ड डिव्हिजन. व जपानी ऑटो मोबाइल कारखान्यांच्या सद्यःस्थितीवरून सर्रास मोटारींचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन होऊन त्यांचा सैन्यास पुरवठा होणें अशक्यच आहे. एका मोटराइझ्ड डिव्हिजनमध्यें निदान २००० ते २५०० मोटरी पाहिजेत, व जपानी कारखान्यांतील एकंदर मोटरींचें उत्पादन प्रतिवर्षीं याच्या फक्त चौपट होतें.

रणगाड्यांच्या विभागांतहि जपान मागेंच आहे. १९३६–३७ मध्यें जपानजवळ फक्त ८०० ते १००० टँक्स होते. पैकीं दोन मोटर मेकॅनाइझ्ड ब्रिगेड व दोन टँक रेजिमेंट्समध्यें वांटून बाकीच्या लहान लहान गटांत वांटलेल्या होत्या. शत्रुसैन्याची फळी फोडून आंत घुसण्यासाठीं म्हणून लागणारे जड टँक्स व तसेंच द्रुतगति व अतिद्रुतगति रणगाडे जपानजवळ फारसे नाहींत. जपानचा अतिबलवान् रणगाडा १४ टन वजनी व " ९४ " नांवाचा असून त्याची यांत्रिक पद्धति नांवाजण्यासारखी आहे. तसेंच अतिजलदगतीचा रणगाडा " ९२ " असून त्याचा वेग दरताशीं फक्त ३० मैल आहे. हें प्रमाण युरोपीयन राष्ट्रांच्या रणगाड्यांच्या मानानें फार कमी पडतें.

## जपानचें वैमानिक दल.

१९३७ मध्यें जपानच्या वैमानिक ब्रिगेडमध्यें १८ रेजिमेंट्स होत्या व एकंदर १००० लष्करी विमानें व ८०० हायड्रोप्लेन्स यांची ३९ स्क्वाड्रन्समध्यें विभागणी केली होती. जपानजवळ ताशीं १५० ते १८० मैल जाणारीं जे ९१, जे ९२ व जे ९३ हीं विमानें असून जे ९५ ची २०० मैल व जे ९६ चा २५० मैल वेग आहे. परंतु याहून अधिक वेगवान विमानें जपानजवळ नाहींत. जंकर

धर्तीवर रचलेल्या जपानी बॉंबर्स विमानांची ताशीं १५५ मैल गति असून त्यांस ०·६ ते १ टन वजनी बॉंब वाहून नेतां येतात. या विभागांतील लष्करी वैगुण्य काढून टाकण्यासाठीं जपाननें परदेशांतील कांहीं विमानें विकत घेऊन तशीं आपल्या देशांत काढण्यासाठीं लायसन्सहि घेतलें आहे व कांहीं फ्रेंच नमुने विकत घेतले आहेत. त्यांत त्वरित गति बॉंबर ब्रिगेवल्चर ( Breguet vultur ) यांची गति ताशीं ३०० मैल असून डिव्हॉइटिन ५१० फायटरची २५० मैल गति आहे. याचप्रमाणें अमेरिकन ट्रॅन्स्पोर्ट आणि बॉंबर डग्लस डी सी २ हेंहि विकत घेतलें आहे. परंतु एवढें करूनहि जपानचें वैमानिक दल कमी बलाचेंच राहिलें. याचें कारण त्यांतील मनुष्यबळ कमी आहे. १९३६ मध्यें जपानांत फक्त ३०० पायलट तयार झाले व १९३४ मध्यें तर फक्त १५० च झाले होते. व हें शिक्षण देणाऱ्या संस्था म्हणजे डेपो जपानांत फक्त वमानिक दलाला ३, विमान टेहळणी डीपो १, ईरोनॉटिक्स डेपो १, व वैमानिक युद्धशास्त्राचा डेपो १ इतकेच काय ते आहेत. याच्या उलट रशियांत वैमानिक दलास शिकविण्याचे ८० डेपो असून त्यांत पायलट शिक्षणासाठीं ४४ आहेत व त्यांची वाढ प्रतिवर्षीं होत असून त्यांतून एकूण पायलट्स १॥ लक्ष तयार करावयाचे रशियानें ठरविलें आहे. यावरून जपानी वैमानिकदल युरोपीयन वैमानिकदलाच्या मानानें किती निकृष्ट दर्ज्याचें आहे तें लक्षांत आलें असेलच.

## जपानी नाविकसामर्थ्य.

मागील महायुद्धानंतर जपाननें आपलें नौकादलसामर्थ्य इतर राष्ट्रांच्या मानानें फार वाढविलें असून ज्या पॅसिफिक महासागरांत त्यास विशेष काम पडतें त्यांत टिकणारे यंत्रसामर्थ्यांत आपल्या नौकांतून बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या असून शस्त्रसुसज्जतेंत व टनेजचे प्रमाणांतहि बरीच प्रगति घडवून आणली आहे. शिवाय इतर राष्ट्रांच्या मानानें अगदीं आधुनिक यंत्रसामर्थ्यवान नौका जपानच्या मालकीच्या अधिक आहेत. "नगाटो" व "मुत्सु" या दोन जपानी जहाजांवरच प्रथमत: जड १६ इंची तोफा ठेवल्या गेल्या. शिवाय "कॉंगो" नांवाचें जपानी बॅटल क्रूझर अस्तित्वांत असलेल्या बॅटल क्रूझरच्या मानानें फार मोठें लढाऊ व सामर्थ्यवान जहाज आहे. जपानी हेव्ही क्रूझर्सवर आठ इंची दहा तोफा बसविल्या असून त्यांस जोडलेलें संरक्षक पोलादी आवरणहि

उच्च दर्ज्याचें आहे, व त्याच वर्गातील इतर राष्ट्रांच्या जहाजांच्या गतिमानानेंहि अधिक त्वरितगति आहेत. अमेरिकेच्या आधुनिक १० हजार टनी क्रूझर-बोटीवर लावलेल्या सहाइंची १५ तोफा जपाननें आपल्या हलक्या ८५०० टन क्रूझरवरच लाविल्या आहेत, व शिवाय जपानी क्रूझर्सवर अमेरिकेच्यामानानें अधिक टॉर्पेडो ठेविले आहेत. जपाननें आपलें आरमार नवीन धर्तीवर बांधण्यास प्रथम प्रारंभ केल्यानें त्यांजजवळ आधुनिक यंत्रपद्धतीचीं शस्त्रास्त्रसुसज्ज जहाजें अधिक असून त्यांतील ४३००० टनी ज्यावर सोळा-इंची बारा तोफा बसविल्या आहेत अशीं चार राक्षसी बॅटलशिप्स आहेत. जपानचा हा कार्यक्रम १९३७ मध्यें सुरू झाला तर अमेरिकेनें आपल्या आरमारांतील जहाजांची सुधारणा करण्यास १९३८ मध्यें प्रारंभ केला. तथापि एकूण टनेजच्या प्रमाणांत जपानपेक्षां अमेरिकेचें आरमार उच्चदर्ज्याचें ठरेल व शिवाय बॅटलशिप्सचें प्रमाण १५ : ९, हेव्ही क्रूझर्स १७ : १२ व डिस्ट्रॉयर्स २०६ : १०५ याप्रमाणें जहाजांच्या नानाप्रकारांतहि अमेरिका पुढें आहे. परंतु लाइटक्रूझर्सच्या बाबतींत मात्र यांत्रिक पद्धति व गणती या दोन्ही बाबींत जपानची सरशी आहे.

जपानच्या राष्ट्राभोंवतीं सर्वत्र समुद्र पसरला असल्यामुळें त्यास मुख्यतः नाविक सामर्थ्य अधिक असावयास पाहिजे. जपानचे पूर्वेस पॅसिफिक महासागर पसरलेला आहे म्हणून तेथेंच त्याला आपल्या राष्ट्राच्या संरक्षणार्थ मोठमोठालीं बेटें हातीं असावयास पाहिजेत व तीं तशीं त्यानें ठेविलींहि आहेत. जपानला पॅसिफिकवरील वर्चस्वांतील प्रतिस्पर्धी किंवा आक्रमण शत्रु म्हणजे अमेरिकन राष्ट्र होय. अमेरिकेचे चीनमधील हितसंबंध अधिक दृढ असून त्यास हाँगकाँग व शांघाय हीं चिनीबंदरें स्वहितार्थ हातीं ठेवणें अवश्यक आहे, पण चीन व अमेरिका यांतील अंतर फार दूर असून चीनच्या अगदीं नजीक जपान आहे. पॅसिफिक महासागरांत आपला व्यापार सुरक्षित चालण्यासाठीं जपानला सामुद्रिक किल्ल्यांची जरूरी असून यासाठीं अनेक बेटें जपाननें आपल्या हातांत ठेविलीं आहेत व त्यांजवर उत्तम तटबंदीहि करून ठेविली आहे. जपानचीं बेटें म्हणजे उत्तरेकडे क्युराइल बेटें व दक्षिणेकडे फोर्मोसा असून फोर्मोसा व एशियन भूमि यांजमधील दुवा म्हणजे पेरकॅडोर बेटें हीं होत. यामुळें पूर्वचिनी समुद्रावर जपानला आपला पूर्ण ताबा ठेवतां येईल. याप्रमाणें जपानला आपल्या राष्ट्राभोंवतीं नाविक तटबंदी करून अमेरिकेच्या आक्रमणास प्रतिकार करतां येईल, व

अमेरिकेचीं बंदरें शांघाय व हाँगकाँग यांचा कोंडमारा करून त्यावर मात लौकर करून दोन्ही बंदरांतील अमेरिकन जलमार्ग रोखून धरतां येईल. या शिवाय अमेरिकेला तोंड देण्यासाठीं पॅसिफिकच्या मध्यावर मान्याच्या जागा जपानच्या हातांत आहेत. पूर्वीचीं जर्मन बेटें मरीयाना, पेल्यू, कॅरोलीन व मार्शल आयलंड्स हीं जपानच्या हातांत असल्यामुळें या बेटांवर आरमारी व मदतगार वैमानिक मान्याच्या जागा जपानला ठेवतां येणें सुलभ होईल. या मान्याच्या बेटांस मदत म्हणून व्होलकॅनो व बॉनिज बेटें घेतलीं कीं दक्षिण पॅसिफिक महासागरांत ऑस्ट्रेलिया ( न्यू गिनी ) व जपानी राष्ट्र यांमधील तटबंदी पुरी होते व त्यामुळें अमेरिकेच्या आरमाराची दक्षिण पॅसिफिक महासागरांतील हाल-चाल बंद पाडतां येईल व शिवाय अमेरिकन ट्रॅन्स पॅसिफिक वैमानिक मार्ग ( जो सॅनफ्रॅन्सिस्को ते गुअम बेटें, फिलिपाइन बेटें ते हाँगकाँग असा ठरविलेला आहे ) बंद पाडतां येईल. तसेंच अमेरिकेचीं पश्चिम व दक्षिण पॅसिफिकमधील बेटें गुआम व फिलिपाइन्स यांची पांचावर धारण बसवितां येईल व हीं बेटें तर अमेरिकेची पॅसिफिकमध्यें जपानविरुद्ध नाविक दलाची आघाडीची जागा आहे. अमेरिकेच्या मुख्य तटबंदीच्या मान्याच्या जागा अल्यूरियन बेटावरील डच बंदर व हवाई बेटावरील पर्ल बंदर या होत. व हीं जपानपासून ३७३५ मैलांवर आहेत व म्हणून त्यांचा आक्रमणांत फारसा उपयोग नाहीं. या व इतर अनेक कारणांनीं अमेरिकेला जपानवर एकदम आक्रमण करणें जड़च जाणार आहे व करावयाचें झाल्यास त्यास रशियाची किंवा ग्रेट ब्रिटनची मदत घेणें जरूर आहे.

## ग्रेट ब्रिटनचें सामर्थ्य.

युरोपिन लष्करी चढाओढींत ब्रिटिश सैन्याचा भाग फार मोठा असून १९१४ चे जर्मनी विरुद्ध फ्रान्स या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांच्या संयुक्त कामगिरींत ब्रिटिश सेनेचा भाग फार मोठा आहे हें अगदीं अलीकडील जर्मनीनें प्रसिद्ध केलेल्या महायुद्धाच्या इतिहासावरून सहज समजतें. दोस्त राष्ट्रांना युद्धांत मिळणाऱ्या यशाच्या वांट्यांत ब्रिटिश आरमारानें गाजविलेला समुद्रावरील पराक्रम, आर्थिक व राजकीय वर्चस्व, इजिप्त, मेसापोटेमिया वगैरे भागांत शत्रुपक्षावर केलेली मात यांचा जसा मोठा भाग आहे, तितकाच हिस्सा पश्चिम आघाडीवरील सैन्यानें केलेल्या मर्दुमकीलाहि देणें अवश्य आहे. महायुद्धांत फ्रेंच सैन्याच्या मदतीस

म्हणून गेलेले ब्रिटिश एक्सपिडिशनरी फोर्सकडे व्हर्डून व आघाडीवरील इतर भागांतून नेमून दिलेल्या भागांत जर्मनांच्या हल्ल्यास तोंड देऊन त्यांस जिंकण्याचें काम होतें तें त्यांनीं चोख पार पाडलें व त्यांतच जर्मन सैन्याची दमछाट झाली. १९१६ मध्यें सॉमच्या लढाईत ब्रिटिश फौजेनें प्रथमतः जर्मन सेनेवर आक्रमक हल्ला चढविला. त्यायोगें व्हर्डून वांचलें, आंग्लफ्रेंच संघास बळकटी आली, ब्रिटिश सैनिकांस लढाईत प्रत्यक्ष भाग घेतां आला, व जर्मन लष्करास धडकी भरली, असें माजी लष्करमंत्री व फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲडमिरॅल्टी डफकूपर म्हणतो. १९१७ मध्यें आंग्ल सैन्याच्या आक्रमक सैन्यास तोंड देण्यासाठीं पश्चिम आघाडीवर जर्मनीला आपल्या लष्कराचा ¾ भाग खर्चावा लागला होता हे लक्षांत ठेविलें पाहिजे. ८ ऑगस्ट १९१८ ला झालेल्या ॲमीन्सच्या लढाईत ब्रिटिश रणगाडे, ब्रिटिश पायदळ व ब्रिटिश घोडदळ यांनीं गाजविलेल्या मर्दुकीनेंच जर्मनीचा पराजय झाला असें जर्मनीनें १९३६ मध्यें प्रसिद्ध केलेल्या युद्धेतिहासाच्या पहिल्या खंडांत म्हटलें आहे. १९१८ मध्यें पश्चिम रणक्षेत्रावर ब्रिटिश फौजेचे ५८ डिव्हिजन्स तळ पडले असून कमींत कमी ५७ लक्ष ४ ह. लोक फौजेंत सामील होते, व ब्रिटिशांच्या युद्धोपयोगी कारखान्यांतून ३५००० विमानें व २४००० गन्सचें उत्पादन करण्याची पात्रता ब्रिटनमध्यें होती ! परंतु व्हर्सायच्या तहानंतर मात्र ही परिस्थिति कायम न राहतां १९१८ ते १९३४ पर्यंत यांत बरीच कमतरतां घडत जाऊन ब्रिटिश लष्कराची युद्धसामर्थ्याच्या बाबतींत इतर राष्ट्रांच्या मानानें पीछेहाट होत गेली. परंतु हेर हिटलरचा उदय होऊन त्याचे आक्रमक धोरणाचा सुगावा लागतांच १९३६ पासून या बाबतींतील धोरण बदलून १९३६ ते १९३९ या वर्षांत इंग्रजी लष्करी धोरणांत मोठ्या सुधारणा घडवून आणून इंग्लंडनें आपलें स्थगित केलेलें सामर्थ्य पुनः जोरानें वाढविलें व तें अधिक वाढविण्याचे सततोद्योग सुरू आहेत. नवीन महायुद्धांत इंग्लडनें मोठा भाग आपणांकडे घेतला आहे. इंग्लंडनें आपली मुख्य धुरा आरमारावर ठेविली असून त्याची प्रचंड वाढ केली. त्याचबरोबर त्यानें वैमानिक दलाचीहि प्रगति चालू ठेविली. परंतु त्याच प्रमाणांत खुष्की सैन्याकडे तितकासा मर न दिल्यानें रशिया व जर्मनी प्रमाणें भरमसाट सैनिकवाढ केली नाहीं. रशिया व जर्मनीप्रमाणें वैमानिक दल व यंत्रसामर्थ्यांत ब्रिटिश सैन्याची सरशी नाहीं अशी खोटीच हाकाटी करून

आपलें बल फार मोठें वाढविण्यास ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांस भाग पाडण्याच्या उद्देशानें ब्रिटिश लेखक भयप्रद लेख लिहित असले तरी वस्तुस्थितीचें दिग्दर्शन सोव्हिएट तज्ज्ञांच्या लिखाणावरून होण्यासारखें आहे. हा रशियन लेखक लिहितोः–" इतर भांडवलशाही राष्ट्रांच्या लिखाणांतून लष्कराच्या मोटरीकरणासंबंधीं निघणाऱ्या धोरणांत ब्रिटिश लष्करी तत्त्ववेत्त्यांचें धोरण पुरोगामी आहे असेंच म्हटलें पाहिजे. " त्याचप्रमाणें रशियाच्या मोटरित व यांत्रिक विभागाचा प्रमुख शालेव्स्की म्हणतो:–" ब्रिटिश लष्करी तज्ज्ञांच्या मतें रणगाडे विभागास स्वतंत्र कामगिरी व युद्ध करावें लागेल व या विभागाचें सैन्य पायदळाच्या मदतीशिवाय स्वतंत्रपणेंच युद्ध करून यश मिळविण्यास योग्य राहील. " तथापि रशिया व जर्मनीच्या मानानें इंग्लंडनें आपल्या सैन्यास मोटरी व यांत्रिक सामर्थ्याची जोड दिली नाहीं असें ब्रिटिश लष्करी तज्ज्ञ लिडेल हार्ट याचें म्हणणें आहे. तो म्हणतो, "आपल्या एकस्या टॅन्क ब्रिगेडमध्यें असणाऱ्या २०० रणगाड्यांची संख्या पाहिली कीं कॉंटिनेंटल सैन्यांतील हजारोंनीं मोजतां येणाऱ्या रणगाड्यांच्या संख्येपुढें अगदींच क्षुद्र दिसेल. अगदीं आधुनिक सामर्थ्याचे रणगाडे म्हणजे ब्रिटिश सैन्यांत असणारे कमवजनी टॅंक्स, पण हे रणगाडे इतके हलके व लहान आहेत कीं अडचणीच्या मार्गांतून बाहेर निघण्याच्या बाबींत रशियन रणगाड्यापुढें ते अगदीं क्षुल्लक ठरतील. रशियाजवळ या प्रकारचीं अनेक हलकीं यंत्रें असून रशियाचे " कमी वजनी " रणगाडे म्हणजे आपल्या मध्यमवजनी ११ टन रणगाड्यांच्या बरोबरीचे आहेत, व त्यांचे मध्यमवजनी रणगाडे २७ टन वजनी आहेत; शिवाय आपले मध्यमवजनी रणगाडे १४ वर्षांच्या जुन्या यंत्रपद्धतीचे असून आज रणावर पाठविण्यायोग्य नाहींत, व आधुनिक यंत्रयुक्त रणगाड्यास प्रतिकार करणें त्यांस मुळींच शक्य नाहीं. "

१९३७ मध्यें इंग्लंडनें ठरविलेल्या लष्करी सुधारणांत पुष्कळ नव्या बाबी होत्या, त्यांत ( १ ) कॅव्हलरी रेजिमेंट्सच्या जागीं लाइट मेकॅनाइझ्ड युनिट्स उभारणें ( २ ) तोफदळांतून वाहनासाठीं मोटरी पुरविणें, व ( ३ ) पायदळास न्यू लाइट ब्रेन गन्स व सुधारलेल्या ॲन्टी एअरक्रॅफ्ट गन्स पुरविणें या होत. या सुधारणांमुळें ब्रिटिश लष्कराचें युद्धसामर्थ्य वाढलें तरी तें बेताचेंच होतें असें तज्ज्ञांचें म्हणणें होतें. रशिया व जर्मनीप्रमाणें इंग्लंडनें आपल्या सर्व सैन्यांतून मोटरित शॉकआर्मी करण्याचें ठरविलें नव्हतें हें कॅप्टन लिडेन हार्ट याच्या

लिखाणावरून सहज ध्यानीं येतें. तो म्हणतो "ग्रेट ब्रिटनचें आघाडीवरील लहानसें लष्कर जें आघाडीवर अकल्पित कारणानें उशीरां पोहोंचेल, त्याचे हातून परिणामकारक कार्य करणें, अथवा आक्रमक सैन्यानें युद्धारंभीं पहिल्या धडाक्याला मिळविलेल्या फायद्याला काढून घेणें हीं कार्यें होणार नाहींत." ("A small field force from Great Britain, inevitably late in arrival would seem to have little chance of influencing the issue or retrieving any advantage which an invader might gain by surprise in the first days of war") ३ मार्च १९३८ रोजीं प्रसिद्ध झालेल्या व्हाइट बुकामध्येंसुद्धां सुचविलेल्या सुधारणांचा रोख फारसा पुढारलेला नव्हता. होअर बेलेशिया या युद्धमंत्र्यानें सुचविलेल्या सुधारणांनंतर मात्र यापुढें ब्रिटननें लष्करी सामर्थ्य वाढविण्याचें पक्कें ठरविलें असें दिसतें. १० मार्च १९३८ ला या मंत्र्यानें आपल्या सुधारणा जाहीर केल्या त्यांवरून मात्र इंग्लंडनें आपल्या सर्व फौजांतून यांत्रिक विभाग व रणगाडे विभाग सररहा करण्याचें ठरविलें. याशिवाय पायदळाची गति व मारक शक्ति अधिक वाढविण्याचेंहि ठरलें. १० आक्टोबर १९३८ च्या होअर बेलेशियाच्या भाषणावरून टेरिटोरियल सैन्याची पुनर्घटना करून तिचे १८ डिव्हिजन करावयाचे व त्यांतील पांचाकडे वैमानिक हल्ल्यापासून संरक्षण सोंपवावें असें ठरलें.

## ब्रिटनचें वैमानिक सामर्थ्य

आज पावेतों आरमारी सामर्थ्यावर इंग्लंडला आपलें परदेशी राजकारण चालवितां येई. परंतु गेल्या दहापंधरा वर्षांतील घडामोडी व वैमानिक दलाचें वर्चस्व यामुळें यापुढें इंग्लंडला नुसत्या आरमारावर विसंबून राहणें शक्य नसल्यामुळें त्यास आपल्या लष्करी धोरणांत महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणून आपल्या वैमानिक दलाची वाढ करणें क्रमप्राप्तच झालें. याबद्दल ऑगर हा ब्रिटिश राजधोरणाचा तज्ज्ञ म्हणतोः—"In the past the British navy could go everywhere as an instrument of British foreign policy. Today that is no longer the case. If Great Britain's prestige is to be up-held, then in the future the air arm must be the instrument for the purpose." "गतकालांत आपल्या परदेशी राजकारणाचें धोरण संभाळण्यासाठीं ब्रिटिश आरमारास कोठेंहि जातां येत

असे परंतु आज ती स्थिति राहिली नाहीं. ग्रेट ब्रिटनचा मान कायम ठेवावयाचा असेल तर भावी कालांत वैमानिक दलविभाग हेंच त्याचें मुख्य साधन राहील." वस्तुतः दरवर्षी जास्तींत जास्ती ६०००० विमानें उत्पादन करण्याची शक्ति, विशिष्ट प्रकारची तयारी केल्यास, इंग्लंडला आपल्या राष्ट्रांत निर्माण करतां येईल असें १९३५ मध्यें एका रशियन तज्ज्ञानें म्हटलें होतें. एकंदर शस्त्रास्त्र-सुसज्जता करण्याच्या प्रयत्नांत वैमानिक विभागाकडे अधिक लक्ष दिलें होतें हेंहि खरें. याचें प्रत्यन्तर १९३७ मध्यें इंग्लंडमध्यें अनेक प्रकारचीं द्रुत-गतीचीं विमानें निघत होतीं हें होय. ग्लॉस्टर ग्लॅडिएटर, स्पिटफायर फायटर्स, हॉकर हरिकेन इत्यादि विमानांची गति दरताशीं २५० ते ३५० मैल होती. फेअरी बॅटल, हॉकर हेन्ले, ब्रिस्टल ब्लेनहीम टाइप या लाइट बॉंबर्सचा २०० ते २८० मैल दर तासास वेग आहे. व्हिकर्स वेलस्ली टाइप हे लांब पल्ल्याचे बॉंबर्स व ॲव्रो ॲन्सन व वेस्टलॅंड–लिसँडर हीं मोठीं फायटिंग प्लेन्स असून हेव्ही व मीडीयम बॉंबर्समध्यें आर्मस्ट्रॉंग–व्हिटवर्थ व हेन्डले पेज हीं आहेत. या सर्व जातींचीं विमानें इंग्लंडच्या ईरो इंडस्ट्रीजमध्यें तयार होतात. इंग्लंडचा यांत्रिक माल सर्व युरोपांत टिकाऊ व मजबूत असतो अशी त्याची प्रशंसा इतर राष्ट्रांतील तज्ज्ञहि करतात. ही वस्तुस्थिति खरी असली तरी त्यांत कांहीं अंदर बट्टयाच्या गोष्टींचा बभ्रा टाइम्स व चर्चिल प्रभृति साम्राज्य-वाद्यांनीं वारंवार केलेला दृष्टीस पडतो. त्यावरून जर्मनी व रशिया प्रमाणें वैमा-निक दलाची भरमसाट वाढ इंग्लंडनें केली नाहीं हें खरेंच आहे. वाढीची पूर्ण शक्यता असूनहि इंग्लंडनें आपल्या उत्पादनशक्तीसाठीं कारखानेवाढ केली नाहीं व जी उत्पादनशक्ति वस्तुतः आज अंगीं आहे तिचाहि पूर्ण फायदा सरकार करून घेत नाहीं; विमानें तयार करण्यास लागणारे वेगळाले भाग ज्या निरनि-राळ्या कारखान्यांत पैदा होतात, त्यांच्यांत एकवाक्यता कमी असें या वरील आक्षेपकांचें मुख्यतः म्हणणें होतें, व हें खरें आहे म्हणून अमेरिकेंतून अधिकीचीं विमानें मागवावींत असा त्यांचा अट्टाहास असे.

बरेच दिवस इंग्लंडचें धोरण नुसतें संरक्षणक्षमतेइतकेंच होतें, परंतु नुस्तें संरक्षक दल ठेवून यापुढें चालणार नाहीं तर त्यास आक्रमकदलाचीहि जोड द्यावी हें धोरण मागाहून ठरविलें गेलें तरी आतां संरक्षण व आक्रमण या दोन्ही बाबतींत वैमानिक दल सुसज्ज करण्यांत आलें असून सध्यां बॉंबर्स विमानांची

संचारक्षमता जवळजवळ १००० मैलांची आहे म्हणजे काम पडल्यास दक्षिण इटली व पूर्व पोलंडपर्यंत इंग्लंडचीं विमानें जाऊं शकतात. इंग्लंडच्या वैमानिक दलांत बॉबर्सचा भरणा अधिक आहे, व १९३८ च्या आरंभीं १५४० विमानांत ८४० बॉबर्स होतीं हें त्याचें प्रतीक आहे. आज संरक्षकदल किंवा ज्यास मेट्रॉपालिटन एअर फोर्स म्हणतात त्यांत आघाडीला १७५० विमानें १९३९ च्या मार्चमध्यें उभीं करतां येऊन त्यांस मदतीसाठीं शिवाय राखीव विमानांचीहि भरती चांगली राहील असें सर किंगस्लेवुड यांचें म्हणणें असून यांत आणखी २३७० विमानांची वाढ होईल असेंहि सांगण्यांत आलें होतें. लढाईला अधिकाधिक रंग चढतांच ही लढाऊ विमानांची संख्याहि अधिक वाढत राहील व १९३८ मध्यें आखलेला कार्यक्रम पार पाडल्यास १९४१ मध्यें ब्रिटिश वैमानिक दलांत संरक्षक सैन्यांतच फक्त आघाडीला ३००० ते ४००० विमानें उभीं राहतील ! याशिवाय आक्रमक दलांत किती राहतील याचा अंदाज सांगतां येत नाहीं. लेफ्टनंट कमँडर आर. फ्लेचर एम्. पी. यानें या संबंधांत मात्र इंग्लंडला वैमानिक दल अधिक वाढविण्याची अगत्याची सूचना दिली होती. या तज्ज्ञाच्या मतें शत्रुराष्ट्रांना इंग्लंडला वैमानिक उपद्रव देणें अगदीं सोपें आहे. कारण, प्रथम इंग्लंड देश हें एक बेट आहे व याचे औद्योगिक कारखाने संघटित व थोड्या विवक्षित क्षेत्रांत पसरले आहेत. या देशाची मुख्य राजधानी व एकचतुर्थांश लोकसंख्या कॉन्टिनेन्टल युरपच्या अगदीं नजीक असून या सर्व भागाचें दृश्य थेम्स नदीच्या योगानें सहज उघड होण्यासारखें आहे. स्पेन, चीन व ॲबीसीनिया या देशांतील युद्धांत वैमानिकदलानें टाकलेल्या बाँबची कामगिरी किती परिणामकारी व तडकाफडकी झाली हें सर्वांस कळून चुकलें आहे, व त्याप्रमाणें करावयाचें म्हटल्यास लंडन, बर्मिंगहॅम, मँचेस्टर, न्य कॅसल वगैरे औद्योगिक केन्द्रांवर शत्रुपक्षाचे प्रस्तुत वैमानिक दलास सहज आक्रमण करतां येईल, व त्यापासून बचाव करावयासाठीं इंग्लंडचें वैमानिक दल संरक्षणक्षम असावयास पाहिजे.

कोणतेहि वैमानिक दल संरक्षणक्षम होण्यास त्याला ॲन्टी–एअरक्रॅफ्ट आर्टिलरी ( वैमानिक प्रतिकारक तोफा ), बलून बरोजेस, ए. आर. पी. ( ॲन्टी-रेड प्रिकॉशन ) व लढाऊ विमानें यांची अत्यंत जरूरी आहे हें खरें असलें तरी मुख्य भिस्त आक्रमक विमानांना तोंड देऊन शत्रूच्या आक्रमणास त्यांचे देशा-

वर आपलें वैमानिक आक्रमण देणें हेंहि केलें पाहिजे. ज्या पद्धतीनें आरमाराचें बलाबल शत्रुपक्षाच्या आरमाराशीं तुलना करून आपण पाहातों त्याच पद्धतीनें आपल्या वैमानिक दलाची शत्रूच्या वैमानिक दलाशीं तुलना करूनच शक्ति आपण ठरविली पाहिजे. हें करणें अत्यंत कठिण आहे. कारण कोणीहि सरकार आपलें खरें सामर्थ्य कशांत आहे व आपलें मरण कशांत आहे या गोष्टी सहजासहज प्रकट होऊं देत नाहीं, व जे आंकडे मधूनमधून प्रसिद्ध होतात त्यांतून कितीतरी गोष्टी बाद करून मोजमाप करावयास पाहिजे. वैमानिक दलाचें सामर्थ्य ठरवावयाचें म्हणजे तोंडावर द्यावयाच्या विमानांची संख्या, पुरवठ्याचीं राखीव विमानें, इतर राखीव विमानें, वैमानिक शिक्षण व मुलकी वैमानिक लोक, सुशिक्षित पायलट; त्यांची संघटना व लढत तयारी या सर्व गोष्टींचा विचार करावयास पाहिजे. यासाठीं फ्रेंच पॉप्युलर फ्रंट सरकारचे वैमानिक मंत्रि पेरिकॉट यांनीं न्यूजक्रॉनिकलमध्यें प्रसिद्ध केलेले आंकडे मान्य करतां येण्यासारखे असल्यानें आपण त्यांचें निरीक्षण करूंया. या मंत्र्याच्या मतें युरोपीयन राष्ट्रें युद्धारंभीं खालीलप्रमाणें वैमानिक संख्या आघाडीवर ठेवतील.

| | |
|---|---|
| रशिया ४००० | ग्रेट ब्रिटन २००० |
| जर्मनी ३५०० | इटली २००० |
| फ्रान्स २५०० | पोलंड ५०० |
| झीकोस्लोव्हेकिया ५०० | |

या आघाडीवरील विमानांच्या मागच्या बाजूस सज्ज म्हणून पुरवणीचीं राखीव विमानें वरील आंकड्यांच्या निम्यानें तरी रहावयास पाहिजेत, व तशी सोय रशिया व जर्मनी यांना करतां येईल. इटली अगदीं त्याच प्रमाणावर नाहीं तरी जवळपास तसली सोय करील. फ्रान्स व इंग्लंडनें मात्र या बाबतींत बरीच ढिलाई केली होती, व म्हणून आघाडीची व पुरवणी मिळून सर्व राष्ट्रांची साधारण वैमानिक शक्ति पुढीलप्रमाणें होऊं शकेल.

रशिया ६२०० ते ६५००

जर्मनी ५२०० ते ५५००

इटली २३०० ते २६००

फ्रान्स २२०० ते २५००

इंग्लंड २३०० ते २६०० [ हे आंकडे "*Air Defence of British*" by R. Fletcher, M. P. Page 167 वरून घेतले आहेत. ]

इंग्लंडच्या वैमानिकदलापैकीं कांहीं विमानें साम्राज्यदुव्याच्या मार्गावर वांटलीं गेल्यामुळें तर होम डिफेन्ससाठीं १९०० ते २१०० विमानेंच एकूण प्रथमतः कामीं येतील. युद्धांत निकामी होणारीं, शत्रूच्या हातीं जाणारीं, नाश पावणारीं विमानें या संख्येस नासधूस म्हणतात. असली तूट भरून काढण्यास प्रत्येक राष्ट्रास दरमहिन्यास आपापल्या यांत्रिक कारखान्यांतून शेंकडोंची भरती करतां आली पाहिजे. या भरतीच्या वैमानिक उत्पादनाचे मासिक आंकडे साधारणतः जर्मनी ६००, फ्रान्स ३०० व इंग्लंड ४०० असें देतां येतील.

विमानोत्पादन व वैमानिकदलसुसज्जता यांचा विचार करतां आघाडीच्या विमानांपैकीं ५० टक्के विमानें जाया होतील असें कांहींचें म्हणणें असेल तर कांहींच्या मतें १०० टक्के यांची तूट पडणें संभवनीय आहे व याकरितां राष्ट्राची विमानोत्पादनशक्ति आघाडीवरील संख्येच्या निम्याची भर करतां येईल इतकी तरी असावयास पाहिजे. रशिया व जर्मनी या राष्ट्रांची बरोबरी करावयाची असल्यास इंग्लंडला दरमहिन्यास २००० ते २५०० अथवा सालिना २५००० विमानांचें उत्पादन करावयास पाहिजे, तरच वरील राष्ट्रांस त्याला तोंड देतां येईल. इंग्लंडनें १९३४ ते १९३८ पर्यंत या बाबतींत कसून प्रयत्न करून १९३४ मध्यें १३०४ तर १९३७ मध्यें १५०० व १९३९ च्या मार्चमध्यें १७५० आघाडीचीं विमानें ठेवतां येतील असें धोरण आंखून ठेविलें होतें, व मे १९३८ मध्यें ठरविलेल्या धोरणानुसार मार्च १९४० मध्यें आघाडीला २३७० विमानें ठेवत येतील असें धोरण ठरवून बरीच प्रगति केली असें ले. कमँडर फ्लेचरचें म्हणणें आहे. ( The Air Defence पृष्ठ १७१ ) झेकोस्लोव्हेकियाच्या आक्रमणानंतर मात्र इंग्लंडनें गेल्या वर्षभर धीमेपणानें व जागरूकपणें आपल्या लष्करांत फार सुधारणा घडवून तयारी करून ठेवून नंतर जर्मनीला युद्धाचें आव्हान दिलें असें पुष्कळ तज्ज्ञांचें म्हणणें आहे व याचें प्रत्यन्तर मधून मधून येणाऱ्या युद्धविषयक बातम्यांवरून सहज दिसेल.

## ब्रिटिश आरमार

गेल्या दीडशें वर्षांत इंग्लंडनें सागरसम्राज्ञी ( Mistress of the Seas ) अशी सार्थ पदवी संपादन केली, व नेपोलियनच्या आरमारास नाइल नदींत

नेल्सननें मूठमाती दिल्यानंतर कित्येक वर्षे ब्रिटनशीं कोणतेंच राष्ट्र समुद्रावरील सत्तेबाबत स्पर्धा करूं शकत नव्हतें. इंग्लंडचे आरमाराबाबत प्रतिस्पर्धी म्हणजे अमेरिका, जपान, फ्रान्स, इटली व जर्मनी हे आहेत. १९१४ ते १९३९ या मधील काळांत सागरवर्चस्वाच्या बाबतींत बऱ्याच घडामोडी होऊन आज इंग्लंडला जवळचा प्रतिस्पर्धी म्हणजे इटली व दूरचा म्हणजे जपानी राष्ट्र होय असें म्हणावयास हरकत नाहीं. १९१४ चें इंग्लंडचें आरमारी सामर्थ्य व आजचें युद्धपूर्व सामर्थ्य यांत फार बदल झाला होता, व पूर्वीच्याहून इंग्लंड या बाबतींत ढिलेंच पडलें होतें. तें कसें तें पाहण्यासारखें आहे. १९१४ मध्यें युद्धारंभीं इंग्लंडच्या नाविक दलांत ६९ बॅटल शिप्स, १०५ क्रूझर्स, ३२२ डिस्ट्रॉयर्स, ७६ सबमरीन्स व याशिवाय इतर असंख्य लहानसहान बोटी होत्या. या सर्व मिळून इंग्रजांचें आरमार इतर कोणत्याहि दोन युरोपीयन आरमारांची बरोबरी करण्याइतकें प्रबल होतें. युद्धानंतर मात्र त्याचें प्रमाण फार घटलें; व १९३६ मध्यें अधिकृत सरकारी आंकडे प्रसिद्ध झाले त्यावरून त्या वर्षी इंग्लंडच्या आरमारांत पुढीलप्रमाणें जहाजांची संख्या होती—

| | |
|---|---|
| १२ बॅटल शिप्स | १ क्रूझर माइन लेअर |
| ३ बॅटल क्रूझर्स | ८ एअरक्रॅफ्ट कॅरिअर |
| ५४ क्रूझर्स ( पैकीं तीन विकावयाच्या होत्या. ) | १६९ डिस्ट्रॉयर्स ( पैकीं ७ विकावयाचे होते. ) |
| ५१ सबमरीन्स | एकूण ३९८ |

यापैकीं १९३६ च्या सुमारास फक्त २ बॅटल क्रूझर्स, ३६ क्रूझर्स, ४० सबमरीन्स व ६५ डिस्ट्रॉयर्स इतकेंच फक्त अगदीं आधुनिक पद्धतीचें होतें व याप्रमाणें रोडावलेल्या आरमाराकडे इंग्रजी साम्राज्याच्या ८०००० मैल लांबीचा सागरावरील साम्राज्य–मार्ग, तांबडा समुद्र व चीन–मार्ग,उत्तर समुद्र व भूमध्य समुद्र व जवळ जवळ २००० ब्रिटिश व्यापारी जहाजें या सर्वांची रक्षणाची जबाबदारी सोंपविण्यांत आली होती व त्यांतून इंग्लंडला पुरविल्या जाणाऱ्या ५०००० टन अन्नसामग्री, १ लक्ष १० हजार टन व्यापारी जिनसा, ३०००० टन तेल अव्याहत मिळत राहण्याची जबाबदारीहि याच रोडावलेल्या इंग्रजी आरमारावर सोंपविलेली होती. ( *The Dangerous Sea*, page 266 ). इंग्रजांचें

आरमार आधुनिक काळांत इतकें कधींच रोडावलें नव्हतें व हें झाल्यामुळें त्याचें पूर्वीचें "दुप्पटी सामर्थ्य" ( two-power ) जाऊन तें इतर युरोपियन राष्ट्रांच्या एकटें सामर्थ्य ( one-power ) या सदरांत येऊन बसलें. यामुळें १९३६ च्या सुमारास जहाजें व नाविक सैनिक या दोन्ही बाबतींत इंग्लिश आरमार अचानक प्रसंगीं नातयार किंवा बेसावध या स्थितींत होतें. १९३५-३६ च्या ॲबीसीनिया-वरील आक्रमणप्रसंगीं इंग्लंड–इटलीचें युद्ध जुंपलें असतें तर इंग्लंडच्या सागर-वर्चस्वाला मोठा जरी नाहीं तरी लहानसा धक्का बसण्याची वेळ खास आली होती. ही गोष्ट लक्षांत येतांच १९३६ पासून ब्रिटिश सरकारनें आरमारावर अधिक द्रव्य खर्च करून आपलें आरमारी सामर्थ्य वाढविण्याचें ठरविलें व ५४ मोठीं जहाजें व पुष्कळशीं लहान गलबतें बांधण्यास सुरुवात केली, त्यांत पुढील तऱ्हा प्रामुख्यानें बांधण्यांत आल्याः—

२ कॅपिटल शिप्स

७ क्रूझर्स-यांतील सौथॅम्पटन वर्गांतील २ व ५००० टनी लहान.

२ एअरक्रॅफ्ट कॅरिअर्स

१८ डिस्ट्रॉयर्स ( प्रत्येक १५०० टनी ट्रायबल क्लासचे )

८ सबमरीन्स

६ स्लूप्स. ( पैकीं ३ माइनस्वीपर्स, २ कनव्हॉय एस्कॉर्ट व कोस्टल स्लूप. )

६ मोटर टॉर्पेडो बोट्स–१ रिव्हरगनबोट, २ लहान टेहळणी करणारीं, २ स्पेशल सर्व्हिस व याहून लहान अनेक.

यांतील २ बॅटलशिपस् ३३०००–३४००० टनी राहतील व नेल्सन क्लासच्या बोटीइतकी विस्तीर्ण राहतील. यांवर १४ इंची तोफा असून शिवाय ६ इंची तोफखाना राहील व १२ ते १६ ॲन्टी एअर क्रॅफ्ट तोफाहि त्यावर ठेवण्यांत आल्या आहेत व प्रत्येकाची साधारण किंमत ६० ते ७० लक्ष पौंड आहे. आरमारी सैनिकांची संख्याहि २०६३ नें वाढविण्याची ठरविली व त्यामुळें मार्च १९३७ मध्यें आरमारी दलाची संख्या अधिकारी व सैनिक मिळून १०११५४ इतकी भरावयाचें ठरलें होतें. यानंतर १९३७ मध्यें ५ बॅटलशिप्स, २१ क्रूझर्स, ५ एअर क्रॅफ्ट कॅरिअर्स, ४९ डिस्ट्रॉयर्स व १९ सबमरीन्स इतकीं अधिकीचीं गलबतें बांधावयाचें धोरण ब्रिटिश सरकारनें स्वीकारलें. डेली टेलिग्राफचा

आरमारी तज्ज्ञ लेखक हेक्टर बायवॉटर याच्या मतें १९४२ मध्यें ब्रिटिश आरमारांत २५ बॅटलशिप्स, ७० क्रूझर्स, ९ मोठीं एअर क्रॅफ्ट कॅरिअर्स, १५० मॉडर्न डिस्ट्रॉयर्स व ६५ ते ७० मॉडर्न सबमरीन्स इतक्या बोटी राहतील. बोटींचें टनेजचें प्रमाण १९३५ पासून वाढतें आहे व अधिकीच्या वाढीच्या बोटींचें टनी प्रमाण १९३५ मध्यें १३९००० तर १९३६ मध्यें २८२०००, १९३७ मध्यें ३७६००० व १ ऑक्टोबर १९३८ रोजीं तें ५४७००० असें वाढतें ठेवण्यांत आलें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. या सर्व टनेजच्या प्रमाणाकडे पहिलें म्हणजे वैमानिक सामर्थ्य वाढवीत असतां आपलीं शत्रुराष्ट्रें इटली, जर्मनी व जपान यांच्या संयुक्त आरमारास एकटें तोंड देतां येईल ही तयारी करण्याचें इंग्लंडनें ठरवून तशी आरमार वाढ चालविली होती हें सहज ध्यानीं येतें. या बाबतींत इंग्लंड मागें पडणार नाहीं हें सर सॅम्युएल होअर १९३७ चे फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲडमिरॅल्टी यांनीं पार्लमेंटपुढें बोलून दाखविलें. ते म्हणालेः— " We are still in a position to build better and more powerful ships, and to build them more quickly than other Countries. " इतर देशांपेक्षां अधिक जलद्गतीनें, अधिक सामर्थ्यवान् बोटी अधिक सोईनें बांधणें ही आमची आजहि स्थिति कायम आहे.

१९१४ व १९३९ या दोन कालांतील ब्रिटिशांच्या सागरवर्चस्वाच्या परिस्थितींत बराच फरक पडला आहे. १९१४ चे महायुद्धांतील जयानंतर जर्मन आरमाराचें बळ पार नाहींसें झाल्यानें उत्तरसमुद्रांत इंग्लंडला जर्मनीपासून फारशी भीति बरेच दिवस नव्हती, परंतु नाझी जर्मनीच्या नवीन आरमारी धोरणानें उभारलेल्या आरमारांतील नवीन पद्धतीच्या बोटी इंग्रजी आरमारांतील त्याच जातीच्या जहाजांपेक्षां अधिक आक्रमक शक्तीच्या आहेत व यांचा कमी अधिक उपसर्ग इंग्लंडच्या होमफ्लीटला पोहोंचल्याशिवाय राहणार नाहीं. याशिवाय इंग्लंडला भूमध्यसमुद्रांतील इटलीचा उपद्रव कमी करण्यासाठीं या समुद्रांत आपले आरमाराचा बराच भाग स्वतंत्रपणें ठेवावा लागेल. इटलीच्या वाढत्या सागरआकांक्षांस आळा घालावयाचा झाल्यास फ्रान्सलाहि आपल्या आरमाराची वाढ करणें अवश्य झालें आहे. परंतु कितीहि खटपट केली तरी कांहीं वर्षें तरी जर्मनी व इटली या उभयराष्ट्रांच्या संयुक्त आरमारास एकट्यानें तोंड देण्याचें सामर्थ्य आज फ्रान्सला नाहीं. फ्रान्सला भूमध्यसमुद्र व अटलँटिक

महासागर या दोन बाजूंवर इटली व जर्मनी या दोन राष्ट्रांस तोंड द्यावें लागेल व सध्यांच्या फ्रान्सच्या धोरणावरून अटलँटिक महासागरांत नाझी जर्मन आरमाराला टक्कर देण्याची पूर्ण तयारी त्या राष्ट्रानें ठेविली असून या आरमाराची इंग्लंडच्या आरमारास अटलँटिकमध्यें चांगली जोड मिळाली असती.

भूमध्यसमुद्रांतील ब्रिटिश व इटलीच्या आरमारी तळांचा विचार करतां पश्चिम भूमध्य समुद्रांत इटलीला अधिक तळ असून पूर्व भूमध्य समुद्रांत इंग्लंडचे तळ बळकट आहेत असें दिसेल व यामुळें इटली व ब्रिटन यांची सागरवर्चस्वांत बरोबरी होईल असें जर्मन तज्ज्ञांचें म्हणणें आहे. परंतु युद्धास प्रारंभ झाल्यास भूमध्यसमुद्रांत इंग्लंडाप्रमाणेंच फ्रान्सचेहि हितसंबंध अधिक असल्यानें तें राष्ट्र इंग्लंडच्या आरमारास पश्चिम भूमध्यसमुद्रांत मदत केल्याशिवाय राहणार नाहीं, कारण त्यासहि इटलीचें सागरवर्चस्व कमीच करावयाचें आहे, व या दृष्टीनें पाहतां इटलीला पश्चिमेकडून फ्रान्सचें आरमार व पूर्वेकडून ब्रिटिश आरमार या कोंडींत सांपडावें लागेल व मग त्या राष्ट्राचा कोंडमारा झाल्याशिवाय राहणार नाहीं. मात्र हें करीत असतां इंग्लंडला आपला व्यापारी रस्ता आफ्रिकेला वळसा घालून ठेवावा लागेल. या संबंधांत ब्रिटिश लष्करी तज्ज्ञ लिडेल हार्ट म्हणतो कीं—"If the British admiralty is prepared to abandon this route and divert all normal traffic by the Cape route its forces in the Mediterranean may play an important strategic part. By the virtual closing of that sea as a traffic route it might be more effectively utilised as an area of offensive operations against an opponent who could not disencumber himself similarly." आपला भूमध्यसमुद्रांतील दळणवळणाचा मार्ग सोडून केपवरून सर्व वाहातुक ठेवावयाची असें ब्रिटिश ॲडमिरॅल्टीनें ठरविल्यास भूमध्य समुद्रांतील आरमारास युद्धप्रसंगीं उत्तम कामगिरी करतां येईल. या सागरावरील मार्ग पूर्ण बंद केल्यास भूमध्यसमुद्रांतील आरमारी लढाईत शत्रूवर जोराचें आक्रमण करतां येईल, व यांत आपल्याप्रमाणें शत्रूला मात्र संकटांतून लौकर मुक्त होतां येत नाहीं."

भूमध्य समुद्रावरील ताबा अबाधित राहण्यासाठीं इंग्लंडला या समुद्राचें पश्चिम द्वार जिब्राल्टरची सामुद्रधुनी व पूर्वेचें तोंड सुएझचा कालवा हीं दोन्ही

सुरक्षित ठेवावयास पाहिजेत. परंतु जिब्राल्टरचें बंदर स्पेनला लागून असल्या-कारणानें या राष्ट्राशीं दोस्ती ठेवणें इंग्लंडला अत्यवश्यक आहे. गेल्या स्पॅनिश युद्धांत जर्मनी व इटलीनें जनरल फ्रँकोला मदत केल्यानें त्याचा कल सहजच फॅसिस्ट-नाझी राष्ट्रांकडे असणें साहजिकच आहे. स्पेनचें पारडें जर्मनी-इटली-कडे झुकल्यास इंग्लंडला तें मोठेंच संकट होईल व मग फ्रान्सलाहि आपलें मनुष्यबळ स्पेन–फ्रान्सची सरहद्द पिरिनीज पर्वत यावर खर्चीं घालावें लागेल हेंहि निश्चित. इंग्लंडलाहि दक्षिणेस स्पेन व पूर्वोत्तर सीमेवर जर्मनी असें विघ्न उत्पन्न होण्याचा संभव, व अशी परिस्थिति आल्यास सागरवर्चस्वासाठीं स्पेनची एक नवीन अडचण इंग्लंडला होणार, व भूमध्यसमुद्रांत स्पेन–इटली व इंग्लंड–फ्रान्स असे दोन तळ होणार. हें न व्हावें व आपला मार्ग निष्कंटक रहावा यासाठीं पुढील मार्ग सुचविण्यांत येत होते ते असेः--

( १ ) पिरिनीजवरून स्पेनवर कार्यक्षम लढाऊ आक्रमक सैन्याचा पुरवठा; ( २ ) फ्रँकोच्या बंदराची गळेचेपी; ( ३ ) पोर्तुगालवर ब्रिटिशांचें दडपण, व ( ४ ) सागर व अंतरिक्ष मार्गांतून आक्रमण करून बॅलरिक व कॅनरी बेटें ताब्यांत घेऊन त्यावर आपली फौज उतरविणें. असें केलें तरच ब्रिटिश आरमारास यश येईल, व अटलँटिक महासागर व भूमध्य समुद्रावरील सागरयुद्धांत ब्रिटिशांस हमखास आपलें सागरवर्चस्व आपल्या आक्रमक व संरक्षक शक्तींवर ठेवतां येईल.

पॅसिफिक महासागरांत मात्र तशी स्थिति नाहीं. या अतिपूर्व सागरभागांत जपानशीं आक्रमक युद्ध पुकारणें इंग्लंडला शक्य नसून या सागरांत इतर राष्ट्रां-विरुद्ध इंग्लंडला फक्त संरक्षक युद्ध करतां येईल. या भागांतील आरमारास "चायना स्काड्रन" म्हणतात, व त्यांत ६ क्रूझर्स, १ एअर क्रॅफ्ट कॅरिअर, १ फ्लॉटिला लीडर, ९ डिस्ट्रॉयर्स व १५ सबमरीन्स इतकीं जहाजें आहेत. यास युद्धक्षम करावयाचें झाल्यास त्यांना बॅटलशिप्सची जोडी देणें जरूर आहे, व तसें करावयाचा ब्रिटिशांचा विचारहि आहे. पण तें सर्व १९४० पूर्वी होऊं शकत नाहीं. या बाजूस अमेरिकेची मदत घेणें जरूर आहे, व ती तशी मिळाल्यास इंग्लंडला जपानला पराभव देतां येईल. १९३९ ते १९४१ हीं वर्षें या दृष्टीनें इंग्लंडला थोडीं अडचणीचीं भासतील असा कयास आहे.



# भाग २

# ब्रिटिशांचें हिन्दुस्थानी लष्कर



मागील प्रकरणांत युरोपीय राष्ट्रें व जपान यांचे लष्करी बळाची थोडीशी माहिती दिली. यापुढें हिंदुस्थानचे लष्करी सामर्थ्याची माहिती देणें अवश्य आहे. परंतु ही माहिती पुरी होण्यासाठीं हिंदुस्थानची लष्करी सामर्थ्याच्या आजच्या परिस्थितीशीं जिचा संबंध आहे तिची माहिती प्रथमतः देणें अवश्य आहे. हिंदुस्थान हें स्वतंत्र राष्ट्र नसून त्याची संरक्षणक्षमता ब्रिटिशांचे लष्करी धोरणावर अवलंबून असल्यानें प्रथमतः आज हिंदुस्थानांत अस्तित्वांत असलेल्या ब्रिटिश हिंदुस्थानी सैन्याचा पूर्वेतिहास समजणें अत्यंत अवश्य असल्यानें त्याकडे प्रथम वळूं.

हिंदुस्थानांत इंग्रज, पोर्तुगीज, डच, फ्रेंच वगैरे युरोपीय माणसांचें आगमन प्रथमतः व्यापाराचे निमित्तानें झालें व त्यांत इंग्रजांनीं मद्रास, कलकत्ता, मुंबई, सुरत वगैरे बंदरांच्या ठिकाणीं आपल्या वखारी उघडल्या व त्यांचे रक्षणार्थ म्हणून कांहीं हिंदी शिपायांची नेमणूक या वखारींवर करण्यांत आली. यांस प्यूनुस् किंवा चपराशी असें म्हणत. हिंदुस्थानांत इंग्लिश व्यापाराचा प्रसार करणारी एक संस्था निघाली तिचें नांव "धि ऑनरेबल ईस्ट इंडिया कंपनी" व इनें आपले प्रतिनिधी हिंदुस्थानांत पाठवून त्यांस कार्य करण्यासाठीं मुखत्यारपत्र दिलें व हे प्रतिनिधी प्रथम मद्रास, मुंबई व कलकत्ता इथें वखारी करून राहिले, व हळूंहळूं व्यापारांचे संरक्षणार्थ म्हणून प्रथमतः कलकत्त्याचे 'फोर्ट वुईल्यम' मध्यें एक एन्साईन अधिकारी व ३० हिंदी सैनिक असें लहानसें दल उभारलें. मद्रासमध्यें कारोमांडल किनाऱ्यावरील व्यापाराचे रक्षणार्थ १२ तोफा व २८ सोल्जर्स ठेवले होते, व मुंबईस इ. स. १६६५ मध्यें इंग्लंडहून बरेंचसें सैन्य पाठविण्यांत आलें व मच्छलीपट्टणनजीक असणाऱ्या अरमगांवला, इंग्रजांनीं पहिला किल्ला इ. स. १६६५ मध्यें बांधला. सन १६६१ मध्यें मुंबईत ४०० सोल्जर्स ठेवले गेले व सन १६६८ मध्यें तर मुंबईस असणाऱ्या २८५ सैनिकांत ९३ इंग्लिश व बाकीचे हिंदी होते.

इ. स. १६४४ मध्यें मद्रासचा फोर्ट सेंट जॉर्ज हा किल्ला इंग्रजांनीं बांधला व त्यावर १०० सशस्त्र सैनिक ठेवण्यांत आले. इ. स. १६५३ मध्यें मद्रासकडे जिंकलेल्या इंग्रजी भागास इलाखा ( Presidency ) हें नांव देण्यांत आलें व सन १७४५ मध्यें या भागांत २०० इंग्रज व २०० टोपाशी (पोर्तुगीजांचे हिंदुस्थानी वंशज ) लोकांचें सैन्य होतें.

हळूंहळूं फ्रेंचांचें अनुकरण करून इंग्रजांनींहि हिंदुस्थानी लोकांचें सैन्य उभारावयाचें धोरण स्वीकारलें व त्या वेळच्या अस्वस्थतेच्या काळांतील राजकीय घडामोडींत जागरूकतेनें भाग घेऊन व प्रत्येक प्रांतांत आपला जम बसवावा, वर्चस्व वाढवावें, नवीन प्रदेश जिंकून घ्यावे, संस्थानिकांच्या भांडणांत बुडत्या विरुद्ध बुडवत्यास व बलिष्ठास मदत करावी व पाहिजे तसे तह करून अधिकीचें सैन्य वाढवावें असा सपाटा ईस्ट इंडिया कंपनीचे गव्हर्नर जनरल्सूनीं चालवून आपले लष्करी सामर्थ्याची वाढ केली.

आपलें वर्चस्व वाढविण्यासाठीं हिंदी संस्थानिकांविरुद्ध लढ्यांत हिंदी लोकांचा उपयोग करण्याचा प्रघात प्रथमतः फ्रेंच लोकांनीं पाडला व हिंदी माणूस आपल्या देशांतील इतर लोकांविरुद्ध लढण्यासाठीं विकत घेतला जातो हा सिद्धान्त बांधून त्याचा उपयोग पूर्ण अंमलांत आणण्यासाठीं फ्रेंच सेनानायकांनीं आपल्या हिंदी फौजा उभारून त्यांचे करवीं देश जिंकण्याचा सपाटा चालविला. याचें अनुकरण नंतर इंग्रजांनीं करण्यास प्रारंभ करून वेगळाल्या तीन प्रांतांत म्हणजे बंगाल, मद्रास व मुंबई या विभागांत लहान लहान फौजा ठेवून हिंदी लोकांच्या पलटणी उभारण्यास आरंभ केला; व यांतून आजच्या हिंदी फौजेचा उगम झाला. या फौजांची वाढ कुठें कशी झाली तें पाहूं.

## बंगाल आर्मी

इ. स. १६०० मध्यें स्थापन झालेल्या ईस्ट इंडिया कंपनीची मुख्य वसाहत बंगाल प्रांतांत फोर्ट वुइल्यम मध्यें ( कलकत्ता ) होती, व त्या वेळच्या बंगालच्या नबाबांनीं या व्यापाऱ्यांस त्यांच्या वखारींच्या संरक्षणार्थ शिपाई व त्यांचा एक अधिकारी असे मिळून फक्त ३१ माणसांची लहानशी फौज ठेवण्याचा हुकूम या इंग्रजांस दिला होता व या लहान ३१ माणशी बीजापासून आजची मोठी हिंदी फौज निर्माण झाली. सन १६८१ मध्यें बंगालला मदत म्हणून

मद्रासहून पहिली इंग्रजी फौजी कुमक आली, तिची संख्या २० इंग्रज सोल्जर्स व तिला कार्पोरल अधिकारी या तुकडीपुरता होता व यानंतर २ वर्षांनीं मद्रासेहून यांस मदत म्हणून एक कंपनी पाठविण्यांत आली व त्यामुळें बंगालचें ब्रिटिश फौजी सामर्थ्य २५० इंग्रज सैनिकांचें होतें. १६९५ मध्यें प्रथमतःच हिंदी फौज उभारण्यास प्रारंभ झाला व १७०१–२ मध्यें कलकत्त्याच्या गॅरिझनमध्यें १२० सोल्जर्स व नाविक गोलंदाज होते. १७५६ मध्यें सुराजउद्दौला नबाबानें कलकत्ता जिंकून घेतला व त्यास तोंड देण्यासाठीं म्हणून क्लाईव्हच्या हाताखालीं ३००० सोल्जर्सचें सैन्य मद्रासहून पाठविण्यांत आलें व त्यांस प्लासी येथें जय मिळून बंगाल्यांत इंग्रजांचे पाय कायमचे रोंवले. या ३००० फौजेंत मद्रास ट्रूप्सचा भरणा अधिक असून त्यांत इंग्लंडहून नुकतीच मद्रासेस आलेली पहिली रॉयल रेजिमेंट ३९ वी रेजिमेंट ही सामील होती. व त्यांत प्रत्यक्ष बंगालची इंग्रजी फौज म्हणून फारच थोडे लोक होते. यानंतर ईस्ट इंडिया कंपनीच्या फौजा वाढण्यास प्रारंभ झाला. १७४८ मध्यें तोफखान्याची एक कंपनी आधींच उभारली होती व प्लासीच्या युद्धापूर्वी थोडेच दिवस बंगालची पहिली हिंदी रेजिमेंट उभारली होती. १७५९ मध्यें ५ हिंदी रेजिमेंट्स वाढविल्या व १७६३ मध्यें ११,५०० सैनिकांपैकीं १५०० युरोपियन सोल्जर्स असून जवळ जवळ १०,००० हिंदी सोल्जर्स या फौजेंत तयार सैनिक होते व त्यांच्या १२ रेजिमेंटस् होत्या. याप्रमाणें वाढतां वाढतां १७९४ मध्यें बंगाल आर्मीमध्यें एकूण ३५०० इंग्रज व २४,००० हिंदी लोक होते व यांची वाटणी एकंदर ६ ब्रिगेड्समध्यें केली होती.

## मद्रास आर्मी

वर सांगितल्याप्रमाणें मद्रास इलाख्यांत कारोमांडल किनाऱ्याजवळील अरमगांव मध्यें पहिल्या सैनिकांच्या तुकडींत २८ सोल्जर्स व १२ तोफा ठेवण्यांत आल्या व १६४४ मध्यें फोर्ट सेंट जॉर्ज बांधून त्यावर १०० सैनिक रक्षणार्थ ठेवले होते. १७४८ मध्यें कारोमांडल किनाऱ्यावर वेगळाल्या जागीं ठेवलेले सर्व सैनिक एकत्रित करून त्यांची मद्रास युरोपियन रेजिमेंट या नांवानें संघटना केली. एकाच वर्षानंतर २०० युरोपिय शिपाई व ३०० हिंदी सैनिक यांच्या सहाय्यानें क्लाईव्हनें कर्नाटकचा नबाब व त्याचे फ्रेंच सहाय्यकांस जिंकून नबाबाची राजधानीस अर्काट आपले कबजांत घेतलें. १७५४ मध्यें इंग्लंडहून ३९ वी रॉयल

रेजिमेंट प्रथमतः इंग्लंडची राजकुमक म्हणून पाठविण्यांत आली व १७५८ पर्यंत आणखी कांहीं रेजिमेंट्स इंग्लंडहून आल्या व १७७२ चे सुमारास मद्रासच्या फौजेंत ३००० युरोपियन्स व १६००० हिंदी लोक असून यांची संख्या १७८४ मध्यें ३४००० वर नेण्यांत आली.

## मुंबईची इंग्रजी फौज

पोर्तुगीज लोकांनीं जिंकून घेतलेलें मुंबईचें बेट, पोर्तुगीज राजपुत्रीशीं विवाह झाल्यामुळें इंग्लंडचा राजपुत्र दुसरा चार्लस याला आंदण म्हणून मिळालें होतें. याचे रक्षणार्थ म्हणून १६६२ त एक युरोपीय रेजिमेंट उभारली गेली. १६६८ मध्यें हें बेट पुढें ईस्ट इंडिया कंपनीकडे सोंपविलें गेलें व तेथील युरोपिय रेजिमेंट ही कंपनीच्या स्वामित्वाखालीं दिली. १७०८ मध्यें मुंबई व त्या प्रांतातील घेतलेलीं इंग्रजी ठाणीं मिळून त्यांस मुंबई इलाखा ( Presidency ) हें नांव दिलें गेलें. या इलाख्यांतच प्रथमतः मोठालीं हिंदी सैन्यें उभारण्यांत आलीं. सन १७४७ मध्यें मुंबईची देशी फौज प्रथमतः मद्रासला हिंदी लोकांविरुद्ध युद्धार्थ पाठविण्यांत आली व यांतील हिंदी सैनिक प्लासिच्या लढाईंत कामीं येऊन इंग्लिशांस यश मिळालें. १७७२ मध्यें मुंबईच्या ब्रिटिश फौजेंत २५०० युरोपियन्स असून ३५०० हिंदी होते. परंतु मराठा सत्तेशीं झुंज देण्यासाठीं म्हणून १७९४ पर्यंत याच फौजेंत २४००० हिंदी लोकांच्या पलटणी उभारण्यांत आल्या होत्या.

इ. स. १७९६ मध्यें या वरील तिन्ही मोठ्या फौजांची पुर्नघटना करण्यांत येऊन तिन्ही इलाखा विभागांत मुख्य सेनानायकांच्या जागा ब्रिटिश रॉयल आर्मी ऑफिसर्स व कंपनीऑफिसर्स यांत वांटण्यांत आल्या. यानंतर इंग्लिश वर्चस्व हिंदुस्थानांत अधिकाधिक वाढत गेलें तसतशी फौजेची वाढहि अधिकाधिक झाली व टिपू सुलतानाशीं इंग्रजांचें युद्ध झालें त्यावेळीं इंग्रजी सैन्यांत १२२ हिंदी रेजिमेंटस् सबंध हिंदुस्थानांत होत्या व यांपैकीं श्रीरंगपट्टणवर स्वारीसाठीं म्हणून जनरल हॅरिसच्या हाताखालच्या फौजेंत ५००० युरोपिय व १४,००० हिंदी सैनिक असून ४० वेढ्याच्या तोफा व ६४ रणक्षेत्राच्या आघाडीवरील तोफा ही युद्ध-सामुग्री व यास मदत म्हणून निझामी फौजेचे ६००० लोक शिवाय होतेच. सन १८०८ मध्यें हिंदुस्तानांतील सबंध इंग्लिशांच्या फौजेंत २४,५०० युरोपियन्स व १५४,५०० हिंदी लोक होते. एकोणविसाव्या शतकाच्या आरंभीं आरंभीं

इंग्लिशांचा हिंदी इतिहास म्हणजे युद्ध व अनेक प्रदेश इंग्लिश अमलाखालीं घालणें याच गोष्टींनीं पूर्ण भरलेला आहे. याच कार्यासाठीं घोडदळें उभारण्यांत आलीं व त्यांचा प्रारंभ बंगाल व मुंबई प्रांतांत विशेषतः करण्यांत आला. याशिवाय कांहीं प्रांतांत स्थानिक फौजा उभारण्यांत आल्या व यांपैकीं औंध, पंजाब व नागपूर या विभागांतील हिंदी सैन्यें मुख्य होत. पंजाब १८४९ मध्यें ब्रिटिश हिंदुस्थानांत सामील करून घेतल्यावेळीं पंजाब इरेग्युलर फोर्स उभारण्यांत आला त्यांत ३ फील्ड बॅटरीज्, ५ घोडदळ रेजिमेंटस् व ५ पायदळ सैन्यशाखा होत्या. याशिवाय ज्या ज्या संस्थानिकांनीं आपलें स्थानिक राज्य व हितरक्षणार्थ ब्रिटिशांच्या वाढत्या सत्तेशीं दोस्ती बांधली त्यांच्या लहान लहान स्थानिक संस्थानी फौजा ठेविल्या त्यांस कॉर्टिंजेन्टस् म्हणत.

## ब्रिटिश फौजांतील हिंदी लोक

अलिकडे कांहीं विशिष्ट हिंदी लोकांसच "लढवय्ये" ( Martial ) या वर्गांत टाकून इतर अनेक हिंदी लोकांस "बिन लढाऊ" या सदरांत ढकलण्यांत येतें. परंतु वर सांगितलेल्या सर्व हिंदी शिपायांत नाना प्रकारच्या हिंदी लोकांस भरती केलें जात असे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तिन्ही इलाखा फौजांतून अधिकारी व सैनिक यांची भरती जवळ जवळ एकाच पद्धतीची होत असे.

बंगाल आर्मीमध्यें अयोध्या प्रांत व गंगेच्या कांठचा प्रदेश यांतील लोकांचा व विशेषतः उच्च हिंदवर्णीयांचा पुरवठा होत असे. या सैन्यांत २/३ लोक हिंदु व १/३ मुसलमान होते. घोडदळांत बहुधा मुसलमानांचा भरणा अधिक असून हे लोक रोहिलखंड व गंगेच्या दुथडींतल्या भागांतील रहिवाशी असत. याशिवाय नेपाळांतील गुरखे लोकांच्या चार रेजिमेंटस् व पंजाबच्या इरेग्युलर फोर्सचे लोक यांत होते. मद्रासच्या सैन्यांत त्याच प्रांतांतील लोकांचा भरणा असे व त्यांत ब्राह्मण, मराठे, तेलंगी, गेंटु व तामीळ लोक व मुसलमान लोक असत. मुंबई इलाख्यांतील फौजेंत महाराष्ट्रीय ( मराठे ), मुसलमान हे लोक असून घोडदळांत उत्तर हिंदुस्थानी परदेशी लोक असत. सन १८५६ मध्यें या सर्व फौजांची ठेवण पुढीलप्रमाणें होतीः—

| | बंगाल | मद्रास | मुंबई | एकूण |
|---|---|---|---|---|
| ब्रिटिश घोडदळ रेजिमेंट्स् | २ | १ | १ | ४ |
| ,, पायदळ बॅटेलियन्स् | १५ | ३ | ४ | २२ |
| कंपनीच्या युरोपियन बॅटेलियन्स | ३ | ३ | ३ | ९ |
| युरोपियन व हिंदी तोफखाना बॅटेलियन्स | १२ | ७ | ५ | २४ |
| हिंदी पायदळ बॅटेलियन्स | ७४ | ५२ | २९ | १५५ |
| हिंदी घोडदळ बॅटेलियन्स | २८ | ८ | ३ | ३९ |

खड्या व इतर इरेग्युलर फौजेंत असणाऱ्या एकंदर सैनिकांत सर्व शाखांत मिळून एकूण ३८,००० युरोपियन्स व त्यांच्या २७६ तोफा व ३,८०,००० हिंदी सैनिक व २४८ तोफा व यांत इरेग्युलर फोर्समध्यें जवळ जवळ १,००००० हिंदी लोक असून बाकीचें खडें सैन्य होतें.

ब्रिटिश सैन्याची ठेवण वरील प्रकारची असतां १८५७ मध्यें ब्रिटिशांच्या सत्तेशीं झगडा करण्याचा एक प्रसंग हिंदुस्थानांत झाला तो अपेशी ठरल्यामुळें व त्यांत बंगाल प्रांतांतील ब्रिटिश फौजेंतील कांहीं हिंदी कंपनी सामील झाल्यामुळें त्यास " शिपायांचें बंड " असें नांव ठेवलें गेलें. या बंडानंतर १८५९ ते ६१ या वर्षीं हिंदी ब्रिटिश सैन्याची पुर्नघटना करण्यासाठीं पील कमिशन नेमलें गेलें व या कमिशननें ब्रिटिशांची सत्ता हिंदुस्थानांत चिरस्थायी होण्यासाठीं कांहीं विशिष्ट धोरण आखून दिलें व त्याप्रमाणें पुढें हिंदी सैन्याची घटना करण्यांत आली. या धोरणांतील मुख्य मुद्दे:—

(१) बंडपूर्व कालापेक्षां अधिक इंग्रजी सैन्य हिंदुस्थानांत ठेवावें.

(२) प्रत्येक इलाख्यांतील फौजांत हिंदी व ब्रिटिश सैनिक यांचें प्रमाण ठरविण्यांत आलें तें बंगालमध्यें २:१ व मद्रास आणि मुंबई या सैन्यांत ३:१ असें पायदळ व घोडदळाचे बाबतींत ठरविलें.

(३) तोफखान्यांत हिंदी लोकांस यापुढें मज्जाव करून बहुतेक तोफखाना इंग्लिश शिपायांची मिरास ठरविण्यांत आली.

(४) लष्करी अथवा शस्त्रसुसज्ज पोलीस फौजांतील लोकांस पूर्ण लष्करी शिक्षण न देतां तें कांहींसें कमदर्जाचें द्यावें.

(५) हिंदुस्थानांत लष्कर किती ठेवावयाचें व त्यांतील प्रमाणबद्धता वगैरे ठरविण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारकडे सोंपविण्यांत आला.

(६) ब्रिटिश सैन्यांच्या हिंदी विभागांत वेगळाल्या विशिष्ट जातीच्या व धर्मांच्या लोकांस भरती करून प्रत्येक रेजिमेंटमध्यें वेगळाल्या कंपनी वेगळाल्या भौगोलिक व जातवारी व धर्म या पद्धतीच्या एकत्रित ठेवण्यांत याव्या.

या वरील तत्त्वांवर ब्रिटिश–हिंदी फौजेची पुनर्घटना करण्यांत आली व कंपनीकडून सर्व अधिकार काढून ते ब्रिटिश पार्लमेंटच्या सल्ल्यानें इंग्रज राजाकडे सोंपविण्यांत येऊन क्वीन व्हिक्टोरियाला हिंदुस्थानची बादशाहीण हा किताब ठरविण्यांत आला, व यापुढें सबंध हिंदुस्थान इंग्लंडच्या पूर्ण अंमलाखालीं आला.

ईस्ट इंडिया कंपनीनें ठेवलेल्या ब्रिटिश सैनिकांस इंग्लंडच्या सैन्याशीं जोडून त्यांचा एकजीव केला व हिंदुस्थानावर गव्हर्नर जनरल पार्लमेंटच्या संमतीनें इंग्लंडच्या राजाकडून नेमण्यांत येऊं लागला व त्यास व्हाईसरॉय म्हणजे राजाचा हिंदुस्थानांतील प्रतिनिधी असें संबोधूं लागले. सोईकरतां म्हणून 'हिंदुस्थान सरकार' असें येथील राजसत्तेला नांव दिलें पण लष्करी धोरणावर मात्र ब्रिटिश सरकारचेंच वर्चस्व असून त्यांच्या मर्जी किंवा आज्ञेनुरूप येथील लष्कराची घटना, पुर्नघटना, खर्च वगैरे गोष्टी होत असत. दिवसेंदिवस ब्रिटिश परदेशी राजकारण ठरेल त्याप्रमाणें हिंदी फौजेंत फेरफार करण्यांत येत व हिंदी फौजेकडे तीन कार्यें देण्यांत आलीं, तीं (१) अंतःसंरक्षण, (२) बाह्यसंरक्षण व (३) साम्राज्यसंरक्षण. यामुळें ब्रिटिश लष्करी अधिकारी वाढले व लष्करी खर्चही वाढला. त्याचें ओझें गरीब हिंदी प्रजेला वाहावें लागे. हा खर्च किती वाढला व खडे लष्कर किती होतें व त्यांत हिंदी–ब्रिटिश प्रमाण काय असे हेंही पाहिलें पाहिजे.

| वर्ष | सरकारी खर्डे सैन्य | | | सरासरी खर्च कोटी प्रमाण |
| --- | --- | --- | --- | --- |
| | ब्रिटिश | हिंदी | एकूण | |
| १८३७–३८ ते १८५६–५७ (वीस वर्षें) | ४३,८२६ | २२२,९१५ | २२६,७७१ | १०.८५ |
| १८६१–६२ ते १८७३–७४ (तेरा वर्षें) | ६२,४५८ | १२३,८८१ | १८६,३४० | १५.६८ |
| १८७४–७५ ते १८८०–८१ (सात वर्षें) | ६१,८८४ | १२२,५५६ | १८४,४४१ | १६.१७ |
| १८८१–८२ ते १८८४–८५ (चार वर्षें) | ५७,९७५ | ११९,९३९ | १७७,७१४ | १६.५५ |
| १८८५–८६ ते १८९४–९५ (दहा वर्षें) | ७ ,७०४ | १४०,६८२ | २११,३८७ | १८.२५ |
| १८९४–९५ | ७४,०४० | १४५,७३८ | २१९,७७८ | २०.१ |

१८३७ ते ५७ पर्यंत कंपनीच्या हिंदी सैन्यांत ब्रिटिशांचें प्रमाण १ ब्रिटिश सोल्जरास ५ हिंदी सोल्जर्स हें असे. तें १८५९ मधील पील कमिशननें घटवलें व वर सांगितल्याप्रमाणें १:२ व १:३ असें ठरविलें. त्याबद्दल पील कमिटीची शिफारस आहे ती: " As regards the 3rd question, the proportion which European should bear to Native corps in Cavalry, Infantry and Artilary respectively your Majesty's Commissioners are of opinion that the amount of Native forces should not, under present circumstances, bear a greater proportion to the European in Cavalry and Infantry than 2 to 1 for Bengal and 3 to 1 for Madras and Bombay respectively ". पील कमिशनच्या प्रत्यक्ष शिफारसीबाहेर प्रमाणबाह्य ब्रिटिश सोल्जर्स ठेवण्यांत येत हें पुढील आंकड्यांवरून दिसेल. कै. वा. नामदार गोखले यांनीं वेल्बी कमिशनपुढें दिलेल्या साक्षींतील हे आंकडे सांगतात कीं प्रत्यक्ष ठरलेल्या अंदाजाबाहेर कितीतरी अधिक इंग्रज शिपाई भरती करीत असत.

| प्रांत | प्रमाण | हिंदी शिपाई | ब्रिटिश शिपाई | प्रमाणबाह्य अधिकीची संख्या |
|---|---|---|---|---|
| बंगाल | ( १/२ ) | ८४,६१४ | ४६,३८९ | ४,०७२ |
| मद्रास | ( १/३ ) | ३२,३०६ | १४,१९५ | ७,२०६ |
| मुंबई | ( १/३ ) | २८,८७८ | १३,४६६ | ११,२७८ |

याप्रमाणें ११,२७८ ब्रिटिश सैनिक पील कमिशनच्या शिफारसीहून अधिक प्रमाणांत भरती करण्यांत आले व त्याचा भुर्दंड हिंदुस्थानास अधिक लष्करी खर्चाच्या दृष्टीनें भरावा लागत असे. प्रत्येक यूरोपीय शिपायाचा सरासरी वार्षिक खर्च १,४१३ रु. होत असे, त्या मानानें या वाढलेल्या ११,००० वरील अधिकीच्या सोल्जर्सचा वार्षिक खर्च १,५७,३०,००० रु. होई तो कराखालीं चुरडल्या जाणाऱ्या हिंदुस्थानला इ. स. १८९४–९५ मध्येंच फार डोईजड होत असे.

शिपायांप्रमाणेंच अधिकारी वर्गांतही इंग्लिश अधिकारी वाढवून हिंदी आधिकारी कमी करण्यांत येऊं लागले व हळूं हळूं त्यांचें पूर्ण उच्चाटन करण्यांत आलें. बंडपूर्व कालांत हिंदी सैन्यांत रेग्युलर व इरेग्युलर लष्कर असे व त्यांत रेग्युलर रेजिमेंटमध्यें २५ अधिकाऱ्यांची सोय असली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत १२ ऑफिसर प्रत्यक्ष कामावर असून बाकीच्यांची वर्णी मुलकी खात्यांत लावली जाई व इरेग्युलर फोर्समध्यें रेजिमेंट मागें इंग्लिश अधिकारी फक्त ३ असून बाकीचे सर्व हिंदी असत. १८६१ मध्यें झालेल्या लष्करी पुनर्घटनेंत सैन्याचे हिंदी विभागांत इरेग्युलर फोर्स पद्धति अमलांत आणली गेली. व तीन ब्रिटिश ऑफिसर्सच्या जागीं साताची संख्या ठरविली. यानंतर १८७४–७५ मध्यें ब्रिटिश अधिकऱ्यांची संख्या प्रोबेशन ऑफिसर म्हणून त्यास नांव देण्यांत येऊन ७ चे ८ करण्यांत आले व १८८४–८५ मध्यें रेजिमेंटल कमांडवरून हिंदी अधिकाऱ्यांची अजियाद हकालपट्टी झाली, इतकेंच नव्हे तर ट्रूप्स् व कंपनीवरील हुकमतीवरूनही हिंदी ऑफिसरांची संख्या दिवसेंदिवस कमी करण्यांत येऊन तितके ब्रिटिश अधिकारी वाढविण्यांत आले व याचा अर्थ तितका हिंदुस्थानचा लष्करी खर्चही अधिकीचा वाढला.

('*Gokhale's speeches*, 2nd edition, 1916, page 1182)

# ब्रिटिशांचें हिंदी आरमार

हिंदुस्थानांत व्यापारवाढीबरोबर जसजशा वखारी वाढूं लागल्या तसतशीं संरक्षणार्थं म्हणून शस्त्रसुसज्ज लहानमोठीं जहाजें व तारवें ईस्ट इंडिया कंपनीस अवश्य वाटूं लागलीं, व त्यांतूनच आजच्या लहानशा हिंदी आरमाराचा उगम झाला. हिंदी किनाऱ्यावरील सुरत, मुंबई वगैरे ठिकाणीं शस्त्रित बोटी ठेवण्यांत आल्या त्यांपैकीं पहिल्या दोन ड्रॅगॉन व आस्लॅन्डर या दोन बोटी इ. स. १६१२ मध्यें प्रथमतः इंग्लंडमधून पाठविल्या गेल्या. या लहानशा आरमारास वेगळाल्या काळांत वेगळालीं नांवें देण्यांत आलीं व त्यांची लढाऊ संख्याही वेगळाली होती.

| | | | |
|---|---|---|---|
| ( १ ) ऑनरेबल ईस्ट इंडिया कंपनीज् मरीन | | ... | १६१२–१६८६ |
| ( २ ) बाँबे मरीन | ... | ... | १६८६–१८३० |
| ( ३ ) इंडियन नेव्ही मरीन | ... | ... | १८३०–१८६३ |
| ( ४ ) बॉम्बे मरीन | ... | ... | १८६३–१८७७ |
| ( ५ ) हर मॅजेस्टीज् इंडियन मरीन... | | ... | १८७७–१८९२ |
| ( ६ ) रॉयल इंडियन मरीन | ... | ... | १८९२ |
| ( ७ ) रॉयल इंडियन नेव्ही | ... | ... | १९३४ |

ब्रिटिशांच्या आरमाराचा मुंबईच्या बंदराशीं विशेष संबंध प्रथमपासून असे व १६६८ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें मुंबई बेट आपले ताब्यांत घेतलें तेव्हां मरीन कॅप्टन यंगला प्रथमतः मुंबईचा डेप्युटी गव्हर्नर नेमलें. या वेळेपासून नों १८७७ पर्यंत मरीन खातें मुंबई सरकारच्या आधिपत्याखालीं ठेवलें होतें, व या सालीं जरी सर्व ठिकाणच्या मरीन खात्यांचें एकीकरण करून तें व्हॉईसरॉयच्या हाताखालीं इंपिरियल मरीनशीं जोडण्यांत आलें तरी आरमाराच्या मुख्याधिकाऱ्याची ( Flag Officer Commanding ) रहाण्याची सरकारी जागा मुंबईच ठेवण्यांत आली आहे. या खात्यानें केलेल्या कामगिरीचें वर्णन स्वतंत्र दिलें पाहिजे. प्रस्तुत स्थळीं या दलाची वाढ कशी झाली इतकाच भाग देणें आहे. हिंदुस्थान सरकारच्या मरीन खात्यानें महायुद्धांत कार्य केलें तें युद्धारंभीं मुंबई, कलकत्ता, एडन, कराची व रंगून या स्थानांची लष्करी तपासणी केल्यावर आपल्या मोठाल्या जहाजांपैकीं बहुतेकांस सशस्त्र करून त्यांस ब्रिटिश रॉयल नेव्हीच्या ताब्यांत मदतगार जहाजें ( auxiliary crusiers ) म्हणून

दिली. यांवरील इंग्लिश व हिंदी माणसांनींही युद्धांत भाग घेतला. (१९१५). सुएझच्या कालव्याच्या रक्षणांत "हार्डिंज" क्रूझरनें मदत केली, लॉरेन्स क्रूझरनें तैग्रिस नदीवरील कुर्ना हें ठिकाण घेण्यास मदत केली. ( म. ज्ञा. को. पुरवणी खंड २३ पान २८९ ). याशिवाय समुद्रावरील वहातुकींत फार मोठ्या प्रमाणांत भाग घेतला. लढाऊ सैन्य, सामानसुमान, जनावरें इजिप्त, मेसोपोटेमिया, फ्रान्स व पूर्व आफ्रिका या युद्धक्षेत्रांत पोंचविण्याचे कामीं २६० जहाजें गुंतलीं व हें कार्य रॉयल इंडियन मरीननें केलें. शिवाय युद्धांत पडलेल्या शत्रूंच्या जहाजांची व्यवस्था करून त्यांकरवीं युद्धास मदतीचें कार्य करविण्याचें काम याच इंडियन मरीननें केलें. या जिंकलेल्या शत्रुजहाजांकरवीं वहातुक, जखमी लोकांचे शुश्रूषार्थ हॉस्पिटल शिप्स, युद्धकैदी व जखमी यांस वेगळाल्या जागीं पोंचविण्याचें कार्य याच रॉयल इंडियन मरीननें केलें. खाजगी व्यापारी वहातुकीचीं जहाजें महायुद्धकाळीं सरकारी सैन्य वहातुकीसाठीं घेतल्यानंतर व्यापारी मालाची नेआण करण्याचें कार्यही याच जिंकलेल्या जहाजांकरवींच करवून घेतलें जात असे.

या आरमारांत असलेलीं जहाजें "डफरीन" ( ८२६० टन ), "हार्डिंज" ( ६३५० टन ), "नॉर्थब्रुक" ( ६१०० ), "लॉरेन्स" ( ११५२ ), "डलहौसी" ( २१९५ ), "मिंटो" ( ११५२ ), "कॅनिंग" ( १३१६ ), "स्लेडन" (३६०) वगैरे जहाजें १९२७ पर्यंत होतीं व या खात्यांतील अधिकाऱ्यांनीं महायुद्धांत रॉयल नेव्हीचे ग्रँड फ्लीटमध्यें नार्थ सी, मेडिटरेनियन सी, रेड सी व कॅस्पियन सी फ्लीटमध्यें कामें केलीं. तुर्कस्थानशीं युद्ध सुरू झाल्यावर टेंपररी ऑफिसर्स, वारंट ऑफिसर्स व इतर माणसें अशीं २४,०६० व २,००० याप्रमाणें अधिकीची भरती केली होती. ( *Times of India's year Book*, 1937–38, page 296 ).

यानंतर साम्राज्याचे मदतीसाठीं म्हणून ॲडमिलर जेलिकोकडून हिंदी आरमाराच्या पुनर्घटनची मांडणी ब्रिटिश सरकारनें करवून घेतली. पण पैशाच्या अभावीं हें सर्व मागें पडलें. व नंतर ईशर कमिटीनें सुचविलेल्या गोष्टींत हिंदी आरमाराची लष्करी मांडणी ठेवावी ( Combatant Service ) अशी शिफारस केली, त्याप्रमाणें रिअर ॲडमिरल मॉबी यांस डायरेक्टर नेमून त्यांस पुनर्घटनेचा आराखडा मांडण्यास सांगितलें, व त्यानें तशी आखणीही केली; परंतु सरकारनें ती मान्य न केल्यामुळें त्यानें आपल्या कामाचा राजीनामा दिला.

इंचकेप कमिटीच्या शिफारसी अंमलांत आणण्यासाठीं खर्च कमी करणें भाग पडल्यामुळें आरमारी पुनर्घटनेस लागणारा पैसा मिळेना. व मांटेग्यु-चेम्सफोर्ड सुधारणांस यावेळीं १९२२ नंतर प्रारंभ होऊन द्विदल राज्यपद्धति अंमलांत आल्यानें प्रत्येक प्रांतिक सरकारचे तिजोरीतून त्यांचे अंमलाखालीं असणारीं बंदरें, लाईट हौस ड्यूटीज, ट्रॅन्सपोर्ट (वाहतुक) व अधिकाऱ्यांचा प्रवास वगैरे खर्च होत असल्यानें, अशा प्रांतिक सरकारांस या खर्चाबाबत कमी अधिक ठरविण्याचा अधिकार आपणांकडे असावा असें सहाजिकच वाटे; व कमी खर्च करतां आल्यास आपणच तें कार्य स्थानिक लोकांकरवीं करवावें असें त्यांस साहाजिक वाटे. या शिवाय इंचकेप कमिटीच्या शिफारसीनुरूप सैन्याच्या वहातुकीसाठीं ठेवलेलीं तीन ट्रुपशिपस् कमी करण्यांत आलीं व सैन्याची वाहतूक कंत्राट पद्धतीनें करावयाचें ठरलें व यामुळें रॉयल इंडियन मरीन खात्याला मुंबई डॉक यार्ड व सर्व्हे डिपार्टमेंट एवढींच कामें राहिलीं असतीं. या सर्व अडचणी लक्षांत घेऊन हिंदुस्थान सरकारनें १९२५ मध्यें एक डिपार्टमेंटल् कमिटी नेमून त्यावर जनरल रॉलिन्सन यांस अध्यक्ष नेमून या रॉयल इंडियन मरीनची पुनर्घटना लष्करी लढाऊ पद्धतीची करण्यास सांगितलें; व या कमिटीनें केलेल्या शिफारसीनें यापुढें हिंदी आरमाराची लढाऊ पद्धतीवर पुनर्घटना करून त्यास रॉयल इंडियन नेव्ही हें नांव देण्याचें ठरविलें, व त्यांत प्रारंभीं चार आर्मड् स्लूप्स, २ पेट्रोल व्हेसल्स्, ४ माइन स्वीपिंग ट्रॉलर्स, २ सर्व्हेइंग शिप्स व १ डेपो शिप इतक्या बोटी ठेवावयाचें ठरवून रॉयल नेव्हींतील रियर ॲडमिरलच्या हुद्याचा अधिकारी यांवर ठेवावयाचा असें ठरविलें व यावर पार्लमेंट मधून एक कायदाही पास करवून घेतला.

नंतर याची हिंदुस्थानांत अंमलबजावणी करतां यावी म्हणून इंडियन नेव्हल डिसिप्लिन ॲक्ट तयार करवून तो असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें पास करण्यासाठीं फेब्रुवारी १९२८ मध्यें ठेवला गेला, परंतु तो नापास झाला. हाच कायदा पुन्हां १९३४ मध्यें असेंब्ली पुढें ठेवला गेला व यांत कांहीं नवीन सुधारणाही ग्रथित केल्या गेल्या (amendments) परंतु त्यावर 'मत अजमाविण्यासाठीं लोकांपुढें ठेवण्यांत यावा' या सबबीवर तो पुढें ढकलला गेला व नंतर ऑगस्ट १९३४ मध्यें तो पुन्हां असेंब्लीपुढें मांडला गेला, व असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें पास करवून २ आक्टोबर १९३४ मध्यें हिंदुस्थानांत मुंबईला रॉयल

इंडियन नेव्हीची स्थापना करण्यांत आली व यामुळें, पूर्वीची हयात असणारी रॉयल इंडियन मरीन ही स्थगित केली गेली.

या प्रकारें रॉयल इंडियन मरीन मधून आज हयात असलेल्या लढाऊ रॉयल इंडियन नेव्हीची स्थापना झाली असून ब्रिटिश साम्राज्याच्या आरमाराचा हाही एक भाग आहे व यावर रॉयल नेव्हीचा एक फ्लॅग ऑफिसर अधिकारी असून, यांत लढाऊ खलाशी तयार करणें, माईन स्वीपिंग, गोलंदाजी, वाहतूक वगैरे कामें शिकविण्यांत येतात. ब्रिटिशांचे ईस्ट इंडिज स्कॉड्रन नामक विभागाशीं या रॉयल इंडियन नेव्हीचा निकट संबंध आहे.

## रॉयल इंडियन नेव्हीचे प्रमुख अधिकारी

१. फ्लॅग ऑफिसर कमांडिंग रॉयल इंडियन नेव्ही व P. S. T. O. ईस्ट इंडीज
२. नेव्हल सेक्रेटरी
३. फ्लॅग लेफ्टेनंट
४. चीफ ऑफ स्टाफ्
५. कॅप्टन सुपरिंटेन्डेन्ट
६. स्टाफ ऑफिसर ( ऑपरेशन )
७. कमांडर ऑफ दि डॉक यार्ड
८. स्काड्रन सिग्नल ऑफिसर
९. स्काड्रन गनरी ऑफिसर
१०. एंजिनिअर कॅप्टन
११. एंजिनिअर मॅनेजर
१२. फर्स्ट असिस्टंट टु इं. मॅनेजर
१३. सेकंड असिस्टंट टु इं. मॅनेजर
१४. नेव्हल स्टोअर ऑफिसर.
१५. फाइनॅन्शियल ॲडव्हाइसर
१६. चीफ सुपरिंटेन्डन्ट

## मरीन ट्रॅन्सपोर्ट स्टाफ

१. डिव्हिजनल सी ट्रॅन्सपोर्ट ऑफिसर, मुंबई
२. असिस्टंट सी ट्रॅन्सपोर्ट ऑफिसर
३. सी ट्रॅन्सपोर्ट ऑफिसर, कराची

## सिव्हिलियन गॅझेटेड ऑफिसर

१. कन्स्ट्रक्टर. २. असिस्टंट कन्स्ट्रक्टर. ३. इलेक्ट्रिकल एंजिनियर. ४. असिस्टंट नेव्हल स्टोअर ऑफिसर.

## अधिकारी

| | | | |
|---|---|---|---|
| कॅप्टन्स ... | ... ९ | एंजिनियर कॅप्टन ... | १ |
| कमांडर ... | ...१७ | एंजिनियर कमांडस ... | १३ |
| लेफ्टनंट कमांडर्स, लेफ्ट-नंट्स् व सब् लेफ्टनंट्स् | ...४७ | एंजिनिअर लेफ्टनंट कमांडर्स एंजिनिअर लेफ्टनंटस् ॲन्ड एजिनिअर सब् लेफ्टनंट्स् | ३५ |

## वॉरंट ऑफिसर्स

| | |
|---|---|
| गनर्स ॲन्ड बोट स्वेन्स ... ... ... | १७ |
| वॉरंट टेलिग्राफस् ... ... ... | ८ |
| वॉरंट मेकॅनिक्स् ... ... ... | २ |
| स्कूल मास्टर्स ( वॉरंट रँक ) ... ... | २ |
| वॉरंट राइटर्स ... ... ... | १० |

यांशिवाय अगदीं हलक्या दर्जाचे अधिकारी व इतर माणसें मुंबई व पंजाब याच प्रांतांतील भरती करण्यांत येतात.

## सध्याचीं जहाजें

| | | | टनेज | हॉर्स पावर |
|---|---|---|---|---|
| एस्कॉर्ट व्हेसल | एच्. एम्. आय्. एस्. | क्राईव्ह | १७३७ (टन) | १७०० |
| ,, ,, | ,, ,, | कॉर्नवालिस | १४०५ | २५०० |
| ,, ,, | ,, ,, | हिंदुस्थान | ११९० | २००० |
| ,, ,, | ,, ,, | लॉरेन्स | ११३४·२० | १९०० |
| ,, ,, | ,, ,, | इंडस | ११९० | २००० |
| सर्व्हेइंग व्हेसल | ,, ,, | इन्व्हेस्टिगेटर | १६२६·२५ | ११३७.६ |
| ,, ,, | ,, ,, | डलहौसी | ... | ... |
| पेट्रोल व्हेसल | ,, ,, | पठाण | ६६५ | ३५०० |
| | | | | S. H. P. |

यांशिवाय माइन स्विपींग, स्टीम ट्रॉलर्स, सर्व्हिस लॉंचेस्, टार्गेट टोइंग टगस वगैरे मिळून मुंबई, कराची व कलकत्ता इथें वांटलेलीं अशीं ११ जहाजें आहेत.

## डॉक यार्ड

जलमार्गानें जाण्यायेण्यासाठीं लागणारे सामानसुमानाचे सोईसाठीं बंदराजवळ बांधलेल्या जागेस गोदी ( डॉक यार्ड ) म्हणतात. पूर्वी रॉयल इंडियन मरीनच्या मुंबई व कलकत्ता या ठिकाणीं दोन गोदी बांधल्या होत्या, पैकीं कलकत्त्याची बंद करण्यांत येऊन मुंबईची पूर्वींप्रमाणेंच चालू आहे. याशिवाय मुंबईला ५ ग्रेव्हिंग डॉक्स् व एक वेट बेसिन आहेत. यांवर मेडिकल ऑफिसर, मेडिकल डिस्पेन्सरी इन् चार्ज ऑफिसर, ऑफिसर इन् चार्ज पोलिस फोर्स, बोट स्वेन ऑफ दि डॉक यॉर्ड हे अधिकारी आहेत. मुंबई, कलकत्ता, मद्रास, कराची, एडन, चितागांग, पोर्ट ब्लेअर यांवर प्रिन्सिपल ऑफिसर मर्केंटाइल मरीन, नॉटिकल सर्व्हेअर, प्रिन्सिपल एंजिनिअर अँन्ड शिप्स् सर्व्हेअर व २,३,४ एंजिनिअर व शिप्स सर्व्हेअर्स व हार्बर मास्टर याप्रमाणें बंदराच्या कमी अधिक योग्यतेनुरूप कमी अधिक अधिकारी नेमलेले असतात.

## ईस्ट इंडीज स्क्वॉड्रन

ब्रिटिशांच्या रॉयल नेव्हीपैकीं एक स्कॉड्रन १९०३ पासून हिंदुस्थानच्या आसपासच्या समुद्रांची पहाणी व रक्षणार्थ म्हणून "ईस्ट इंडीज स्कॉड्रन" या नांवानें ठेवण्यांत आला असून त्यांतील गलबतांची संख्या कालानुरूप कमी-अधिक करण्यांत येई. यांत १९०३ मध्यें एक सेकंड क्लास व तीन लहान क्रूझर्स, चार स्लूपस् होतीं तर १९०६ मध्यें २ सेकंड क्लास व दोन थर्ड क्लास क्रूझर्स होतीं. १९१० मध्यें एक सेकंड क्लास क्रूझर काढून त्या जागीं दोन लहान क्रूझर्स ठेवलीं. १९१३ मध्यें याची वाढ अधिकीची होऊन सेकंड क्लास क्रूझरच्या ऐवजीं बॅटलशिप स्विफ्ट सुअर ठेवण्यांत आलें. सध्यांच्या ईस्ट इंडिज स्काड्रनमध्यें पुढील जहाजें ठेवण्यांत आला आहेत.

## फोर्थ क्रूझर स्क्वॉड्रन ( ईस्ट इंडीज स्कॉड्रन )

यामध्यें नॉर्फोक ( फ्लॅग ) क्रूझर ( ९८५० टन ), एमरल्ड क्रूझर ( ७५५० टन ), एंटर प्राईझ क्रूझर ( ७५८० टन ), याचे जागीं तात्पुरतें ठेवलेलें कोलंबो क्रूझर ( ४२०० टन ), व " शोअर हॅम " " बाइड फोर्ड " " फोवे " व " लूपिन " हीं स्लूपस् या बोटी आहेत. १८६९ पासून रॉयल नेव्हीनें दिलेल्या

मदतीसाठीं हिंदुस्थानला खर्च द्यावा लागे. १८९६–९७ पासून हिंदुस्थानाला १,००,००० पौंड इंग्लंडला द्यावे लागतात व एकंदर आरमारी खर्च जवळ जवळ ५,००,००० पौंड आहे. ( *Times of India's year Book*, 1937–38 page 225 ). याप्रमाणें आजपर्यंत युद्धांत लागणारी फौज व आरमार यांच्या वाढीची थोडीशी माहिती दिली; यानंतर आजची संरक्षणविषयक माहिती असणें अवश्य असल्यानें तिकडे वळूं.

## ब्रिटिश सरकारच्या हिंदी फौजेची वाढ

१८५७ च्या बंडानंतर महाराणी व्हिक्टोरियानें १ नोव्हेंबर १८५८ मध्यें हिंदुस्थानचा राज्यकारभार आपल्या ताब्यांत घेतल्यावर हिंदी लष्कराच्या पद्धतींत बदल केला व तत्पूर्वी असलेलें रॉयल ट्रुप्स् व कंपनी ट्रुप्स् हा भेद नाहींसा करून सर्व युरोपियन्सचा एक विभाग करून ब्रिटिश आर्मी इन इंडिया असें नांव त्यास देण्यांत आलें. मुंबई, मद्रास, बंगाल या तीन ठिकाणच्या सैन्यांतील इंग्लिश तोफखाना काढून तो रॉयल आर्टिलरींत सामील करण्यांत आला. व हिंदी फौजेंत कांहीं घोडदळ व पायदळ कमी करून हिंदी तोफखाना बहुतेक सर्वच्या सर्व कमी करण्यांत आला. ऑफिसर्सच्या व वेगळाल्या रेजिमेंटच्या पगाराच्या तक्रारी काढून टाकण्यासाठीं १८६१ मध्यें पील कमिशन नेमण्यांत येऊन त्या करवीं पुष्कळ सुधारणा व फरक घडवून आणले.

जर्मनीनें १८६० मध्यें ऑस्ट्रो–जर्मन युद्धांत व १८७१ मध्यें फ्रँको–जर्मन युद्धांत अपूर्व यश मिळविल्यानें, ब्रिटिश सैन्याची पुनर्घटना करण्याचें त्यावेळचे सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर वॉरच्या हुद्यावर असणारे लॉर्ड कॉर्डवेल यांचें १८७२ मध्यें कमिशन नेमलें गेलें. व त्यांनीं सुचविलेल्या लष्करी भरतीचे पद्धतीस कॉर्डवेल सिस्टिम असें नांव आहे. यांत ब्रिटिश सैनिकांस दीर्घ काल नोकरींत न ठेवतां सात वर्षेंच नोकरींत ठेवून, नंतर त्यांस राखीव म्हणून मासिक वेतन देऊन रजा द्यावयाची, व अशा प्रकारें, देशांत लष्करी शिक्षणांत मुरलेल्या लोकांकरवीं थोडा काल नोकरी घेऊन, त्यांस रजा दिल्यानें या राखीव लोकांचें सैन्य युद्धप्रसंगीं ताबडतोब उभारतां येऊन सैनिकांचा मोठा पुरवठा एकदम जमवितां येतो. ही पद्धति अंमलांत आल्यानें, व हिंदुस्थानांतील व इतर वसाहतींतील ब्रिटिश लष्कर, ब्रिटिश सैन्याचा भाग समजला गेल्यानें या कार्डवेल

पद्धतीचे शिपाई हिंदी लष्कराचे ब्रिटिश विभागांत येऊं लागले. यामुळें इंग्लंडचा फायदा झाला पण हिंदुस्थानास मात्र अधिक खर्च पडूं लागला. या अधिकीच्या खर्चाची सुरवात झाल्यानें त्यासाठीं १८७३ मध्यें ईगर्टन कमिटी बसविली. तिजपुढें या संबंधीं साक्षींत खर्च कमी अधिक करणें हें स्टेट सेक्रेटरीच्या हातीं असून, त्यावर हिंदुस्थान सरकारचा मुळींच ताबा नाहीं असें सर डेव्हिड वॉटरफिल्ड हे स्पष्ट सांगतात. ते म्हणतात—

" हिंदी सैन्याच्या ब्रिटिश संख्येंत अगर अधिकारी वर्गात कमी अधिक करावयाचें झाल्यास भारत मंत्र्यास विचारलें पाहिजे व भारत मंत्र्यालाही ब्रिटिश मंत्रीमंडळांतील युद्धमंत्र्याला विचारल्याशिवाय कांहीं करतां येणार नाहीं. हिंदी फौजेंतील हिंदी विभागांतील सैनिकांची संख्या कमी करावयास भारत मंत्र्याच्या अनुमतीची आवश्यकता आहे. "

( *India's Military Defence*, p. 15 )

या नंतर १८७९ मध्यें ईडन कमिटी या नांवाचें एक मंडळ लष्करी धोरणासंबंधीं पुनर्घटनेसाठीं नेमलें गेलें, त्याच्याही कांहीं शिफारसी आहेत. इंग्लंडमध्यें सुरू केलेल्या कॉर्डवेल पद्धतीप्रमाणें हिंदी फौजेंतील हिंदी विभागांतही ऱ्हस्वकाल चाकरी ( short–service ) ची पद्धति सुरू करूं नये व तें कां याबद्दल ईडन कमिटीची सूचना सुस्पष्ट आहे.

" हिंदुस्थानांत राखीव सैनिक पद्धति ( आर्मी रिझर्व्हस् ) सुरू केल्यास हिंदी फौजेची संरक्षक व आक्रमक शक्ति वाढेल यांत संदेह नाहीं. परंतु हिंदी सैनिकांचा विभाग म्हणजे भाडोत्री दल असून तें परकीय सरकारची नोकरी करतें हेंही लक्षांत ठेवणें अवश्य आहे. हिंदुस्थानांत ' अल्पकाल नोकरी ' पद्धति सैन्यांत इंग्लंडप्रमाणें सुरू करणें शहाणपणाचें होणार नाहीं. ( Inadvisable ). या पद्धतीनें पुष्कळशीं माणसें थोडक्या कालांत लष्करांतून घालतां येतात व नंतर अल्पावधींत त्यांस समाजांत परत सोडतां येऊन मधून मधून त्यांस लष्करी शिक्षण देतां येऊन लष्करी तयारींत ठेवतां येतें व हें इथें उपयोगी नाहीं. "

( *India's Military Defence*, page 16 )

हिंदुस्थानचा लष्करी खर्च हळूं हळूं कसा वाढत गेला हें कै. नामदार गोखले यांनीं वेल्बी कमिशनच्या साक्षींत स्पष्ट केलें आहे.

१८८६–८७ मध्यें हिंदी सैनिकांस सक्तीच्या नोकरीची मुदत पूर्वी ४० वर्षें होती ती कमी करून खुषीप्रमाणें ती २० ते ४० वर्षें करण्यांत आली. व या अवधींत लौकर पेन्शनींत जाणाऱ्या शिपायांस दरसाल एक महिना पूर्ण पगार व शिक्षण देण्याचें ठरून यांचें राखीव सैन्य ठेवण्याचें ठरलें. ही राखीव सैन्य-पद्धति प्रथम पायदळ, नंतर घोडदळ व तोफखाना आणि सॅपर्स ॲन्ड मायनर्स या विभागांत सुरू करण्यांत आली.

या वेळपर्यंत हिंदुस्थानांतील सैन्य तीन इलाख्यांत ठेवण्यांत येई तें (१) मुंबई (२) मद्रास व (३) बंगाल असें होतें. १८९५ मध्यें ही इलाखा फौजपद्धति बंद करून तिचे चार विभाग करून प्रत्येक विभाग एक एक मुख्य अधिकाऱ्याकडे सोंपविण्यांत आला, यास "चार सुभे" (फोर कमान्ड) पद्धति म्हणतात. हे सुभे म्हणजे (१) पंजाब (यांत वायव्य व पंजाब सरहद्द येते). (२) बंगाल (३) मद्रास यांत ब्रह्मदेश येतो व (४) मुंबई (यांत सिंध, क्वेटा व एडन हे सामील) हे होत. प्रत्येक कमांडचे २–३ अव्वल जिल्हे व २–६ दुय्यम जिल्हे पाडण्यांत येत. याशिवाय स्थानिक फौजाही असत त्या (१) हैद्राबाद कॉंटिंजेंट (२) सेंट्रल इंडिया हॉर्स रेजिमेंट (३) माळवा भिल्ल कोअर (४) भोपाळ बॅटेलियन (५) देवळाली इरेग्युलर फोर्स (६) एरिनपुरा इरेग्युलर फोर्स (७) मेरवाड भिल्ल कोअर (८) मेरवाड बॅटेलियन. (म. ज्ञा. को. २३ पा. २७५).

१९०२ मध्यें लॉर्ड किचनेर हिंदुस्थानचा कमान्डर इन चीफ नेमला गेल्यावर त्यानें हें सर्व तोडून त्या ठिकाणीं नवीन पद्धति अमलांत आणली. १९०४ मध्यें पूर्वीप्रमाणें चार कमांड काढून त्यांची वाटणीही वेगळ्या पद्धतीनें आंखली, त्यांतील मुख्यतत्त्वें अशीं:—

(१) वायव्य सरहद्दीपलीकडून परराष्ट्रीय आक्रमण हिंदुस्थानावर न होऊं देणें हें हिंदी फौजेचें मुख्य कर्तव्य होय.

(२) युद्धाचे वेळीं वेगळाल्या युनिटसूनां ज्या क्रमानें रणक्षेत्रावर पाठवावयाचें असेल त्याप्रमाणें त्या युनिटसूची शांतता काळांत शिक्षण व व्यवस्था ठेवणें.

(३) अंतर्गत शांततेसाठीं लागणारी व्यवस्था अशा प्रकारची असावी कीं

त्यामुळें युद्धप्रसंगीं सर्व लढाऊ सैन्य रणांगणावर पाठवितां येण्यास अडचण न व्हावी.

( ४ ) प्रत्येक युनिटमधील निरनिराळ्या सैन्य विभागांतील सैनिकांस युद्ध-प्रसंगीं आपलें कर्तव्य नीट बजावतां यावें म्हणून योग्य शिक्षण व अनुभव मिळण्याची व्यवस्था असावी.

व हें करण्यासाठीं एकंदर सैन्याचे तीन आधिपत्य सुभे ( Commands ) करून त्यांस नार्दर्न, ईस्टर्न व वेस्टर्न अशीं नांवें देऊन दक्षिणेची सदर्न कमांड काढून टाकली. १९०७ मध्यें वरील पद्धति अवलंबिल्यावर मिळालेल्या अनुभवानें पुनश्च वरील पद्धतींत बदल करून सबंध हिंदी फौजेचे दोन विभाग पाडून त्यांवर एक जनरल ऑफिसर नेमून त्याचेकडे त्या फौजेचें शिक्षण, तपासणी व हुकमती अधिकार देऊन त्यांची अंमलबजावणी मात्र कमांडर इन चीफकडे देण्यांत आली. महायुद्धांत आलेल्या अनुभवानंतर हिंदी फौजेंतील अधिकारांचें मध्यवर्ती सत्तेनें केंद्रीकरण एकच जागीं केल्यानें फौजेची कुचंबणा होते असें दिसून आल्यामुळें, १९१८ त अधिकारविभागणी करणें भाग पडलें व पुन्हां " फौज ( Army ) " हें नामाभिधान काढून टाकून त्यांस ' कमांडस् ' हें नांव दिलें. व १९२० मध्यें पुन्हां तीनच्या जागीं १९०४ प्रमाणेंच चार कमांडस् ठेवण्यांत आल्या.

## हिंदी फौजेची सध्याची अंमलवारी

१. हिंदुस्थानच्या संरक्षणासंबंधी एक विशिष्ट जबाबदारी भारत मंत्र्याकडे देण्यांत आली असून त्याची परिपूर्तता करण्यासाठीं त्यास मदत म्हणून इंडिया ऑफिसमध्यें मिलिटरी सेक्रेटरी देण्यांत आला आहे. हिंदी फौजेंतील वरिष्ठ अधिकाऱ्यांपैकीं एक सीनियर माणूस या जागीं नेमण्यांत येतो, व त्यास हिंदु-स्थानचा अगदीं ताजा अनुभव असावयास पाहिजे अशी त्यांत अट आहे. या अधिकाऱ्यास मदतनीस म्हणून हिंदी फौजेंतील अव्वल दर्जाचा स्टाफ ऑफिसर देण्यांत येतो. शिवाय भारत मंत्र्याच्या सल्लागार मंडळांत हिंदी फौजेंतील अत्युच्च अधिकाराची जागा भोगून सेवानिवृत्त झालेल्या माणसास एक सभासद म्हणूनही नेमण्यांत येतें.

२. हिंदुस्थानचें मुलकी व लष्करी राज्य करण्याचें कार्य सर्वस्वीं गव्हर्नर जनरल इन् कौन्सिलकडे सोंपविलें असून त्यास भारत मंत्र्याच्या हुकमाबरहुकूम

कार्य करावें लागतें. हिंदुस्थानच्या सिव्हिल अंमलाप्रमाणेंच संरक्षक अंमलखात्याचे कार्याची जबाबदारी व्हाईसरॉयच्या कार्यकारी मंडळाकडेच ( Viceroy's Executive Council ) असते. हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीच्या धर्तीवर १९१९ चा मॉंटेग्यु-चेम्सफोर्ड कायद्यांत संरक्षण खातें हिंदी लोकप्रतिनिधीच्या कक्षेंतून वगळण्यांत आलें होतें, व १९३५ च्या कायद्यांतही हें खातें व्हाइसरॉयची विशिष्ट जबाबदारी म्हणून वेगळें ठेवण्यांत आलें आहे.

३. सर सेनानायक ( Commander-in-chief ) यानंतर अंमलवारीच्या क्रमानुसार कमांडर–इन्–चीफचा नंबर येतो व हा अधिकारी व्हाइसरॉयच्या कौन्सिलमध्यें डिफेन्स मेंबर म्हणून काम करतो. हा अधिकारी शिवाय कौन्सिल ऑफ स्टेटचाही एक सभासद असतो. संरक्षण खात्यांतील अम्मलबजावणी हिंदुस्थान सरकारचें संरक्षक धोरण व त्याची अंमलवारी, त्याचप्रमाणें लढाऊ व बिनलढाऊ अशा लष्करी खात्यांची चोख कार्यक्षमता राखणें, व हिंदुस्थानसंबंधीं युद्धविषयक कामगिरी या सर्व गोष्टींची जबाबदारी सर्वतोपरी एकट्या कमांडर–इन्–चीफ वरच असते व याशिवाय रॉयल हिंदी आरमार व रॉयल हिंदी वैमानिक दल यांची अंमलबजावणीहि यांजकडेच असते. हें सर्व काम सुरळीतपणें चालण्यासाठीं कमांडर–इन्–चीफला चार मदतगार अधिकारी (१) चीफ ऑफ जनरल स्टाफ (२) अडज्यूटन्ट जनरल (३) क्वार्टर मास्टर जनरल (४) मास्टर जनरल ऑफ आर्डनान्स असे असतात.

४. संरक्षण खातेंः–हें खातें सर सेनापतीच्या हाताखालीं असून त्याचें सर्व काम चालविण्याची जबाबदारी संरक्षण चिटणीस ( Defence Secretary ) कडे असते व हा अधिकारी व्हाइसरॉयच्या इतर चिटणीसाप्रमाणें हिंदुस्थान सरकारच्या चिटणीसांत मोडतो व त्यास वाटेल त्या वेळीं व्हाइसरॉयची भेट घेण्याची सनदशीर मुभा असते. यास एक नायब चिटणीस ( Deputy Secretary ), दोन दुय्यम सेक्रेटरीज, एक डायरेक्टर ऑफ मिलिटरी लँड्स् व कॅन्टोन्मेंट्स्, एक डायरेक्टर ऑफ रेग्युलेशन्स् आणि फार्मस् व एक असिस्टंट सेक्रेटरी इतके अधिकारी मदतीस म्हणून कामाचे सोईसाठीं दिलेले असतात.

लष्करी नोकरीखातेंः–रॉयल इंडियन नेव्ही व रॉयल एअर फोर्स इन् इंडिया यांना हिंदुस्थान सरकारनें दिलेल्या हुकुमाची अंमलबजावणीचें काम या खात्याकडे असतें. ट्रुप कमांडर्स व आर्मी हेडक्वार्टर्सच्या हुकमतीखालील अधि-

काऱ्यांशीं संरक्षण चिटणीसाचा प्रत्यक्ष संबंध मुळींच येत नाहीं. इंडियन आर्मी लिस्ट तयार करणें, मयत लष्करी अधिकाऱ्यांच्या मालमत्तेची व्यवस्था लावणें, छावण्यांची अंमलबजावणी पाहणें, व आर्मी हेडक्वार्टर्सच्या अंमलखात्याशीं निकट-संबंध ठेवणें वगैरे कामें या खात्याकडे प्रामुख्यानें सोंपविलेलीं असतात. लष्करी-खात्याचें प्रतिनिधित्व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें डिफेन्स मेंबर ( सर सेनापति ) व मध्यवर्ती असेंब्लीमध्यें डिफेन्स सेक्रेटरी हे करतात.

५. मिलिटरी कौन्सिल ( लष्करी मंडळ ):—

या मंडाळाचा अध्यक्ष सर सेनापति असून चीफ ऑफ दि जनरल स्टाफ हा उपाध्यक्ष व अडज्यूटन्ट जनरल, क्वार्टर मास्टर जनरल ऑफ ऑर्डनान्स, एअर ऑफिसर कमांडिंग रॉयल एअर फोर्स, सेक्रेटरी टू दि गव्हर्नमेंट ऑफ इंडिया इन् डिफेन्स डिपार्टमेंट व फायनंन्शियल ॲडव्हायसर मिलिटरी फायनान्स, जो हिंदुस्थान सरकारच्या फडणिशीचा प्रतिनिधि असतो, हे सर्व सभासद् असतात. या मंडळाचे चिटणीसाचें काम संरक्षण खात्याच्या एका अंडर सेक्रेटरीकडे सोंपविलें असतें. या खात्याचें काम सल्लागाराचें असून सर सेनापति अत्यंत महत्त्वाचे कार्यांत यांस बोलावील तेव्हांच या मंडळाची बैठक भरते.

## हिंदुस्थानचे लष्करी भौगोलिक विभाग

सद्यःस्थितींत कार्यक्षमतेच्या दृष्टीनें हिंदुस्थानचे चार लष्करी विभाग पाडले असून प्रत्येक विभागावर जनरल ऑफिसर कमांडिंग इन् चीफ नेमून शिवाय ब्रह्मदेशाचा एक स्वतंत्र जिल्हा नेमून, त्यावर एक कमांडर ठेवला आहे. चार मुख्य विभागांत १३ डिस्ट्रिक्टस्, ४ स्वतंत्र ब्रिगेड एरिया व ३० ब्रिगेडस् व ब्रिगेड एरिया ठेवण्यांत आल्या आहेत. यांची संघटना पुढें दिल्याप्रमाणें:—

( १ ) उत्तर अंमल ( Northern Command ):—याची मुख्य कचेरी मरीस असून इच्या कक्षेंत पंजाब व वायव्य सरहद्द प्रांत येतात.

( २ ) दक्षिण अंमल ( Southern Command ):— याची मुख्य कचेरी पुण्यास असून याचे कक्षेंत मुंबई व मद्रास इलाखा तसेंच मध्यप्रांताचे कांहीं भाग व राजपुताना हे भाग येतात.

( ३ ) पूर्व अंमल ( Eastern Command ):—याची कचेरी नैनिताल इथें असून याचे कक्षेंत संयुक्त प्रांत, बंगाल, बहार व ओरिसा व आसाम हे भाग येतात.

( ४ ) पश्चिम अंमल ( Western Command ):—याची मुख्य कचेरी कराची येथें असून याचे कक्षेंत सिंध व बलुचिस्थान हे येतात.

( ५ ) याशिवाय खास सर सेनापतीच्या हाताखालीं सोईसाठीं म्हणून वरील चारही अंमलदारांच्या हातीं भौगोलिक रचनेमुळें देतां न येणारा असा स्वतंत्र ठेवलेला विभाग म्हणजे ब्रह्मदेशचें लष्कर होय. बरींच वर्षे हिंदुस्थान सरकारच्या अंमलाखालीं असणारा शिवाय भाग एडन इंडिपेंडन्ट ब्रिगेड हा १९२७ च्या १ एप्रीलपासून ब्रिटिश सरकारच्या प्रत्यक्ष हुकमतीखालीं सोंपविण्यांत आला होता.

## हिंदुस्थान सरकारची आजची फौज.

हिंदुस्थानच्या संरक्षणासाठीं, ब्रिटिश साम्राज्याचे सुरक्षिततेसाठीं व हिंदुस्थान सरकारचें राज्य नीट चालावें म्हणून हिंदुस्थानांत खर्डे सैन्य ठेवण्यांत येतें त्यास " आर्मी इन् इंडिया " किंवा हिंदुस्थानांतील लष्कर असें म्हणतात. या सैन्याचे ब्रिटिश व हिंदी असे दोन लष्करी विभाग असून या प्रत्येक विभागाचें तुल्यबळ किती असावें व याजकडे काय काय कामगिरी द्यावी, यांचे पगार काय असावे, अधिकारी कोण असावे, कोणते लोकांस सैनिक म्हणून भरती करावे वगैरे नियम बांधले असून ते कडक रीतीनें पाळले जातात.

## हिंदुस्थानांतील ब्रिटिश फौज.

इंग्लंडच्या ब्रिटिश फौजेपैकीं कांहीं भाग परदेशांतील नोकरीसाठीं म्हणून वेगळा काढण्यांत येतो, व त्यापैकीं बराच मोठा भाग हिंदुस्थानांत ठेवण्यांत येतो. हिंदुस्थानांत ठेवण्यांत येणारें ब्रिटिश सैन्य कायमचें म्हणून विशिष्ट सैन्य न ठेवतां त्या सैन्यांतील मर्यादित भाग कांहीं कालच फक्त हिंदुस्थानांत पाठविण्यांत येतो. व ती मुदत संपतांच ठरीव संख्याभरतीचें ब्रिटिश फौजेचा नवीन भाग जुन्या भागाची जागा भरून काढण्यास पाठविला जातो व जुना विभाग परत इंग्लंडला किंवा इतर देशांत पाठविला जातो. ब्रिटिश पायदळाच्या रेजिमेंटसपैकीं एक बटेलियन इंग्लंडमध्यें व एक बटेलियन परदेशीं नोकरीसाठीं राखून ठेवतात. घोडदळाचें रेजिमेंट एकाच युनिटचें बनत असल्यानें इंग्रजी घोडदळाची विभागणी पायदळाप्रमाणें करतां येत नाहीं. शांतता काळांतील खर्डे सैन्य युद्धकालांतील सैन्याहून केव्हांही कमी संख्येंत असावयास पाहिजे; व या

दृष्टीनें इंग्लंडचें शांतताकाळचें सैन्य युद्धकालापेक्षां कमी संख्येचें असतें, कारण युद्धकालासाठीं म्हणून सैन्यांत प्रत्यक्ष नसणारांचें एक राखीव सैन्य (Reserves) म्हणून असतेंच. हिंदुस्थानांत अशा प्रकारचें ब्रिटिश राखीव सैन्य नसल्यानें मात्र हिंदी फौजेंतला ब्रिटिश विभाग युद्धकालापेक्षां शांततेच्या कालींहि अधिकीचा ठेवण्यांत येतो. कारण युद्धप्रसंगीं त्यांस रिझर्व्हस् लागल्यास इंग्लंडहून परत मागवावी लागेल, हें कारण पुढें करण्यांत येतें. हिंदी सैन्यांत ब्रिटिश घोडदळांच्या ५ रेजिमेंट्स् असतात व प्रत्येकीं २७ अधिकारी व ५६७ इतर हें प्रमाण असतें. त्याचप्रमाणें ब्रिटिश पायदळांच्या ४५ बॅटेलियन्स असून त्यांत प्रत्येकीं २८ अधिकारी व ८६५ इतर हें प्रमाण असतें. १९२१ पर्यंत हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश पायदळविभागांत सटरफटर काम करण्यासाठीं म्हणून कांहीं हिंदी लोक ठेवण्यांत येत, तरी लढाऊ असे सर्व लोक इंग्रजच असत. परंतु १९२१ पासून त्यांत शांतता कालांतला १ अधिकारी व ४२ इतर अशी एक तुकडी लढाऊ हिंदी लोकांची अशी कांहीं बॅटेलियन्सना जोडण्यांत येते व ही हिंदी तुकडी ज्या ब्रिटिश बॅटेलियनला जोडली असेल तिची परदेशीं अगर इंग्लंडला रवानगी झाल्यास वरील हिंदी लढाऊ तुकडी नवीन ब्रिटिश बॅटेलियनला जोडण्यांत येते. ब्रिटिश तोफखान्यांत रॉयल हॉर्स आर्टिलरीमध्यें व फील्ड व मीडियम बॅटरीमध्यें, हिंदी लोकांस हांके (Driver) व कामकरी (artificer) म्हणून ठेवण्यांत येतें. आणि माऊन्टन बॅटरीजमध्यें हांके, मिस्त्री व गोलंदाज म्हणून व हेव्ही बॅटरीजमध्यें गोलंदाज म्हणून कांहीं हिंदी लोक ठेवण्यांत येतात. हिंदुस्थानी तोफखान्यांतील लोकांस गोलंदाजींचें शिक्षण देण्यासाठीं मथुरा व अंबाला या दोन ठिकाणीं शिक्षणाची सोय केली आहे. १९३६ च्या एप्रिल १ पासून, १ ट्रेनिंग बॅटरी हिंदी लोकांसाठीं मथुरेच्या रॉयल आर्टिलरी ट्रेनिंग सेंटरमध्यें उघडण्यांत आली आहे. व शिवाय बंगलोरला रॉयल आर्टिलरी बॉइज डेपोहि ठेवण्यांत आला आहे.

## इंजिनियर सर्व्हिस

या विभागाच्या मुख्य-इंजिनियर इन् चीफ चा इतर लष्करी अधिकाऱ्यांचा संबंध नसून तो सर सेनापतीलाच फक्त जबाबदार असतो. हा अधिकारी स्टाफऑफिसर म्हणून केव्हांच नसून तो सरसेनापतीला मिलिटरी एंजिनिअरिंग संबंधांत सल्लागार म्हणून जबाबदार असतो. त्याचें कामः—

( १ ) शांतता व युद्धकालांतील इंजिनिअरिंग कामें व खातेवारी करणें.

( २ ) इंजिनिअर खात्यांतील लोकांस युद्धपूर्व कार्यक्षम ठेवणें.

( ३ ) शांतता व युद्धकाली एंजिनिअरींगला लागणाऱ्या जिनसांचा पुरवठा करणें.

## संघटना.

या खात्याचे दोन विभाग असतात ते ( १ ) सॅपर्स अँड मायनर्स, व ( २ ) मिलिटरी इंजिनिअर्स खातें. पैकीं पहिल्या विभागांत प्रत्येक कॉर्प्समध्यें रॉयल इंजिनिअर ऑफिसर्स, पायोनिअर कॉर्प्सपैकीं ब्रिटिश लष्करी अधिकारी, व्हाइ-सरॉयचें कमिशन मिळालेले हिंदी अधिकारी, ब्रिटिश वारंट व नॉन-कमिशन्ड ऑफिसर्स व हिन्दी नॉन-कमिशन्ड अधिकारी व इतर हिंदी लोक असे भरती केलेले लोक असतात. यांचा एक विभाग बंगलोरांत, एक रुडकींत व खडकींत असे ठेविले आहेत. यांचें काम म्हणजे रस्ते बनविणें, पूल तयार करणें, पुरव-ठ्याचें बांधकाम करणें इ. यांतील कांहीं लोकांस घोडदळाबरोबर व कांहींकांस पायदळाबरोबर कूच करण्याचें व मजल मारण्याचें काम शिकविण्यांत येतें.

## मिलिटरी इंजिनियर सर्व्हिस.

हिंदुस्थान व ब्रह्मदेशामधील लष्करांतील सर्व मोठमोठालीं बांधकामें या विभागाकडेस असतात. जिल्ह्यांतील लहानसहान बांधकामें मात्र पी. डब्ल्यू. डी. कडे देण्यांत येतात. रॉयल एअर वर्क्स व रॉयल इंडियन नेव्हीचीं बांधकामें यांकडेच सोंपविण्यांत आलीं आहेत. वायव्य सरहद्द व बलुचिस्तानमधील बांधकामें व रस्ते वगैरे व मुलकी एंजिनिअरिंग कामेंहि याच खात्याकडे दिलीं असतात, व त्यांवरील देखरेख अनुक्रमें गव्हर्नर व एजंट टू गव्हर्नर-जनरल यांज-कडे असते. या खात्यांतील अधिकारी बहुतेक इंग्रजच असतात.

## रायल एअर फोर्स.

साम्राज्याचे संरक्षणखात्याचा एक भाग या नात्यानें रॉयल एअर फोर्स हें खातें सर सेनापति–कमँडर इन् चीफ इन्-इंडिया-याच्या ताब्यांत असतें. संरक्षण खात्याच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांतच या खात्याच्या खर्चाचा अन्तर्भाव होतो. या खात्याच्या प्रमुखाला एअरऑफिसर कमँडिंग हा हुद्दा असून त्याचा दर्जा एअर मार्शलचा म्हणजे फौजेच्या भाषेंत लेफ्टनंट जनरलच्या दर्ज्याचा असतो.

फौजी खात्याची मुख्य कचेरी हिंदुस्थान सरकारच्या राजधानींत असून तेथेंच या खात्याची मुख्य कचेरी असते. एअरऑफिसर कमँडिंगच्या कामाच्या सोयी-साठीं त्याचे मुख्य सहा विभाग पाडण्यांत आले आहेत ते असेः–( १ ) एअर-स्टाफ, ( २ ) पर्सोनेल, ( ३ ) टेक्निकल, ( ४ ) स्टोअर्स, ( ५ ) मेडिकल, व ( ६ ) चीफ एंजिनिअर. या प्रत्येक विभागाकडे फौजेंतील मुख्य विभागाकडे असलेलीं कामें वांटलेलीं असतात. या सहा विभागांच्या हाताखालीं दुय्यम दर्ज्याचीं खातीं काढलेलीं आहेत त्यांस सबॉर्डिनेट फॉर्मेशन्स म्हणतात, तीं अशींः–( १ ) ग्रूप कमँड, ( २ ) वुइंग कमँड, ( ३ ) स्टेशन कमँड, ( ४ ) एअर-क्रॅफ्ट डीपो, ( ५ ) एअर क्रॅफ्ट पार्क ( ६ ) ट्रॅन्स्पोर्ट फ्लाइट, व ( ७ ) रॉयल इंजिनिअर फोर्स हिल डेपो. यांपैकीं नं. १ वुइंगस्टेशन R. A. F. कोहटला असून नं. २ वुइंग स्टेशन R. A. F. रिसालपुरास आहे. पेशावर येथें आर्मी को–ऑपरेशन स्क्वाड्रन ठेवण्यांत आलें असून त्यांत एक वुइंग कमँड क्वेटा येथें आहे. त्यावर लेफ्टनंट कर्नलच्या हुद्याच्या बरोबरीचा अधिकारी मुख्य असून त्याचे हाताखालीं ५ अधिकारी व १३ एअरमेन असतात. याशिवाय वुइंगस्टेशन कमँड दोन असून एक पेशावर व एक रिसालपूर येथें असते. प्रत्येक वुइंगस्टेशनमध्यें दोन स्क्वाड्रन असून त्यांवर एक स्टेशन हेडक्वार्टर म्हणून अधि-कारी असतो. या स्टेशनहेडक्वार्टर स्टाफमध्यें ६ अधिकारी व ११२ एअरमेन असतात, व दोन स्क्वाड्रन्स मिळून २४ अधिकारी व १०६ एअरमेन असतात.

एकंदर एअरस्क्वाड्रन्स ८ असून त्यांतील ७ क्वेटा ते रिसालपूर या वायव्य सरहद्दीवरील भागांत ठेविले आहेत. तिसरा एक अंबाला येथें आहे. प्रत्येक स्क्वाड्रनमध्यें शांततेच्या कालांत १२ ईरोप्लेन्स असतात व त्यांच्या प्रत्येकीं ४ अशा तीन तुकड्या (flighter) असतात. ब्रिस्टल फ्लाइटर्स व ४ वापिटिस जातीचीं विमानें ठेवलीं आहेत.

सबंध एअरफोर्समधील शिरगणतींत पुढीलप्रमाणें वांटणी आहेः—

२६२ अधिकारी

१८८८ एअरमेन.

१०१० इंडियन ऑफिसर्स अँड अदर रॅंक्स अँड फॉलोअर्स.

५०९ मुलकी लोक.

## इंडियन एअरफोर्स

८ आक्टोबर १९३२ रोजीं हा विभाग उघडण्यांत आला आहे. त्यांत क्रॅनवेलमध्यें शिक्षण घेतलेले पहिले ६ कॅडेटसूना कमिशन मिळून पायलट ऑफिसर्स म्हणून ठेवण्यांत आलें. पुढें होऊं घातलेल्या हिंदी वैमानिक दलाचें बीज या सहा अधिकाऱ्यांत असून पहिलें युनिट या सहामधून निर्माण होईल. वैमानिक शिक्षण हिंदुस्थानांत देण्याची सोय नसल्यानें तूर्त इंडियन कॅडेट्सना क्रॅनवेललाच जाऊन शिकावें लागतें.

## हिंदुस्थान सरकारच्या फौजेचा हिंदी विभाग.

हिंदी घोडदळः—याच्या २१ रेजिमेंट्स असून त्यांत प्रत्येकीं १४ ब्रिटिश अधिकारी, १९ हिंदी अधिकारी, व हिंदी नॉन-कमिशन्ड ऑफिसर्स व इतर सैनिक मिळून ४९२ व १९२ इतर खोगीरभरती ( followers ) इतकीं माणसें असतात.

हिंदी पायदळः—यांत पुढीलप्रमाणें भाग पाडलेले आहेत.

| | | |
|---|---|---|
| १९ | पायदळ रेजिमेन्ट्स व त्यांत एकुण बॅटोलियन्स | ९८ |
| ३ | रेजिमेंट्स सॅपर्स अँड मायनर्स ,, ,, | ७ |
| १० | गुरखा रेजिमेन्ट्स ,, ,, | २० |
| ३२ | | १२५ |

प्रत्येक बॅटेलियन मागें असलेले ब्रिटिश व हिंदी अधिकारी व शिपाई यांचें प्रमाणः—

| | ब्रिटिश आधिकारी | हिंदी आधिकारी | इतर सर्व |
|---|---|---|---|
| पायदळ | १२ | २० | ७०३ |
| गुरखा | १३ | २२ | ८९८ |

रिझर्व्हज ( राखीव सैन्य ):—युद्धकालीं खडें सैन्य रणांगणावर गेल्यावर त्याची जागा भरून काढण्यासाठीं व युद्धारंभींच्या प्रथम आठ महिन्यांच्या कालांतील होणारी मनुष्यहानि भरून काढण्याकरितां लागणारे सैनिक तयार ठेवावे लागतात. असल्या सैनिकांस राखीव सैन्य (Reserves) म्हणतात. १९२३ मध्यें रिझर्व्ह

सैन्य ठेवण्याबाबत नियमान्वयें या सैनिकांचे ( १ ) ए व बी क्लास असे दोन प्रकार ठेविले होते. ( २ ) रिझर्व्हमध्यें नोकरी करणें सक्तीचें केलें होतें. ( ३ ) ए क्लासमधील सैनिकांना ज्यास्तींत ज्यास्त एक महिना लष्करी शिक्षण घ्यावें लागे, व बी क्लासमधील सैनिकांस दोन वर्षांत एक महिना शिक्षण घ्यावें लागे, या शिक्षणाच्या कालांत सैनिकांस नोकरींतील सैनिकांच्या बरोबरीचा पगार मिळे. ( ४ ) शिक्षणकाळ वगळून बाकीच्या कालांत ए क्लासला दरमहा ७ व बी क्लासला दरमहा ४ रु. मिळत. ( ५ ) या १५ वर्षे रिझर्व्ह म्हणून राहिलेल्या सैनिकांस सेवानिवृत्ति मिळवितां येई, व मग त्यांस दरमहा ३ रु. पेन्शन मिळे किंवा त्यांस हवें असल्यास एकदम ३०० रु. ग्रॅच्युइटीहि घेतां येई. ( मराठी ज्ञानकोश, पुरवणी पृ. २७९ ) १९३२ मध्यें या नियमांत दुरुस्ती झाली असून आतां "सी" क्लास रिझर्व्हिस्टस असें सदर काढण्यांत आलें आहे. १ आक्टो. १९३२ रोजीं हिंदी घोडदळ, सॅपर्स अँड मायनर्स, आर्टिलरी, सिग्नल या विभागांत सी क्लास रिझर्व्ह हें सदर उघडण्यांत येऊन त्याचे पूर्वीं १ मे १९३२ ला हिंदी पायदळ सी क्लास रिझर्व्ह उघडण्यांत आलें. पूर्वींचे "ए" "बी" क्लास रिझर्व्हपैकीं थोडे लोक अजून शिल्लक आहेत. परंतु हे वर्ग हळू हळू नाहींसे करण्यांत येत आहेत व कांहीं काळानें सर्वच सी क्लास रिझर्व्हज् होतील. सध्यां वेगळाल्या सैनिकविभागांत पुढीलप्रमाणें रिझर्व्हज् ठेवण्यांत आले आहेत.

( इंडियन इयरबुक, टाइम्स, वरून )

| | |
|---|---|
| १ घोडदळ | २९४० |
| २ तोफखाना | २०४४ |
| ३ इंजिनिअर्स | २३५० |
| ४ हिंदी सिग्नलकॉर्पस | ६२५ |
| ५ पायदळ | २२१२० |
| ६ गुरखा | २००० |
| ७ रेल्वे न्यूक्लिअस रिझर्व्ह | ६५२ |
| ८ साप्लिमेंटरी रिझर्व्ह | २५५ |
| | ३२९८६ |

## हिंदी संकेतदल ( Signal Corps. )

या खात्यावरील मुख्य अधिकाऱ्यास सिग्नल ऑफिसर इन् चीफ म्हणतात, व आर्मी हेडक्वार्टर्समधील जनरल स्टाफमध्यें याची नेमणूक असते. सांकेतिक प्रश्नांसंबंधीं सर्व बाबतींत हाच मुख्य सल्लागार असून सर्व सांकेतिक ठाण्यांची देखरेख व व्यवस्था यांची जबाबदारी याचेवर असते. प्रत्येक आर्मीकमँडर-बरोबर एक सांकेतिक ऑफिसर नेमतात. हिंदी फौजेंतील ब्रिटिश सांकेतिक भाग रॉयलकॉर्प्स ऑफ सिग्नल्समध्यें सामील करण्यांत आला आहे. हिंदुस्थानांत सिग्नल शिक्षणासाठीं जबलपूर येथें सोय करण्यांत आली आहे, व यावर एक लेफ्टनंट कर्नल व त्याचे मदतीस दुय्यम अधिकारी असे असून त्यांत कांहीं ब्रिटिश व कांहीं हिंदी असे लोक असतात. यांचे वेगवेगळाले प्रकार व दलसंख्या पुढीलप्रमाणें आहेः—

| | |
|---|---|
| ( १ ) कॉर्प्स सिग्नल्स हेडक्वार्टर्स ( यांत लाईन व वायरलेस कंपनी समाविष्ट असतात.) ... ... | २ |
| ( २ ) कॅव्हलरी ब्रिगेड सिग्नल ट्रुप्स ... ... ... | ४ |
| ( ३ ) डिव्हिजनल सिग्नल्स ... ... ... | ४ |
| ( ४ ) डिस्ट्रिक्ट सिग्नल्स ... ... ... ... | ३ |
| ( ५ ) वायरलेस सेक्शन प्रयोगविभाग ... ... ... | १ |
| ( ६ ) सिग्नल सेक्शन ... ... ... ... | |

याशिवाय रेजिमेंटल सिग्नलिंग इन्स्ट्रक्टर्सना शिक्षण देण्यासाठीं आर्मीसिग्नल स्कूलहि ठेवण्यांत आलें आहे. पेशावर, वजिरिस्तान व कोहट येथें डिस्ट्रिक्ट सिग्नल्स ठेवण्यांत आले आहेत.

रॉयल टँक कॉर्प्सः—१९२१ मध्यें रणगाड्याच्या ६ कंपन्या हिंदुस्थानांत ठेवण्यांत आल्या. यानंतर १९२५ मध्यें दोन वाढविण्यांत आल्या व याच वर्षी ( १९४० ) दोन ग्रुप हेडक्वार्टर्सहि उघडण्यांत आले. यांची रचना पुढील-प्रमाणें आहेः—

( १ ) नॉर्दर्न ग्रुप रावळपिंडी व ( २ ) सदर्न ग्रुप पुणें येथें. पैकीं दक्षिण ग्रुप कमँड हल्लीं काढून टाकण्यांत आली असून त्याचें काम कमँडर रॉयल टँक कॉर्प्सकडे देण्यांत आलें आहे. अहमदनगरला रॉयल टँक कॉर्प्सचें शिक्षण देण्या-साठीं शाळा उघडली आहे. या दलविभागांत पुढीलप्रमाणें रचना आहेः—

| | ब्रिटिश अधिकारी | ब्रिटिश इतर इसम | अनुयायी followers | मोटर कार्स | मोटर सायकल्स | आर्मर्ड कार्स | लॉरीज् |
|---|---|---|---|---|---|---|---|
| टँक कॉर्प्स स्कूल | ५ | ४१ | १५ | १ | २ | ९ | ९ |
| आर्मर्ड कार कंपनी | १२ | १४५ | ३२ | २ | ६ | १६ | १० |

मेडिकल सर्व्हिसेसः—लष्करी वैद्यकीय खात्यांत पुढील वर्ग आहेतः—

( १ ) रॉयल आर्मी मेडिकल कॉर्प्समधील हिंदुस्थानांत नोकरीस असलेले अधिकारी व इतर इसम;

( २ ) इंडियन मेडिकल सर्व्हिसमधील लष्करांत नेमलेले अधिकारी;

( ३ ) इंडियन मेडिकल डिपार्टमेंट यांतील ( १ ) असिस्टंट सर्जन्स व ( २ ) सब्-असिस्टंट सर्जन्स;

( ४ ) क्वीन ॲलेक्झांड्रा इंपीरियल मिलिटरी नर्सिंग सर्व्हिस,

( ५ ) क्वीन ॲलेक्झांड्रा इंपीरियल मिलिटरी नार्सिंग सर्व्हिस फॉर इंडिया;

( ६ ) दी आर्मी डेंटल कॉर्प्स;

( ७ ) दी इंडियन मिलिटरी नार्सिंग सार्व्हिस;

( ८ ) दी इंडियन हॉस्पिटल कॉर्प्स.

यांपैकीं नं. १, ३ मधील असिस्टंट सर्जन, ४, ५ व ६ या सदरांस हिंदी फौजेंतील ब्रिटिश विभागाकडे तैनातीसाठीं ठेवण्यांत येतें, व नं. २, ३ मधील सब-असिस्टंट सर्जन व नं. ७ यांस हिंदी फौजी विभागाकडे दिमतीस देण्यांत येतें. नं. ८ सदर फौजेच्या दोन्ही विभागांकडे उपयोगांत येतो.

रॉयल इंडियन आर्मी सर्व्हिस कॉर्प्सः–ब्रिटिश लष्करांत १९२३ पर्यंत चालत आलेला सप्लाय अँड ट्रॅन्स्पोर्ट कॉर्प्स ज्यास पूर्वकालीं ' कॉमिसारिएट डिपार्टमेंट ' या नांवानें संबोधित त्याच खात्यास अलीकडे रॉयल आर्मी सार्व्हिस कॉर्प्स असें म्हणूं लागले आहेत. याच खात्याचा हिंदी नमुना म्हणजे रॉयल इंडियन आर्मी

सर्व्हिस कॉर्प्स हा आहे. हें खातें क्वार्टरमास्टर जनरल या अधिकाऱ्याच्या हातांत असून याचीं मुख्य कामें आहेत तीं ( १ ) लष्करास पुरवठा ( २ ) घोडे, उंट, खेचर, गाय, बैल वगैरे पशूंची वाहतूक आणि ( ३ ) यांत्रिक वाहतूक. या तीन सदरांच्या कामासाठीं अधिकारी व इसम पुढीलप्रमाणें आहेत.

( १ ) पुरवठा ( Supply )

| | |
|---|---|
| किंग्ज कमिशनचे अधिकारी | १३२ |
| हिंदी अधिकारी | ८३ |
| इतर युरोपीयन इसम | २५० |
| मुलकी लोक | ७३४ |
| अनुयायी | १८८१ |
| एकूण | ३०८० |

( २ ) पशुवाहतूक ( Animal Transport )

| | |
|---|---|
| किंग्ज कमिशन असलेले अधिकारी | ५२ |
| हिंदी अधिकारी | १२५ |
| युरोपीयन इतर इसम | ३७ |
| मुलकी | ९७ |
| इतर हिंदी इसम | ९८०९ |
| अनुयायी | १४७५ |
| | ११५९५ |

याशिवाय १५७६ राखीव असे गाडी हाकणारे लोक आहेत. या खात्यांत एकूण १३२५८ खेचर व ३९४६ उंट बाळगले आहेत व शिवाय ४०१ घोडे व १२ बैल आहेत.

( ३ ) यांत्रिक वाहतूक ( mechanical transport. )

| | |
|---|---|
| किंग्ज कमिशन असलेले अधिकारी | ७३ |
| हिंदी अधिकारी | ५४ |
| इतर युरोपियन इसम | १५५ |
| इतर हिंदी इसम | ३०८७ |
| मुलकी इसम | १८० |
| अनुयायी | ९९० |
| एकूण | ४५३९ |

याशिवाय ३२७० राखीव कम पगारी नोकर असतात व या खात्यांत एकूण २०८६ वाहतुकी गाड्या व १०९ मोटार सायकल्स आहेत. हें कार्य इंडियन आर्मी सर्व्हिस कॉर्प्सकडे १९२७ मध्यें सोंपविण्यांत आलें व यांतील अधिकारी बहुतेक ब्रिटिश रॉयल आर्मी सर्व्हिस कॉर्प्सला जोडलेले असतात, याचें कारण हिंदुस्थानांत हें शिक्षण देण्याच्या सोयी नाहींत असें सांगण्यांत येतें. तथापि कांहीं थोडे किंग्ज कमिशन असणारे हिंदी अधिकारी यांत घेतले आहेत. या खात्यांतील ब्रिटिश इतर हे मात्र ब्रिटिश रॉयल आर्मी सर्व्हिस कॉर्प्स मधूनच घेतलेले असतात.

याशिवाय आर्मी रीमौंट डिपार्टमेंट, व्हेटेरिनरी सर्व्हिसेस इन इंडिया, मिलिटरी, फार्म डिपार्टमेंट (यांत गवत व दूधदुभतें येतें), शिक्षणखातें वगैरे खातीं फौजेचीं म्हणून आहेत. सर्व फौजेंतील नोकरीचे नियम पुढील प्रमाणें आहेतः—

(१) घोडदळांतः—खड्या फौजेंत पहिलीं सात वर्षें, व पुढचीं ८ वर्षें राखीव, एकूण वर्षें १५.

(२) तोफखानाः—(अ) पहिलीं सात वर्षें खडी फौज, पुढील ८ वर्षें राखीव भागांत (ड्रायव्हर्स व गनर्ससाठीं).

(ब) मेकॅनिकल ट्रॅन्स्पोर्टमधील ड्रायव्हर्सना पहिलीं सहा वर्षें फौजेंत, व पुढचीं नऊ वर्षें राखीव भागांत व हेव्ही आर्टिलरी नोकरींत फक्त पहिलीं चार वर्षें फौजेंत.

(३) सॅपर्स अँड मायनर्सः—फौजेंत ७ वर्षें, राखीव ८ वर्षें.

(४) इंडियन सिग्नल कॉर्प्सः— ,, ,,

(५) हिंदी पायदळः—(गुरखा व सरहद्द प्रांताबाहेरील शिपाई वगळून) फौजेंत ७ व राखीव ८ वर्षें.

(६) गुरखा व सरहद्द प्रांताबाहेरील लोक पायदळः—फौजेंत ४ वर्षें नोकरी.

(७) ब्रिटिश पायदळ (हिंदी फौजेंतील लढाऊ):—६ वर्षें फौजेंत नोकरी.

याचप्रमाणें इतर नोकरींतहि कमी अधिक मुदत ठेविलेली आहे.

फ्रॉन्टियर मिलिशिया अँड लेव्ही कॉर्प्सः—

वायव्य सरहद्द प्रांतांत शांततारक्षणार्थ म्हणून मुलकी फौज उभारण्यांत आली असून तिचा खर्च लष्करी खात्यांतून न होतां मुलकी खात्यांतून होतो. यावरील

अधिकारी मात्र लष्करी लोकच आहेत. यांत अन्तर्भूत झालेल्या दलांचीं नांवें ( १ ) कुरम मिलिशिया ( २ ) टोची स्कौट्स ( ३ ) सौथ वझिरिस्तान स्कौट्स ( ४ ) चित्रळ स्कौट्स ( ५ ) गिल्गिट स्कौट्स, ( ६ ) झोब मिलिशिया, आणि ( ७ ) मेक्रन लेव्ही स्कौट्स.

## ऑक्झिलियरी फोर्स

महायुद्धानंतर साम्राजांतील युरोपियन ब्रिटिश प्रजाजनांना सरांस लष्करी शिक्षण देण्याचा प्रश्न हातीं घेऊन त्यावर विचारविनिमय झाल्यावर सर्वांस सक्तीचें लष्करी शिक्षण देणें योग्य होणार नाहीं असें ठरलें. तथापि अशा मदतनीस सैन्याची अवश्यकता भासत असल्यानें ऐच्छिक पद्धतीचें लष्करी शिक्षण घेऊन तयार होणाऱ्या गोऱ्या लोकांचें पुरेसें सैन्य उभारावें, व त्यांस कार्यक्षमतेपुरतें शिक्षण देऊन तयार करावें असें ठरलें. त्यानंतर १९२० सालीं यास अनुसरून एक कायदा पास करून घेऊन त्याअन्वयें ऑक्झिलियरी फोर्स काढावा असें ठरविण्यांत आलें. या कायद्याप्रमाणें या लष्करांतील विभागांत फक्त युरोपयि प्रजाजनांसच भरती होतां येतें. यांत भरती होणाऱ्या युरोपीय तरुणांस वयोमानानें दीर्घकालीन शिक्षण देतात, व वयोवृद्ध पण काम करण्यास लायक अशा इसमांस फक्त निशाणबाजीचें (musketry) शिक्षण देण्यांत येतें. यांतील इसमांस ज्या भागांत असें सैन्य उभारलें असेल त्याच भागांत लष्करी नोकरी देण्याचें ठरलें आहे, व स्थानिक विभागांतील पडणाऱ्या कामगिरीस अनुरूपच विशिष्ट प्रकारचें शिक्षण येथें देतात. हें ठरविण्याचें काम या फोर्सच्या सल्लागार मंडळाच्या मतास अनुसरून होतें. यांत घोडदळ, तोफखाना, एंजिनिअर्स, पायदळ वगैरे सर्व प्रकारचें शिक्षण दिलें जातें व यांत रेल्वे बटेलियन, मशिनगन्स कंपनी, सिग्नल कंपनी, मेडिकल कॉर्प्स, व्हेटेरिनरी कॉर्प्स वगैरे कार्यें समाविष्ट करण्यांत आलीं आहेत. यावर स्थानिक लष्करी अधिकारी नेमलेला असून त्यास प्रसंग पाहून या सर्वांस नोकरीसाठीं एकत्र बोलावण्याचा अधिकार दिलेला असतो. स्थानिक संरक्षणार्थ मदत देणें हें या दलाचें मुख्य कार्य आहे. सबंध वर्षभर मर्यादित काल शिक्षण देण्यांत येतें व जितके दिवस शिक्षण दिलें जाईल तितक्या दिवसांचा ठरीव पगार देण्यांत येतो. ठरीव शिक्षण संपल्यावर प्रत्येक ऐच्छिक सैनिकास बोनस वांटतात. यांत नोकरीचा काल अमर्यादित असला तरी या दलांत चार वर्षें नोकरी केल्यावर अथवा वयास ४५ वर्षें झालेल्या

इसमास हें दल इच्छेनुसार सोडतां येतें. या अवधीपूर्वी सोडावयाचें असल्यास दलाचे सल्लागार मंडळाची शिफारस लागते. कलकत्ता, मुंबई, कराची व रंगून येथील डिफेन्स लाइट सेक्शनचीं कामें या दलाच्या रॉयल एंजिनीअर्सच्या फील्ड कंपनीकडे असून त्यांस हिंदी सॅपर्स व मायनर्सची मदत मिळते.

## इंडियन टेरिटोरियल फोर्स.

हिंदुस्थानच्या फौजेच्या संपूर्ण हिंदीकरणाच्या प्रश्नाला मान तुकविण्यासाठीं म्हणून व ज्यांनीं वंशपरंपरा लष्करांत नोकरी केली नसून ज्यांस लष्करी शिक्षण घेण्याची व लढण्याची इच्छा आहे अशा लोकांस उत्तेजन मिळावें म्हणून, तसेंच मुख्य फौजेची सेकंड लाइन ऑफ डिफेन्स म्हणून व तिला वेळोवेळीं सैनिकांची जोड करून देणारी संस्था अशा तऱ्हेनें या दलाची योजना केली आहे. यासाठीं या दलांत भरती होणाऱ्या लोकांवर युद्धार्थ फक्त स्थानिक भागांतच न राहतां वाटेल तिकडे हिंदुस्थानांत व बाहेर जाण्याची जबाबदारी ठेवण्यांत आली आहे. महायुद्धप्रसंगीं हिंदुस्थानचे संरक्षणार्थ उभारलेल्या इंडियन डिफेन्स फोर्सची ही पुढील आवृत्ति आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांत प्रतिवर्षीं विशिष्ट काळ लष्करी शिक्षण दिलें जातें, व यायोगें यांत काम करणारे लोकांस प्राथमिक लष्करी शिक्षण देऊन त्याचीच अधिक वाढ करून प्रसंग पडल्यास युद्धप्रसंगीं खड्या फौजेंतील सैनिकांबरोबर खांद्यास खांदा लावून लढतां येतें.

याचे मुख्यतः तीन भाग पाडण्यांत आले आहेत त्यांस (१) प्रॉव्हिन्शल बॅटेलियन्स, (२) अर्बन यूनिट्स आणि (३) युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कॉर्प्स यूनिट्स असें म्हणतात. यांपैकीं यू. टी. सी. सदरांत विश्वविद्यालय कॉलेजांतील अध्यापक वर्ग व विद्यार्थी यांस भरती करण्यांत येते. प्रतिवर्षी ठरीव वेळीं १५ दिवस छावणींत व दर आठवड्यास ड्रिल करणें हें शिक्षण देतात. यावर शिक्षणाधिकारी इंग्रज अधिकारी असतो. यांजवर लष्करी नोकरीची जबाबदारी मुळींच नसून फक्त शिस्त व शील यांचें संवर्धन विद्यार्थ्यांत व्हावें एवढाच या दलाचा उपयोग आहे. वेळप्रसंग पडल्यास मात्र प्रॉव्हिनशल व अर्बन यूनिट्स या दलांत सैनिक व अधिकारी होता यावें हाहि वरील शिक्षणाचा हेतु आहे. आज प्रॉव्हिनशल बॅटेलियन्सची संख्या १८ आहे, व अर्बन यूनिट्समध्यें पुरी भरती झाली नसली तरी लोक भरती होत आहेत. यांतून तूर्त जरी फक्त पाय-

दळाचें शिक्षण उघडण्यांत आलें असलें तरी बाकीच्या विभागाचें शिक्षण देण्याची योजना कायद्यान्वयें संकल्पित करण्यांत आली आहे.

प्रॉव्हिनशल बॅटेलियन्समध्यें भरती होण्यास ६ वर्षे नोकरी करावी लागते व पहिल्या वर्षी एक महिना प्राथमिक शिक्षण देण्यांत येतें, व नंतर दरवर्षी एक महिना लष्करी शिक्षण दिलें जातें. अर्बन यूनिट्सना प्रांतांतील नोकरीपुरतीच जबाबदारी असते. १९२८ मध्यें मुंबई, मद्रास व संयुक्तप्रांत मिळून प्रथमतः चार यूनिट्स उघडल्या, परंतु आतां फक्त तीनच अर्बन यूनिट्स ठेविले आहेत. यांत ६ वर्षे नोकरीचा काल निश्चित असून पहिल्या वर्षी ३२ दिवस शिक्षण व पुढें प्रतिवर्षी १६ दिवस प्राथमिक शिक्षण घ्यावें लागतें.

## इंडियन स्टेट फोर्सेस.

हिंदुस्थानांतील संस्थानाधिपतींनीं आपल्या संस्थानांच्या दिमतीसाठीं म्हणून उभारलेल्या फौजांना वेळप्रसंगीं युद्धकालीं हिंदी व ब्रिटिश फौजांचे मदतीसाठीं पाठविलें जातें, व अशी रीत पडल्यासारखी असून आजपर्यंत लष्करी कुमक संस्थानिकांच्या फौजांनीं ब्रिटिश सरकारास वेळोवेळीं केली आहे. ही मदत करणें न करणें हें सर्वस्वी संस्थानिकांच्या खुषीवर आहे. या फौजांतील लोकांचा उपयोग नीट व्हावा म्हणून संस्थानी सैनिकांस दिलें जाणारें शिक्षण व संघटन यासंबंधांत नीट सल्ला देण्यासाठीं ब्रिटिश " मिलिटरी ॲडव्हायसर्स व ॲसिस्टंट मिलिटरी ॲडव्हायसर्स " हिंदुस्थानसरकारकडून पाठविण्यांत येतात. महायुद्धानंतर हिंदी फौजेप्रमाणें संस्थानिकांनींहि आपल्या फौजांची पुनर्घटना करून त्यांत तीन सदरें पाडलीं आहेत तीं अशीं:—

क्लास एः—यांत हिंदी फौजेंतील सर्व व्यवस्था व शस्त्रास्त्रपुरवठा दिला जातो.

क्लास बीः—यांतील सैनिकांस वरील वर्गापेक्षां कमी दर्ज्याचें शिक्षण दिलें जातें व शस्त्रेंहि कमी दर्ज्याचीं असतात.

क्लास सीः—मुलकी फौजेप्रमाणें या सदरांतील लोक असतात व यांचीं शस्त्रास्त्रें व शिक्षण क्लास बी पेक्षां हीन दर्ज्याचें असतें.

१ आक्टोबर १९३६ रोजीं या फौजेची शिरगणती अधिकृतरीत्या पुढीलप्रमाणें होतीः—

| विभाग | | अधिकृत संख्या | नक्की संख्या |
|---|---|---|---|
| १ आर्टिलरी | ( तोफखाना ) | १६१६ | १४९९ |
| २ कॅव्हलरी | ( घोडदळ ) | ९२९४ | ८५७४ |
| ३ इन्फंट्री | ( पायदळ ) | ३८१५८ | ३२५४७ |
| ४ कॅमेल कॉर्प्स | ( उंटदळ ) | ४६६ | ४३९ |
| ५ मोटर मशिनगन सेक्शन | | १८० | ९३ |
| ६ सॅपर्स | | १३०१ | १०५० |
| ७ टॅन्स्पोर्ट कॉर्प्स | | १५३५ | १४४३ |
| | एकूण | ५२५५० | ४५६४५ |

## ट्रेनिंग इन्स्टिटयूशन्स

लष्करी अधिकारी व इतर इसम तसेच यूनिट्सचे शिक्षकांस उच्च लष्करी शिक्षण देण्याची सोय हिंदुस्थानांत वेगळाल्या ठिकाणीं लष्करी विद्यालयरूपानें ठेवण्यांत आली आहे ती अशीः––( १ ) स्टाफ कॉलेज, क्वेटा.( २ ) सीनिअर ऑफिसर्स स्कूल, बेळगांव, ( ३ ) स्कूल ऑफ आर्टिलरी, ककूल, ( ४ ) इक्विटेशन स्कूल, सागर ( ५ ) स्मॉल आर्म्स स्कूल इन् इंडिया, पचमढी व अहमद्नगर, ( ६ ) आर्मी स्कूल ऑफ फीझिकल ट्रेनिंग, अंबाला, ( ७ ) आर्मी सिग्नल स्कूल, पुणें, ( ८ ) रॉयल टॅंक कॉर्प्स स्कूल, अहमद्नगर, ( ९ ) आर्मी स्कूल ऑफ एज्युकेशन, बेळगांव, (१०) आर्मी स्कूल ऑफ कुकरी, पुणें, (११) आर्मी व्हेटेरिनरी स्कूल्स, अंबाला व पुणें, ( १२ ) इंडियन आर्मी सर्व्हिस कॉर्प्स ट्रेनिंग एस्टॅब्लिशमेंट, रावळपिंडी, व ( १३ ) इंडियन आर्मी ऑर्डिनन्स कॉर्प्स स्कूल ऑफ इन्स्ट्रक्शन, खडकी.

आर्मी इन् इंडिया रिझर्व्ह ऑफ ऑफिसर्सः––युद्ध सुरू झाल्यावर लष्करी अधिकाऱ्यांचा वारंवार पडणारा तुटवडा भरून काढण्याकरितां म्हणून अधिकीचे

लष्करी अधिकारी राखून ठेविलेले असतात व यांस इंडियन आर्मी रिझर्व्ह ऑफ ऑफिसर्स म्हणत. परंतु महायुद्धांतील अनुभवानें या लहानशा संख्येनें भागत नाहीं असें दिसून आल्यानंतर युद्धोत्तरकालांत एक नवीनच योजना अंमलण्यांत येऊन १९२२ मध्यें आर्मी इन् इंडिया रिझर्व्ह ऑफ ऑफिसर्स हें सदर उघडण्यांत आलें, व वेळ पडल्यास अचानक प्रसंगीं लष्करी अधिकाऱ्यांचा तुटवडा भरून काढण्यासाठीं या सदरांत पुढील सर्व इसमांस राखीव अधिकारी म्हणून भरती होतां येतें. हे लोक म्हणजे पुढीलप्रमाणें होत:—

(१) हिज मॅजेस्टीज् ब्रिटिश इंडियन अगर डोमिनियन लष्करांतील कोणत्याहि विभागांत किंग्ज कमिशन असणारे माजी अधिकारी, ज्यांनीं आरमार व लष्कर ( यांत ऑक्झिलियरी फोर्स व इंडियन टेरिटोरियल्स येतात ) यांत, तसेंच मरीनखातें व वैमानिक दलांत पूर्वी काम केलें असून पुढें ठरीव कालावधीनंतर सेवानिवृत्त झाले असे अधिकारी, व जे हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सीलोनमध्यें राहत असतात असे;

(२) हिंदुस्थान सरकार किंवा प्रांतिक सरकारच्या हुकमतीखालीं असणारे गॅझेटेड ऑफिसर्स ( ज्यांना सरकार युद्धावर जाण्यासाठीं मोकळे सोडूं शकत असेल ) असे;

(३) हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सीलोन येथें स्थायी राहणारे कुलीन सद्गृहस्थ;

(४) ग्रेटब्रिटन व आयर्लंडमध्यें ज्या मेडिकल पदव्या मानल्या जातील अशा पदव्या धारण करणारे पदवीधर मेडिकल व डेंटल खात्यांत घेतले जातात ते;

(५) एम्. आर. सी. व्ही. एस. हा डिप्लोमा घेतलेल्या लोकांस व्हेटेरिनरी खात्यांत घेतात;

१ जानेवारी १९३७ रोजीं वरील संख्या ७७९ इतकी होती.

## १९३९–४०

## आर्मी, एअर फोर्सेस अँड रॉयल इंडियन नेव्ही.

१९३९–४० च्या बजेट एस्टिमेटमध्यें संरक्षण खात्यांतील सर्व विभागांत असलेल्या खड्या लष्कराची माहिती देणारें कोष्टक आहे तें खालीं दिलें आहे. त्यावरून त्या सालाच्या लष्करी खात्याच्या संघटनेची कल्पना येण्यासारखी आहे:—

| | ब्रिटिश अधिकारी | हिंदी अधिकारी | व्हाइसरॉय कमिशनचे अधिकारी | ब्रिटिश इतर | हिंदी इतर |
|---|---|---|---|---|---|
| १ लढाऊ यूनिट्स | ३५७४ | १६६ | २७२० | ४६८५६ | ११६८२० |
| २ स्टाफ | ६०५ | ... | ३२ | ४४६ | १३५ |
| ३ मिलिटरी ट्रेनिंग | १०७ | ... | ६ | १९३ | ९८ |
| ४ एज्युकेशन एस्टॅब्लिशमेंट | ७२ | ... | ४९ | १६५ | ७२ |
| ५ आर. आय. आर्मी सर्व्हिसेस | ३०५ | ... | २६६ | २६३ | १३०७४ |
| ६ आय. ए. ऑर्डिनान्स | २४८ | ... | ३१ | ७५९ | २७२२ |
| ७ मेडिकल सर्व्हिसेस | ८२६ | ५२ | ५७० | ७६५ | ४१४३ |
| ८ व्हेटेरिनरी | ४३ | १७ | १२२ | ४ | ५१९ |
| ९ रीमाउंट | २९ | ... | ९ | १० | १५० |
| १० मिसलेनियस | ३३८ | ६१ | १३९ | ८७ | २४३ |
| ११ ऑक्झि. व टेरिटोरियल | १२१ | ... | २७ | २२७ | ९ |
| १२ एअर फोर्स | २४६ | १९ | ६ | १९२७ | २८६ |
| १३ रॉयल इंडियन नेव्ही | ११३ | ... | ... | ५८ | १८५४ |
| १४ मिलिटरी एंजिनिअर्स | २८६ | ... | ... | १९७ | ... |
| एकूण. | ६९१३ | ३१५ | ३९७७ | ५१९५७ | १४०१२५ |

( यांतून कारकून, सिव्हिलियन्स व अनुयायी यांची मूळ संख्या वगळली आहे. )

याप्रमाणें आज प्रत्यक्ष युद्धांत भाग घेण्यासाठीं म्हणून ठेवण्यांत आलेल्या हिंदी फौजेंत असणाऱ्या हिंदी व ब्रिटिश अधिकारी व सैनिक यांची संख्या पाहतां संबंध हिंदी फौजेच्या हिंदीकरणाची अडचण सहज लक्षांत येण्यासारखी आहे. फौजेचें हिंदीकारण व स्वातंत्र्य हे दोन्ही प्रश्न परस्परावलंबी असल्यानें स्वातंत्र्य तर दूरच राहिलें परंतु ज्यास डोमिनियन स्टेटस म्हणजे वसाहतींच्या धर्तीवरचें स्वराज्य म्हणतात त्यापासूनहि हिंदुस्थान किती दूर आहे हें सहज लक्षांत येईल.

सांप्रतचें महायुद्ध सुरू झाल्यानंतर पांच सहा महिन्यांपूर्वी हिंदी फौजेंत एक लक्ष सैनिक अधिकीचे वाढवावयाचें असें ठरलें व त्यांची वाढ कशी झाली व प्रांतवारी भरणी काय याचे आंकडे ८–११–४० च्या टाइम्स ऑफ इंडिया मध्यें प्रसिद्ध झाले ते असे आहेत.

| प्रांत | संख्या. |
|---|---|
| पंजाब | ४८००० |
| संयुक्तप्रांत | १२००० |
| मद्रास | १०००० |
| मुंबई | ७५०० |
| राजपुताना व मध्यहिंदुस्थान | ५३५० |
| नेपाळ | ३३०० |

यांत ११६०० शीख, ४००० रजपूत, ४५०० जाठ, ५००० मराठे, ४४०० डोग्रा व १५००० इतर हिंदू असून शेंकडा २५ टक्के पंजाबी मुसलमान आहेत. अधिकाऱ्यांत १०५० इंग्रज व ९४६ हिंदी आहेत.

## संरक्षक सैन्याच्या खर्चाचा आढावा.

राष्ट्रसंरक्षणार्थ लागणाऱ्या खर्चाचें अंदाजपत्रक प्रतिवर्षी ॲसेंब्लीपुढें जातें. त्या खर्चावर ॲसेंब्लीचा ताबा नाहीं. तथापि लष्करी धोरणासंबंधीं भाषणें करतांना आपल्या तक्रारी या ना त्या रूपानें मांडण्याचा हक्क ॲसेंब्लीच्या सभासदांना असतो. हिंदुस्थानच्या संरक्षणाकरितां लागणाऱ्या खर्चापैकीं कांहीं हिंदुस्थानांत व कांहीं इंग्लंडांत खर्च होतो. आर्मी, नेव्ही आणि मिलिटरी एंजिनिअर्स सर्व्हिसेस या मथळ्याखालील खर्च इंग्लंड या सदरांत टाकला जातो, व हा इंग्लंडांत होणारा खर्च हिंदुस्थान सरकारकडून ट्रॅन्स्फर पद्धतीनें मांडला जातो. १ एप्रिल १९२० ते ३१ मार्च १९२७ पर्यंत या सदरांत पडणाऱ्या खर्चास हुंडणावळ धरून एक रुपयास दोन शिलिंग हा भाव पडत असे, परंतु १ एप्रिल १९२७ नंतर हा भाग आतां एक रुपयास १ शि. ६ पे. स्टँडर्ड ठरविण्यांत आला आहे. लष्करी खर्च प्रांतिक सरकारकडून घेण्यांत येत नाहीं.

वर दिलेल्या दोन तक्त्यांवरून ब्रिटिशांच्या हिंदुस्थानी फौजेवर किती व कसा खर्च होतो हें सहज लक्षांत येईल. या अवाढव्य खर्चावर आजपर्यंत अनेकांनीं अनेक प्रकारें टीका केल्या; परंतु त्यांचा कांहीहि उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर वरील पद्धति चालू ठेवल्यामुळेंच आज हिंदुस्थान स्वसंरक्षणक्षम होऊं शकलें नाहीं व अशीच पद्धति राहिल्यास पुढेंहि त्यास असेंच परावलंबी रहावें लागेल. हिंदुस्थानांत राष्ट्रीय सैन्याची उभारणी व्हावी हा प्रयत्न झाल्यास इतर राष्ट्रांप्रमाणेंच हिंदी लोकहि स्वसंरक्षणक्षम होऊं शकतील. याकरितां प्रथमतः इतर राष्ट्रांची संरक्षणघटना कशी आहे तें पाहूं.



# भाग ३
# राष्ट्रांची संरक्षक लष्करी संघटना

सध्यां प्रचलित असलेल्या वेगवेगळाल्या स्वतंत्र राष्ट्रांच्या लष्करी संघटना कशा प्रकारें आंखल्या आहेत हें पाहिलें म्हणजे हिंदुस्थानांत चालू असलेल्या संघटनेंत कोणत्या उणीवा आहेत त्या दिसतील. याकरितां वेगळाल्या राष्ट्रांच्या संघटनांची थोडीशी माहिती प्रथम घेऊं.

## अमेरिका

स्वतंत्र राष्ट्रांतून लोकांवर सक्ती न करतां ऐच्छिक पद्धतीनें लष्करी भरती करावी असा एक विचार प्रबल व शिष्टसंमत असल्यामुळें इंग्लंडमध्यें सक्तीचें लष्करी शिक्षण नको असें ठरून इंग्लंडनें सक्तीच्या लष्करी शिक्षणाचा स्वीकार केला नाहीं. स्वतंत्रतेच्या बाबतींत अमेरिकेचें तत्त्वज्ञान विशेष पुढारलेलें समजलें जात असल्यामुळें त्यांनीं "सक्ती" या शब्दाला चिकटून न बसतां तो वगळून आपल्या राष्ट्रांतील लोकांचें लष्करी सामर्थ्य वाढविलें व नागरिकांचें सैन्य बनविण्याचें धोरण आंखलें. अभ्यासाशिवाय संवयी जडत नाहींत व संवय जडल्याशिवाय माणसांत कार्यकर्तृत्व उत्पन्न होत नाहीं म्हणून प्रथमतः लहानपणापासून मुलास इतर शिक्षणाबरोबरच लष्करी बाणा अंगीं उत्पन्न होण्यासाठीं शाळा व कॉलेजें यांजमधून लष्करी शिक्षणाची योजना तयार करून ती अंमलांत आणल्यानें प्रत्येक अमेरिकन तरुणाच्या मनांत आपल्या देशाच्या रक्षणाचें बाळकडू पाजलें जातें. सरकारच्या देखरेखीखालीं शाळा व कॉलेजें यांजमधून दोन वर्षें लष्करी शिक्षण दिलें जातें व यांतून तयार झालेल्या लोकांस वेळ पडल्यास लष्करी अधिकारी होतां येईल याची पूर्वतयारी करावयास सवड सांपडते. इंग्लंडमधील विश्वविद्यालयांतील ऑफिसर्स ट्रेनिंग कॉर्प्समध्यें दिले जाणारे शिक्षणाबरोबरचें शिक्षण अमेरिकेंतील विद्यार्थ्यांस दोन वर्षांत दिलें जातें. अमेरिकेंतील संयुक्त सरकारनें आपल्या राष्ट्रांतील सर्व घटक संस्थानांनीं आपापल्या संस्थानांत "नॅशनल गार्ड्स" ठेवावे म्हणून त्यांस

आर्थिक मदतीचीहि योजना करून ठेविलेली आहे, व त्यामुळें प्रत्येक अमेरिकन संस्थानानें आपापल्या संस्थानांत नॅशनल गार्ड्स अन्तःस्वास्थ्यासाठीं ठेविले असून त्यांस लष्करास मदत करतां येते. अमेरिकेंत लष्कराची सोय तीन प्रकारें केली आहे, ( १ ) खडें सैन्य, ( २ ) नॅशनल गार्ड्स व ( ३ ) रिझर्व्हज्.

## फ्रान्स

प्रत्येक नागरिकानें स्वदेशसंरक्षणक्षम असावयास पाहिजे ही फ्रेंच लोकांची मनोभूमिका असल्यानें त्यांनीं आपल्या देशांतील प्रत्येक नागरिकास ( याला अपवाद फक्त आजाराचा किंवा महत्त्वाच्या कामाचाच असतो ) सक्तीचें लष्करी शिक्षण देण्याचा नियमच केला असल्यामुळें वीस वर्षे वयाचीं भरतांच प्रत्येक फ्रेंच नागरिकास पहिल्या वर्षी लष्करांत काम करावें लागून पुढें २४ वर्षे रिझर्व्ह-मध्यें रहावें लागतें. या धोरणामुळें थोडक्या खर्चात व जरूर पडेल तेव्हां सबंध राष्ट्रचें राष्ट्रच खडें सैन्य म्हणून उभें करतां येतें! याशिवाय फ्रेंचांच्या वसाहतींतहि हेच कायदे लागू केल्यानें वसाहती लष्करहि फ्रेंचांस सहाय्य असतें. जर्मनी व इटली या देशांतहि जवळ जवळ हीच पद्धति सुरू असल्यानें त्या देशांतील लोकहि स्वदेशसंरक्षणार्थ सदैव तयार असेच सांपडतात.

## जपान

या देशांतील लोकांचे दोन भाग पाडले असून एकास लढाऊ व दुसऱ्यास बिनलढाऊ अशीं नांवें दिलीं आहेत. पैकीं लढाऊ हे लष्करांत घेण्यास पूर्णतया योग्य व दुसरे बिन लढाऊ हे कमी योग्य, पण अयोग्य नाहीत. लढाऊ वर्गातील लोकांस पहिलीं दोन वर्षे खड्या सैन्यांत ठेवण्यांत येतें, व नंतर त्यांस फर्स्ट लाइन रिझर्व्हमध्यें पाठविण्यांत येतें. तेथून कांहीं नियमित कालानंतर सेकंड-लाइन ऑफ रिझर्व्हमध्यें त्यांना धाडतात. वयाच्या ३८ व्या वर्षी टेरिटोरियल आर्मीमध्यें वरील रिझर्व्हमधील लोक गुंतले असतात; व याप्रमाणें प्रत्येक जपानी नागरिकास जवळ जवळ वीस वर्षे लष्करी नोकरी करावी लागते. खड्या सैन्यांत घेण्यालायक नसलेल्या लोकांस सेकंडलाइन ऑफ रिझर्व्हमध्यें प्रथम भरती करतात व त्यांस या सैन्यांत १२ वर्षे काम करावें लागतें. नंतर यांमधील पूर्णतया लायक असणाऱ्या इसमांस टेरिटोरियल आर्मीमध्यें बाकीचीं आठ वर्षे राहून आपली एकंदर वीस वर्षांची नोकरी पूर्ण करावी लागते.

## वसाहती

ब्रिटिशांच्या वसाहतींतहि स्वदेशसंरक्षण ही बाब फार महत्त्वाची समजली असून तिजवर फार लक्ष असतें व म्हणून देशांतील प्रत्येक तरुणास राष्ट्राच्या हांकेस ओ तावडतोब देतां आली पाहिजे अशीच शिक्षणयोजना आंखली आहे. या वसाहती म्हणजे ऑस्ट्रेलिया, कॅनडा, न्यूझीलंड व सौथ आफ्रिका. या सर्व वसाहतींचा लष्करी इतिहास फार मौजेचा आहे. प्रत्येक वसाहतींत स्वसंरक्षणार्थं इंपीरियल ट्रुप्स कमीअधिक प्रमाणांत ठेवण्यांत येत व त्यांच्या खर्चासाठीं वसाहती कमी अधिक खर्च देत असत; परंतु या इंपीरियल ट्रुप्सचा उपयोग वसाहतवाल्यांच्या मर्जीनुरूप न करतां साम्राज्यविषयक बाबतीपुरताच व्हावा असें धोरण आंखलें जाई व त्यावर मधून मधून खटके उडत. वसाहतींत होणाऱ्या अशांततेला प्रतिबंध करण्याची कामगिरी इंपीरियल ट्रुप्सला न सांगतां वसाहतींवर बाहेरील आक्रमण झाल्यास मात्र या साम्राज्य-दलांचा उपयोग करावा असा कोटिक्रम असे. वसाहतींवर इतर राष्ट्रांनीं आक्रमण केल्यास मात्र साम्राज्याचें सर्व लष्करी सामर्थ्यं त्या वसाहतीचे संरक्षणार्थं धांवून जात असे. परंतु यांत साम्राज्य संरक्षण म्हणजे वास्तविक कोणती बाब या प्रश्नावर खटके उडत व मग हळूं हळूं वसाहतींना आपल्या स्थानिक लष्कराची, संरक्षणाचे बाबतींत, जबाबदारी जाणवूं लागली व त्यामुळें वेळेनुसार वेगळालें लष्करी धोरण प्रत्येक वसाहत आंखूं लागली. १८५८ मध्यें वसाहतींचा संरक्षण खर्चाचा आंकडा ४०,००,०००पौंड असून त्यांतलि फक्त ३८००००पौंड वसाहतींनीं खर्च केला व बाकीचे जवळ जवळ ३६२०००० पौंड खर्च इंग्लंडनें स्वत: केला. इतकी मदत इंग्लंड वसाहतींस करीत असे. संरक्षणाची सर्व जबाबदारी इंपीरियल ट्रुप्सवर होती. परंतु १८६२ मध्यें हौस ऑफ कॉमन्सनें एका ठरावाअन्वयें अन्तःस्वास्थ्याची जबाबदारी त्या त्या वसाहतींवर टाकली, व त्यानंतरहि बरींच वर्षें वसाहतींचे संरक्षणार्थ ब्रिटिश फौजा स्वखर्चानें इंग्लंडनें वसाहतींत ठेविल्या होत्या; इतकेंच नव्हे तर वसाहतींत पूर्ण स्वायत्तता दिल्यावरहि कित्येक वर्षें इंग्लंडचें लष्कर स्वखर्चानें वसाहतींत ठेवण्यांत येत असे. ( See Keith's "*Responsible Government in the Dominions and Imperial unity of the Dominions.*" )

१८७० मध्यें कॅनडांतील रीलबंडाच्या योगें कॅनडाचे पूर्व व पश्चिम असे दोन भाग पडून पश्चिम कानडा प्रांत अलग होण्यास अमेरिकेची मदत होतेसें दिसतांच इंपीरिल फोर्स कानडाचे मदतीस धावत जाऊन त्याचे मदतीनें या बंडाचा बीमोड केला ही गोष्ट प्रसिद्ध आहे. बोअर युद्ध होईपर्यंत कानडांतील हॅलिफाक्स व एस्क्विमॉल्ट या जागीं इंपीरियल फोर्स ठेवण्यांत येई. पण हळूहळू कॅनेडियन सरकारनें स्वसंरक्षणार्थ आपलें सैन्य वाढवून आपली जबाबदारी अंगावर घेतली. ऑस्ट्रेलियांतील सर्व वसाहतींना एकत्रित करून त्यांस ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थ हें नांव ठेवलें व यायोगें सर्व दलें एकवटण्याचें ठरविलें, पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. १९०० व १९०८ मध्यें लष्करी धोरण व संरक्षणक्षमता या बाबतींत ऑस्ट्रेलिया ही मागसलेली वसाहत असून इंग्लंडला तिचे संरक्षणाची काळजी घेणें भाग पडत असे. १९०९ मध्यें युरोपांत झालेल्या घडामोडींनीं मात्र ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड या दोन्ही वसाहतींना संरक्षणाचे बाबतींत धास्ती वाटूं लागली व त्यायोगें सबंध वसाहतींतिल तरुणांना लष्करी शिक्षण देऊन त्यांस एकाच पद्धतीनें संरक्षणक्षम करण्याचें धोरण दोन्ही वसाहतींनीं ठरविलें. कानडा मात्र यासंबंधांत अजून दुर्लक्षच करीत होतें. शाळेंतील मुलांस कॉलेजांत जाण्यापूर्वी लष्करी शिक्षण देण्यांत येई पण पुढें पुढें राजकीय भीतीनें प्रत्येक मुलास शाळेंतील प्राथमिक लष्करी शिक्षण संपल्यावर तो वयांत आला म्हणजे पुढचें लष्करी शिक्षण देणें बंद केलें. परंतु लॉर्ड किचनेरनें १९०९ मध्यें ऑस्ट्रेलियांत जाऊन त्या वसाहतीची पाहणी केली व १९१० मध्यें त्याच्या सल्ल्यानें वयांत आलेल्या प्रत्येक ब्रिटिश नॅशनॅलिटीच्या मुलास लष्करी शिक्षण सक्तीनें दिलेंच पाहिजे असें ठरविण्यांत आलें व त्याअन्वयें धोरण आंखण्यांत आलें.

## न्यूझीलंड

मध्यें वसाहतीस येणाऱ्या ब्रिटिश नागरिकास सहा महिन्यांच्या निवासानंतर लष्करी शिक्षण घेणें भाग पडे. विद्यार्थ्यांस १२–१४ वर्षेपर्यंत प्राथमिक शाळांत शिकत असतां त्यांस ज्यूनिअर कॅडेट म्हणून सक्तीचें शिक्षण देत व १४ ते १८ वर्षें दुय्यम शाळांत शिक्षण घेत असतां सीनिअर कॅडेट म्हणून शिकावें लागे. १८ वर्षानंतर जनरल ट्रेनिंग सेक्शन किंवा टेरिटोरियल फोर्समध्यें शिक्षण घेणें भाग पडतें व याप्रकारें प्रतिवर्षी जवळ जवळ ३०,००० लोकांस

जनरल ट्रेनिंगमध्यें शिक्षण दिलें जातें. कांहीं वर्षांच्या अनुभवानंतर ज्यूनिअर कॅडेट काढून टाकून त्याचे जागीं बालवीर चमूची शिक्षणपद्धति सुरू करण्यांत आली. याशिवाय ड्रिल व शिक्षण यांची सांगड अशा व्यवस्थित पद्धतीनें आंखण्यांत आली कीं, २२ व्या वर्षी हा लष्करी शिक्षणक्रम पुरा होऊन तरुणास मुक्त करण्यांत येई, व जरूर पडल्यास त्यास लष्करांत भरती व्हावें लागेल ही एकच अट त्याचेवर लादण्यांत येते. धार्मिक निर्बन्ध लष्करी शिक्षणाच्या आड आले तर त्या माणसास लष्करी शिक्षणाची माफी मिळे, परंतु संरक्षणार्थ लागणाऱ्या इतर कामांत त्यास गव्हर्नर–इन्–कौन्सिलच्या हुकमान्वयें काम करावें लागतें. ("*Imperial unity and the Dominions*" by Keith, p. 305). २५ ते ३० वर्षें शिक्षण घेणाऱ्यास रिझर्व्हसमध्यें नोकरी द्यावी लागते, व यांस अडचणीच्या प्रसंगीं लष्कराच्या मदतीस जावें लागतें; इतकेंच नव्हे तर १७ ते ५५ वर्षांच्या वयामधील सहा महिन्यांवर वसाहतींत राहिलेल्या प्रत्येक नागरिकास युद्धप्रसंग उद्भवला तर युद्धांत भरती व्हावेंच लागतें.

## ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थ

या वसाहतींनीं १९१२ मध्यें एक कायदा पास करून त्याअन्वयें ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थच्या संरक्षणाची योजना आंखली. या योजनेनुसार वसाहतींत सहा महिन्यांपेक्षां अधिक वेळ स्थायी झालेल्या प्रत्येक पुरुषास–तो ब्रिटिश नागरिक असल्यास–१५ ते ६० वर्षांच्या वयापर्यंत युद्ध उद्भवल्यास लष्करांत सामील होणें भाग पडतें. त्याचप्रमाणें सहा महिन्यांहून अधिक काळ वसाहतींत राहणाऱ्या ब्रिटिश नागरिकांच्या प्रत्येक कुटुंबांतील प्रत्येक मुलास १२ ते १४ वर्षेंपर्यंत ज्यूनिअर कॅडेट म्हणून, व १४ ते १८ वर्षेंपर्यंत सीनिअर कॅडेट म्हणून, व नंतर १८ ते २५ वर्षेंपावेतों "सिटिझनफोर्स" मध्यें शिक्षण घेणें भाग पडतें व २५ ते २६ या वर्षांत त्याच फोर्समध्यें काम करावें लागतें. या शेवटच्या बाबींत मात्र प्रत्यक्ष युद्ध सुरू नसल्यास २५ ते २६ या वर्षी एक रेजिस्ट्रेशन करून प्रतिवर्षी एक "मस्टर परेड" करावी लागते. न्यूझीलंडप्रमाणें धार्मिक बाबीची अडचण या वसाहतींत दाखवितां येत नाहीं व त्यामुळें लष्करी शिक्षण टाळणाऱ्या लोकांसाठीं क्रिमिनल लॉमध्यें कांहीं कलमें समाविष्ट करावीं लागलीं. या कलमांन्वयें टाळाटाळी करणाऱ्या तरुणांस डिटेक्शन मिलिटरी कँपमध्यें पडावें

लागतें. प्रत्यक्ष लष्करांतील नोकरीचा काल बराच कमी करण्यांत आला असला तरी जें लष्करी शिक्षण नागरिकांस दिलें जातें तें चांगलें कार्यक्षम असतें असें सर्व जण म्हणतात. ( "*Imperial unity and the Dominions*" p. 306 ).

## युनिअन गव्हर्नमेंट

१९१२ च्या डिफेन्स ॲक्टाअन्वयें युनिअनवर युद्धाचा प्रसंग बेतल्यास १७ ते ६० या वयांच्या मधील सर्व पुरुष नागरिकांस युनिअन संरक्षणार्थ वैय्यक्तिक नोकरी देणें भाग ठेवलें असून युद्धप्रसंगीं कार्यक्षम राहण्यास शांतताकालीं लष्करी शिक्षण घेणें भाग पडतें. हें शिक्षण त्यांस २१ व्या वर्षी घ्यावेंच लागतें, व सबंध शिक्षण २५ व्या वर्षी पूर्ण करावें लागतें. १७ ते २५ या कालांत प्रत्येक पुरुषास २१ वर्षांचे आधीं केव्हांहि लष्करी शिक्षणास प्रारंभ करतां येतो व असें झाल्यास १७ ते २१ या वर्षांत साहजिकच सर्व लष्करी शिक्षण पुरें होऊन त्या इसमास २५ व्या वर्षापर्यंत थांबावें लागत नाहीं. शांतता काळांत लष्करी शिक्षण घेणें अवश्य असणाऱ्या माणसांपैकीं शें. ५० टक्के लोकांनाच शिक्षण घ्यावें लागतें. परंतु २१ वें वर्ष न लागून सक्तीच्या शिक्षणांत दर्ज न केल्या गेलेल्या प्रत्येक इसमास २१ ते २५ या वयांत रायफल ॲसोसिएशनचे मेंबर व्हावें लागतें. हें शिक्षण व नोकरीची जबाबदारी फक्त युरोपियन लोकांसच लागू करण्यांत आली आहे.

## कानडा

१९१४ पर्यंत कानडाच्या सरकारजवळ खर्डे सैन्य असें फारसें नसे व यावर्षी तें फक्त ३ हजार होतें. त्यांजकडील काम म्हणजे कानडामधील किल्ल्यांचें संरक्षण एवढेंच असे. महायुद्धास प्रारंभ झाल्यावर मात्र कानडाला आपलें सैन्य वाढविणें भाग पडलें व १९१४ मध्यें एकदम ३३ हजारांची पहिली पलटण उभारून तिला फ्रान्समध्यें मदतीस पाठविलें. १९१५ मध्यें दुसरी व १९१६ मध्यें आणखी दोन पलटणी उभारण्यांत आल्या व शिवाय कॅनेडियन घोडदळहि उभारण्यांत येऊन त्याची फ्रान्सला दोस्त राष्ट्रांच्या मदतीसाठीं रवानगी करण्यांत आली. १९१७-१८ मध्यें सक्तीच्या सैन्यभरतीचा कायदा पास करण्यांत आला व ८३३५५ रिक्रूट भरती करण्यांत आले. महायुद्धासाठीं म्हणून

कानडानें एकूण ५ ल. ९५ ह. ४४१ एवढें सैन्य उभारलें होतें. यापैकी २ ल. १० ह. ९६ इतके लोक कामास आले. तेथील कायद्याअन्वयें १८ ते ६० या वयांतील सर्व पुरुषांस युद्धकालीं सैन्यांत भरती व्हावें लागतें व ते नागरिक ब्रिटिश युरोपियनच असावे लागतात. कानडाचे लष्करास "मिलिशिया" असें म्हणतात. त्याचे दोन भाग पडतात, (१) रेग्युलर व (२) रिझर्व्ह. पैकीं रेग्युलरचे दोन पोटविभाग केलेले असतात. ते म्हणजे (१) पर्मनंट फोर्स व (२) नॉन-पर्मनंट फोर्स. रेग्युलर मिलिशियामध्यें ऐच्छिक रीत्या लोक भरती होतात व त्यांस पहिली तीन वर्षें नोकरी करावीच लागते व नंतर वयास ६० वर्षें पूर्ण होईपर्यंत एकवर्ष मध्यें केव्हां तरी लष्करी नोकरी रेग्युलर फोर्समध्यें पुरी करावी लागते. १९३१ मध्यें रेग्युलर फोर्समध्यें ३८०० संख्या होती. नॉन-पर्मनंट भागांत तोफखाना, पायदळ, घोडदळ, इंजिनीअर्स, सिग्नलर्स वगैरे शाखोपशाखांत काम करणारांचा भरणा असतो. या दलांत १९३१ मध्यें ९०५० अधिकारी व १ ल. १६ ह. ५४५ सैनिक होते.

मिलिशिया रिझर्व्हः—याची संख्या पुढीलप्रमाणें भरते.

( १ ) रेग्युलर सिटी यूनिट्स व रूरल कॉर्प्स.

( २ ) रिझर्व्ह डीपोज्.

( ३ ) रिझर्व्ह ऑफ ऑफिसर्स.

याशिवाय कॅडेट कॉर्प्स व रायफल ॲसोसिएशन्स यांतून शिक्षण घेणाऱ्या लोकांचीहि मदत घेतां येते. अचुक नेम मारतां यावा यासाठीं रायफल ॲसोसिएशन्स काढण्यांत येतात व यांचे मिलिटरी व सिव्हिल रायफल ॲसोसिएशन्स असे दोन प्रकार असतात. पैकी कानडांत मिलिटरी रायफल ॲसोसिएशन्स १९५ वर असून त्यांच्या एकंदर सभासदांची संख्या १२३७४ आहे, व सिव्हिल रायफल ॲसोसिएशन्स ७१ असून त्यांचे सभासद ४२१६ आहेत; या प्रमाणें लोकसंख्येचा बराचसा भाग संरक्षणक्षम कसा होईल या गोष्टीकडे नीट लक्ष ठेवून लष्करी शिक्षणांत तरबेज झालेले लोक वेळेवर उपयोगी पडावेत अशी कायद्यान्वयें दक्षता घेण्यांत आली आहे. कॅनेडियन मिलिशिया कायद्यान्वयें संरक्षण मंत्र्याला शाळेंत शिक्षण घेणाऱ्या १२ वर्षांवरील मुलांचे कॅडेट्स कॉर्प्स काढण्याचा हुकूम जारी करतां येतो व या प्रमाणें १९२९–३० सालांत

दर्जे केलेल्या कॅडेट्सची संख्या १ लक्ष ३० होती. १९३१-३२ च्या कॅनेडियन संरक्षण खात्याच्या खर्चाचा आंकडा ११११२००० डॉलर्स होता, व त्यांत पर्मनंट फोर्स ( खडें सैन्य ) चा ५०११००० डॉलर्स खर्च असून नॉनपर्मनंट मिलिशियावर होणारा खर्च २३२४००० डॉलर्स होता. या आंकड्यावरून कमी खर्चानें अधिकांत अधिक संरक्षणक्षमता राष्ट्रांत कोणत्या प्रकारें उत्पन्न करतां येईल इकडे सर्व राष्ट्रांचें लक्ष असतें हें सहज दिसून येतें.

येथवर स्वतंत्र युरोपीयन राष्ट्रें व वसाहती यांचे संरक्षक धोरणाचा विचार केला. आतां प्रत्यक्ष इंग्लंडमध्यें या संबंधांत कशी व्यवस्था करण्यांत आली आहे तें पाहूं.

## ग्रेट ब्रिटन

अमेरिकेप्रमाणें वैय्यक्तिक स्वातंत्र्याचे बाबतींत राष्ट्रस्वातंत्र्याप्रमाणेंच अत्यंत जागरूक असणाऱ्या ग्रेट ब्रिटन ह्या राष्ट्रानें आपल्या राज्यांतील नागरिकांस लष्करांत भरती होण्याची सक्ती कायद्यानें न करतां ती बाब नागरिकांच्या इच्छेवर सोंपविली आहे; मात्र याचबरोबर प्रत्येक व्यक्तीस संरक्षणक्षम होतां येण्याचीं साधनेंहि उपलब्ध करून ठेविलीं आहेत. इंग्लंडच्या सैन्यांत पुढीलप्रमाणें व्यवस्था असते.

( १ ) खडी फौज. यांपैकीं कांहीं भाग स्वदेशांत व कांहीं परदेशांत ठेविलेला असतो.

( २ ) रिझर्व्ह सैन्य. यांतच मिलिशिया व सप्लिमेंटरी रिझर्व्ह यांचा समावेश होतो.

( ३ ) टेरिटोरियल आर्मी.

( ४ ) सप्लिमेंटरी रिझर्व्ह.

खड्या सैन्यांतील २० घोडदळ रेजिमेंटांपैकीं ५ हिंदुस्थानांत व ३ इतर देशांत ठेविलेल्या असतात, व १२ खुद्द इंग्लंडमध्यें असतात. पायदळाच्या ६३ रेजिमेंट्स असून प्रत्येकीमध्यें दोन बॅटेलियन्स असतात. याप्रमाणें १२६ बॅटेलियन्स पैकीं ६३ इंग्लंडमध्यें, ४५ हिंदुस्थानांत, २ सुदानमध्यें, ६ इजिप्तमध्यें

व १० इतर वसाहतींत—याप्रमाणें त्यांची वांटणी केलेली आहे. या खड्या लष्करास मदत म्हणून राखीव सैन्य असतें. त्याची संख्या बरीच मोठी असते. ही १९१४ मध्यें कमी असली तरी आतां ती बरीच वाढविण्यांत आली आहे. वेगळाल्या वर्षी या राखीव सैन्याच्या गणतीचे आंकडे पुढें दिल्याप्रमाणें होतें:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| वर्ष— | १९१४ | १९१९ | १९२२ | १९३२ | १९३६ |
| संख्या— | ५१७६ | ११५६३६८ | ७४००० | १२४५०९ | १२१२०० |

१९१९ मध्यें युद्ध नुकेंच बंद झालें असल्यामुळें त्या सालची संख्या फार फुगलेली दिसते.

टेरिटोरियल फोर्समध्यें रिक्रूट भरती कौन्टी कौन्सिल किंवा कौन्टी ॲसोसिएशन्स या संस्थांमार्फत केली जाते. या सैन्यांतील भरती वेगळाल्या वर्षी पुढीलप्रमाणें होती:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वर्ष— | १९१३ | १९२२ | १९२९ | १९३६ |
| संख्या— | २४५७७९ | १३४७६९ | १३९७९१ | १३९५७७ |

याप्रमाणें या विभागांत लष्करी शिक्षण घेणाऱ्या लोकांची संख्याहि बरीच मोठी आहे. या शिवाय शाळा व कॉलेजेसमधील विद्यार्थ्यांस लष्करी शिक्षण देण्याकरितां ऑफिसर्स ट्रेनिंग कॉर्प्सची योजना केली असून त्यांत सीनिअर व ज्यूनिअर असे दोन विभाग केले आहेत. त्यांत शिक्षण घेणाऱ्या तरुणांची संख्या पुढीलप्रमाणें आहे:—

| वर्ग | ऑफिसर्स | कॅडेट्स | एकूण |
|---|---|---|---|
| सीनिअर डिव्हिजन | १६३ | ४४१२ | ४५७५ |
| ज्यूनिअर डिव्हिजन | ६८० | ३४५८१ | ३५२६१ |

आतां प्रत्यक्ष लष्करी घटनेकडे पाहूं या. १९२६–२७ व १९३१–३२ या दोन वर्षांच्या आंकड्याची तुलना पुढें दिली आहे.

| लष्करी विभाग | १९२६–२७ | १९३१–३२ |
|---|---|---|
| १ खडी फौज ( यांत हिंदुस्थानांतील ६० ह. ब्रिटिश फौज सोडून बाकीची ) | १४२४३१ | १३७७३७ |
| २ कलोनियल व नेटिव्ह इंडियन ट्रुप्स | ३४२६ | २२२४ |
| ३ आर्मी रिझर्व्ह | ९६००० | १२४५०९ |
| ४ सप्लिमेंटरी रिझर्व्ह | २३००० | १७४८५ |
| ५ मिलिशिया अँड चॅनेल आयलंडस | १३२५ | ...... |
| ६ मिलिशिया ( माल्टा व बर्म्युडा मधील ) | १४३७ | ...... |
| ७ टेरिटोरियल आर्मी | १८९०९३ | १२४३३० |
| ८ ऑफिसर्स ट्रेनिंग कॉर्प्स | १२४५ | ६८८९ |
| ९ ब्रिटिश ट्रुप्स इन् इंडिया | ६१५४३ | ५ १११ |
| एकूण– | ५१९५०० | ४७१२८५ |

वरील आंकड्यांकडे पाहतां १९३१–३२ या वर्षी इंग्लंडनें आपलें सैन्य १९२६–२७ च्या ५१९५०० या संख्येपेक्षां कमी म्हणजे फक्त ४७१२८५ एवढेंच ठेविलें होतें असें सकृद्दर्शनीं दिसतें, परंतु या दोन्ही वर्षांतील आर्मीरिझर्व्हची संख्या पाहतां या बाबतींत १९३१–३२ मध्यें बरीच मोठी वाढ केली होती, म्हणजे पूर्वीच्या ९६००० च्या जागीं रिझर्व्हमध्यें २८५०९ नीं अधिक राखीव सैन्य वाढवून तिचें बळ एकदम १२४५०९ वर नेऊन ठेविलें हें दिसेल. या प्रकारें रिझर्व्ह वाढवून व खड्या फौजेंतील संख्या जवळ जवळ साडेचार हजार कमी करून इंग्लंडच्या लष्करी खर्चांत बचत टाकली; परंतु लष्करी सामर्थ्य पूर्ववतच कायम ठेविलें असें दिसतें. म्हणजे कमी खर्चांत अधिक कार्यक्षमता कशी करतां येईल हें धोरण अमलांत आणण्यास इंग्लंडनें प्रारंभ केला.

प्रो. लिमये यांनीं लिहिलेल्या "इंडियाज मिलिटरी डिफेन्स" या पुस्तकांतील माहितीवरून इंग्लंडच्या लष्करी खर्चाची माहिती मिळते ती बरीच बोधप्रद आहे. ग्रेटब्रिटनला १९२६–२७ मध्यें खड्या लष्कराचा पगार वगैरे बाबतींत एकूण खर्च ९५५७००० पौंड आला, पण तोच १९३१–३२ मध्यें ९५०००० पौंड

आला म्हणजे जवळ जवळ ५७००० पौंडांची बचत झाली. टेरिटोरियल सैन्याचे बाबतींत १९२६–२७ मध्यें याची संख्या २८०६८१ असून ती १९३१–३२ मध्यें ३०३६७२ पर्यंत वाढलेली दिसते. याचा अर्थ या बाबतींत सैन्य अधिकीचें वाढविलें, परंतु टेरिटोरियल सैन्यांत झालेली ही जवळ जवळ २३००० माणसांची वाढ खड्या सैन्यांत होती तर खर्च अधिक वाढला असता. २३००० खड्या सैन्यास इंग्लंडला ४२७००० पौंड खर्च येतो, परंतु तो न करतां टेरिटोरियल सैन्यांत २३००० ची वाढ केल्यानें तो खर्च ३३७००० पौंड झाला, म्हणजे खडें सैन्य कमी करून टेरिटोरियल वाढविण्यांत इंग्लंडनें आपली १९३१–३२ सालीं १ लक्ष पौंडांची बचत केली. याचा अर्थ हाच कीं, स्वदेशांतील नागरिक लष्करीरीत्या शिक्षण घेऊन तयार झाल्यास लोक संरक्षणक्षम राहून खडें सैन्य फार मोठें ठेवण्याची आवश्यकता नाहीं, व कार्यक्षमताहि कायमची कायमच राहते. त्याचबरोबर खर्चाचीहि बचत होते. आतां हिंदुस्थानकडे या दृष्टीनें पाहिल्यास आपणांस फारच फरक दिसतो, तो कसा तें पाहूं या.

## हिंदुस्थानचें लष्कर

हिंदुस्थानच्या संरक्षणासाठीं म्हणून कामीं येणाऱ्या धोरणांत पुढील गोष्टींचा समावेश होतोः—

( १ ) हिन्दुस्थानांतील ब्रिटिश फौज ( खडें सैन्य )

( २ ) „ हिंदी „ „ „

( ३ ) ऑक्झिलियरीफोर्स यूनिट्स ( यांत युरोपीयनच फक्त येतात )

( ४ ) टेरिटोरियलफोर्स ( यांत हिंदी लोक असतात )

( ५ ) इंडियन आर्मी रिझर्व्ह.

( ६ ) इंडियन स्टेट फोर्सेस.

याप्रमाणें वरील लष्करी संघटनेकडे पाहतां हिंदुस्थानांतील ब्रिटिश लष्कर हें मुळींच जेत्यांचें असल्यामुळें त्यांचे हितसंबंध ब्रिटिशांशीं निगडित असून त्यांस हिंदी हिताचा संबंध लागूंच शकत नाहीं. हिंदुस्थानांतील हिंदी फौजेंत बरेचसे हिंदवासी असले तरी कांहीं लोक हिंदुस्थानच्या सरहद्दीपलीकडून घेतले

जातात. यांना हिंदुस्थान देशावरील प्रेम किंवा हिंद्वासीयांचा जिव्हाळा असण्याचें कारणच नाहीं! गुरखे लोक स्वतःस हिंदी समजत नाहींत म्हणून त्यांचे संबंध हिंद्वासीयांशीं निगडित नसून ब्रिटिशांचा म्हणजे त्यांना नोकरींत ठेवून पगार देणाऱ्या मालकांचाच जिव्हाळा अधिक. आपणांस हिंदी लोकांशीं कांहींएक कर्तव्य नाहीं अशी जाणीव त्यांच्या पोटांत सदैव असते. याचप्रमाणें हिंदी फौजेचे अधिकारी सर्वच्या सर्व इंग्रज! १९२० मध्यें ऑक्झिलियरी फोर्स काढला त्यांत हिंदुस्थानांतील फक्त ५ युरोपियन वंशजांस भरती मिळत असून त्यांची १९३१ मध्यें ३०,००० संख्या होती! इंग्लंडमधील मिलिशिया म्हणजे नागरिक सैन्य याच्या धर्तीवर १९२० मध्यें टेरिटोरियल फोर्सची स्थापना झाली व इच्यांत १९३० मध्यें फक्त १५००० संख्या होती. ह्या आंकड्यांकडे पाहिलें म्हणजे हिंदुस्थाननें स्वसंरक्षणक्षम असें पूर्णतया केव्हांहि होऊं नये असेंच ब्रिटिश सरकारचें धोरण दिसतें, परंतु हा विषय हिंदीकरणांत यापुढें येणारच आहे. कोणत्याही देशांत नागरिक अथवा खड्या सैन्यांत विशिष्ट जमात, जात, धर्म वगैरे पाहून घ्यावें किंवा घेऊं नये असे निर्बंध नसतात, पण हिंदुस्थानांत मात्र यासंबंधीं १८६१ च्या पील कमिशननें व १८७९ च्या ईडन कमिशननें आंखून दिलेल्या धोरणामुळें विशिष्ट लोकांस लष्करी खात्यांत प्रतिबंध करण्यांत आला आहे! त्यांतहि हिंदुस्थानचे "लढाऊ" व "बिनलढाऊ" असे दोन भाग पाडून राज्यकर्त्यांस हवेत असेच लोक लष्करांत घेण्यांत येतात हें समजण्याकरितां पुढील माहिती मनोरंजक होईल.

हिंदुस्थानला नवीन सुधारणाकायदा कसा लागू करावा व १९१९ च्या मॉंटेग्यु चेम्सफर्ड सुधारणानंतर अधिकीचे हक्क कोणते द्यावयाचे याचा विचार करण्याकरितां नेमलेल्या सायमन कमिशनच्या रिपोर्टांतील उतारे वाचून सकृद्दर्शनीं असें वाटूं लागतें कीं हिंदुस्थान सदैव पारतंत्र्यांत राहण्याच्याच लायकीचा आहे! परंतु गेल्या ८० वर्षांतील हिंदी फौजेच्या ब्रिटिशांच्या धोरणाचा अभ्यास केल्यास सायमन कमिशननें केलेल्या मतलबी रिपोर्टासंबंधीं अचंबा वाटण्याचें कारण नाहीं. रोगाचें मूळ न शोधतां वरवर मलमपट्टी लावून ज्याप्रमाणें जखम बरी होत नाहीं, तद्वत्‌च हिंदुस्थान स्वसंरक्षणक्षम का नाहीं हें समजल्याशिवाय हा देश स्वसंरक्षणक्षम कधींच होऊं शकणार नाहीं. परंतु जाणूनबुजून स्वार्थाचें विशिष्ट धोरण चालविणाऱ्या ब्रिटिश पार्लमेंटनें नेमलेल्या साय-

मन कमिशननें ब्रिटिश मुत्सद्यांचें जुनें तुणतुणें वाजत ठेवल्यास नवल नाहीं. सायमन कमिशनच्या रिपोर्टांत पहिल्या व दुसऱ्या भागांत जी विचारसरणी अवलंबिलेली आहे तिचा आशय संक्षेपतः असाः "स्वायत्तता उपभोगणाऱ्या वसाहतींतच काय, पण सबंध जगतांत नसणारी अशी एक गोष्ट हिंदुस्थानांत दिसते व ती म्हणजे हिंदुस्थानांत परस्परविरोधी मानववंश (races) व चढाओढी करणारे अनेक धर्मीय लोक आहेत ! इतकेंच नसून शिवाय येथें लढाऊ बाबतींत कार्यक्षमतेमध्येंहि पुढारलेले व मागासलेले अशा लोकांचे वंश आहेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे. ठोकळ मानानेंच बोलावयाचें तर फौजेंत उत्तम शिपाई ज्या वर्गांतून निघतात ते लोक कांहीं मनाची तरतरी दाखवून परीक्षेंत वरच्या वर्गांत पास होणाऱ्या वर्णांतले खात्रीनें नसतात ! शिपाईबाणा स्वीकारणाऱ्या लोकांचा वर्ण व भूभाग या बाबतींत हिंदुस्थानांत दिसून येणारी भिन्नता युरोपमध्यें कोठेंहि दिसणार नाहीं ! ज्यांना वीर्यवान व लढाऊ जाती म्हणून संबोधण्यांत येतें त्या लोकांमधून सैनिकवर्ग निर्माण होतो तर इतर जमाती व प्रांत यांतून शिपाईबाणा स्वीकारण्यास एकहि माणूस सांपडत नाहीं ! !

भविष्यकाळीं हिंदी फौजेचा खर्च अवश्य म्हणून कमी केल्यास हिंदी फौजेस पडणाऱ्या कामांत अवश्य असणारी मर्दुमकी व लष्करी कार्यक्षमता हिंदुस्थानांतील सर्व प्रकारच्या लोकांत सारख्या प्रमाणांत मिळणें अशक्य आहे. असलेल्या परिस्थितीकडे पाहतां हिंदुस्थानांतील सिव्हिल कामें करणाऱ्या लोकांस हिंदी फौजेंतील लढवय्ये लोकांच्या चढाओढींत त्रास न व्हावा व त्यांचें जीवन सुरक्षित रहावें यासाठीं ब्रिटिश फौज व ब्रिटिश लष्करी अधिकारी यांची हिंदी फौजेंत अत्यंत जरूरी आहे. ब्रिटिश अधिकारी व ब्रिटिश फौज हिंदुस्थानांतून काढून नेल्यास राहिलेल्या हिंदी फौजेंतील वेगळाल्या वर्णाच्या व वंशाच्या लष्करी अधिकाऱ्यांच्या सत्तेंत केवढे दुष्परिणाम होतील हें न सांगणेंच बरें."

याप्रमाणें थोडक्यांत सायमन रिपोर्टांचा संरक्षणाचे बाबतींत सिद्धान्त आहे. हें खरें आहे असें धरलें तर हिंदुस्थानचा भविष्यकाळ फारच काळाकुट्ट व अंधारमय आहे असें समजावें लागेल. परंतु वस्तुस्थिति खास तशी नाहीं हें विचाराअन्तीं समजेल. हिंदुस्थानांत इंग्रजांची सत्ता स्थापन होण्यापूर्वी हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांमधून लढवय्ये लोक होते, व अनेक मोठाल्या संस्थानिकांजवळ मोठाल्या फौजा असत. या फौजांत आज इंग्रज म्हणतात त्याप्रमाणें कांहीं

विशिष्ट प्रांत अगर विशिष्ट लढवय्ये जातीचे लोक, राजपुतान्यांतील ठाकुर व रजपुत लोक, बंगाल्यांतील हिंदी लोक, दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्र, कर्नाटक, मद्रास, आंध्र, तामीळ वगैरे प्रांतांतील सर्व लोक सैन्यांत असत. हा गत इतिहास काय सांगतो? फार काय, खुद्द ब्रिटिश सत्ता ज्या तीन प्रेसिडेन्सी आर्मीच्या बळावर प्रस्थापित झाली त्या प्रचंड फौजांतील सैनिक आज ज्यांस "मार्शल" किंवा लढवय्ये म्हणून संबोधिलें जातें त्याच भागांतील लोक होते काय? परंतु १८५७ च्या शिपायांच्या "बंडा" नंतर दक्षिणेकडील व मुंबईकडील फौजांचें महत्त्व कमी करून ज्या लोकांनीं इंग्रजांचें आसन हिंदुस्थानांत बद्धमूल व स्थिर करण्यास मदत केली त्या पंजाबी, पठाण, गुरखा, नेपाळी व वायव्य सरहद्दीपलीकडील बलुची वगैरे लोकांस सैन्यभरतींत विशेष महत्त्व दिलें गेलें. हिंदुस्थानी लोकांस संरक्षणक्षम होतां येऊं नये व त्यांनीं पुनश्च गडबड करूं नये म्हणून पंजाबी व पठाण लोक विशेष लढवय्ये हें तत्त्व प्रथमतः लॉर्ड रॉबर्ट्स, कमँडर–इन् चीफ् यांनीं उच्चारिलें, व या मतलबी सिद्धान्ताचाच पुरस्कार सर्व लष्करी अधिकारी व मुत्सद्दी पुढें करूं लागले. लेफ्टनंट जनरल मॅकमुन यांनीं आपल्या "दि आर्मी" या पुस्तकांत हिंदी लोकांपैकीं व्यापारी, कारागीर, नोकरवर्ग व शेतकऱ्यांखेरीज इतर सर्व वर्ग भित्रे म्हणून ठरवून टाकलें आहे व ते केव्हांही सैनिक होऊं शकणार नाहींत असा शेरा त्यांवर मारून टाकला आहे. बंगाली लोकांतील उच्चवर्णीयांवर तर जनरल मॅकमुननें चांगलेंच तोंडसुख घेतलें असून काश्मिरी लोकांसहि त्यानें या सदरांत टाकलें आहे. इंग्रजी वाङ्मयांत उच्च कीर्ति संपादन करून ज्यानें आपल्या ब्रिटिश मुत्सद्देगिरीचा छाप त्यावेळच्या हिंदुस्थान सरकारच्या धोरणावर पाडला तो नामांकित लेखक लॉर्ड मेकॉले "क्लाइव्ह" व "वॉरन हेस्टिंग्ज" या निबंधांत बंगाली लोकांसंबंधानें कशीं भरमसाट विधानें करतो तें पहावें म्हणजे हिंदुस्थानच्या सुशिक्षित जनतेवर आपला तेजस्वीपणा विसरण्याचे मोहमंत्र ब्रिटिश मुत्सद्यांनीं कसे टाकले तें वाचकांच्या लक्षांत येईल. असो. हिंदुस्थानांतील विशिष्ट जातीचेच लोक लढवय्ये असून बाकीचे खरेच नालायक आहेत कीं काय हें आपण खुद्द इंग्रजांच्याच लिखाणावरून पाहूं.

शस्त्रास्त्रांवर मधून मधून हात न फिरविला तर तीं गंजतात, पेहेलवानानें कसरत सोडली कीं त्याच्या अंगांतील चपलता नाहींशी होते, मनुष्यास बसून

राहण्याची संवय झाली कीं त्याच्यानें चालवत नाहीं. एवंच व्यवहारांत सतत अभ्यास चालू ठेविला तरच कार्यक्षमता अंगीं राहते. हाच प्रकार मनुष्याची वृत्ति लढाऊ अगर बिनलढाऊ अशी कायम होण्यांत कामीं पडतो. १८५७ पूर्वी बंगाल, मद्रास व मुंबई या नांवाच्या लष्करांत असणारे सर्वच लोक लढाऊ होते. याबद्दल "पील" कमिशनच्या साक्षींत लॉर्ड क्लाइडचें उत्तर विचार करण्यासारखें आहे. तो म्हणतो:–

"बिहार व दोआब प्रांतांतील सैन्यांत अलीकडे भरती केलेल्या शिख व
"पंजाबी लोकांची संख्या वगळल्यास सर्व सैनिक ब्राह्मण, रजपूत,
"अहीर वगैरे जातीचे लोक असत. प्रत्येक रेजिमेंटमध्यें असलेले
"१०० ते २०० मुसलमान वगळल्यास बहुसंख्या हिंदूंचीच असे."

१८५७ च्या बंडानंतर ज्यावेळीं पूर्वीची बंगाली आर्मी काढून टाकून त्याजागीं नवीन सैन्य उभारलें गेलें त्याबद्दल हळहळ वाटल्यानें लॉर्ड एलंबरो म्हणतो:—

"आपलें नाहींसें झालेलें हिंदी लष्कर यापुढें पूर्वीसारखें होईल ही आशा
"आतां करूं नये असें पाहिलें म्हणजे मनाला दुःख होतें. आपल्या सर-
"सेनापतीवर विश्वास व प्रेम करणारें तें पूर्वीचें सैन्य असें होतें कीं तें
"दार्दानेल्सवर सुद्धां विजय मिळवीत पुढें घुसलें असतें."

याशिवाय या सैन्यांत सर्व प्रकारचे लोक खांद्याशीं खांदा लावून लढत असल्यानें त्यांच्यांत परस्परांबद्दल व्यक्तिशः विश्वास व प्रेम असे. परंतु ही स्थिति १८५७ च्या नंतर उभारलेल्या वर्ग, वर्ण, व जातवारी सैन्यामुळें नाहींशी होऊन त्याजागीं वर्ण, वर्ग व जातिद्वेष, चढाओढ, मत्सर वगैरे गुणांच्या परिपोषाला प्रारंभ झाला, व त्यामुळें सैन्यांत उत्पन्न होणारी आत्मीयता व राष्ट्रीयवृत्ति यांचा पार लोप होत जाऊन ती जागा स्थानिक अभिमान व दुही यांनीं भरून निघाली. पूर्वीच्या सैन्यांत पुरभय्ये, शिख, मुसलमान, हिंदु, एकाच सैन्यांत सरसहा विखुरले असत, पण पीलकमिशननंतर प्रत्येक जमातीच्या कंपनी वेगळाल्या करून त्यांची वांटणी करण्यांत आल्यानें प्रत्येक जातीजातींत दुही, अभिमान व परस्परांविषयीं निष्कारण द्वेष वाढत गेला व एकत्र राहिल्यानें वाढणारें संघटण व आत्मीयता यांचा नाश झाला. बंडाच्या पूर्वीच्या सैन्यांत दिसून येणारा एकजिनसीपणा काढून त्याजागीं हिंदुस्थानी लोकांत भेद उत्पन्न करण्यांत आला हें

आपणांस अनेकांच्या लिखाणावरून कळून येतें. पंजाबचा कमिशनर व पुढें झालेला हिंदुस्थानचा व्हाइसरॉय सर जॉन लॉरेन्स ही दुही उत्पन्न करण्यासंबंधीं आपलें मत व्यक्त करतांना म्हणतोः-

" ज्या दोषांमुळें आपल्यावर मोठी आपत्ति आली व जे दोष अत्यंत " वाईट ठरले त्यांतील मुख्य दोष म्हणजे बंगाल आर्मीमध्यें असणारा " बंधुभाव व एकजिनसीपणा हा होय, व या दोषावर मुख्य उपाय म्हणजे " सैन्यांत समतोलपणा उत्पन्न करणें व तो प्रथमतः इंग्रज सैनिक वाढ- " वून व दुसरें वेगळाल्या जमाती एकमेकींविरुद्ध उभ्या करून. हे उपाय " दहा वर्षांपूर्वीच बंगाल आर्मीमध्यें सुरू केले असते तर बरें होतें. "

याचसंबंधांत मेजर जनरल मॅन्स्फील्ड म्हणतोः--

" ज्या पद्धतीनें बंडपूर्व सैन्यांत भरती करण्यांत येत होती तीमुळें पेशा- " वर ते कलकत्ता व हिमालयापासून नर्मदेपर्यंत सर्व सैन्यांत विश्वबंधु- " त्वाचा भाव वाढलेला होता. या नदीपलीकडे हा भाव गेला नव्हता " व त्यामुळें या गुणास बंडकालीं दक्षिणेकडील सैन्यांत थारा मिळाला " नाहीं. तथापि मुंबई सरकारच्या वेडेपणाच्या कलामुळें तिकडील " सैन्यांत पुरबिया व औंधकडील लोक ते दिसण्यांत साजरे असल्या- " मुळें अधिक घेतले जात व त्यामुळें मुंबईच्या सैन्यांतील लोकांत बंगाल " आर्मीतील विश्वबंधुत्व वाढत होतें. पण युद्धपूर्व कालांत त्याची प्रमा- " णबाह्य वाढ झाली नव्हती. " (*"Modern Review,"* July 1930)

बंडपूर्व हिंदी सैन्यांत दिसून येणारा बंधुभाव व आत्मीयता नाहींशी करावी व वर्णभेद कायम ठेवून परस्परांत चुरस वाढवावी व इंग्रजी सत्ता अबाधित राख- ण्यांत या दुहीचा फायदा कसा घेतां येईल इकडेच सर्व ब्रिटिश अधिकाऱ्यांचें लक्ष असे, व तसें धोरण ते आंखत असत. याबद्दल सर जॉन लॉरेन्स पील कामिशन पुढील साक्षींत म्हणतोः--

" स्थानवैशिष्ट्यामुळें एका जागच्या मुसलमानास दुसऱ्या ठिकाणच्या " मुसलमानाबद्दल वाटणारी भीति, अप्रीति, अथवा तुच्छता कायम " ठेवणें अत्यंत मौलिक असल्यानें यापुढें आर्मी कॉर्प्स प्रांतानिहाय " उभारावें व त्यांचें भौगोलिक वैशिष्ट्य यामुळें असणारे नैसर्गिक " भेदभाव व चढाओढ कायम ठेवतां येईल असें करावें. एकाच प्रांतां-

"तील हिंदु-मुसलमान एकाच रेजिमेंटमध्यें ठेवावे व त्यांत इतर कोठ-
"ल्याहि लोकांस वाव देऊं नये. अशा प्रकारें विशिष्ट प्रांतीय भेद अस-
"णाऱ्या रेजिमेंट्स उभारून त्या तशाच जरूरीच्या प्रसंगासाठीं कायम
"ठेवाव्या. यामुळें दोन विघ्नें टाळतां येतील, व तीं म्हणजे एकजिनसीपणा,
"राजकीय चळवळ व तदनुषंगिक कारस्थानें हीं होत." ("*Modern Review*," July 1930, p. 48)

सैन्यांतून विशिष्ट जाती वगळण्याचें व कांहींना मुद्दाम भरती करण्याचें धोरणहि ठरविण्यांत आलें याबद्दल अनेक पुरावे आहेत. पील कमिशन पुढील साक्षींत मेजर जनरल बर्च मिलिटरी सेक्रेटरी म्हणतो कीं,

"एखाद्या जातीचे अथवा वंशाचे लोक कांहीं अनिष्ट हेतूसाठीं एकत्र
"होण्याचा संभव असेल तर हा एकत्र संघटित होण्याचा कल रेजिमेंट-
"मध्यें एकाच वर्गाचे लोक ठेवल्यानें, त्यांतल्या एकजिनसीपणानें, वाढ-
"ण्याचा संभव अधिक आहे. एकाच जिल्ह्यांतील लोकांस एकाच
"रेजिमेंटमध्यें ठेवूं नये. मी ब्राह्मण अत्यल्प प्रमाणांत भरती करीन, तर
"मुसलमान, शीख व रजपूत लोकांची संख्या लष्करांत एक तृतीयांश
"प्रमाणांत करण्याचा प्रयत्न करीन."

याप्रमाणें अनेक उतारे पाहिल्यास हिंदी लोकांतील उच्चवर्णीयांना व मूळच्या लष्करी पेशा बाळगणाऱ्या लोकांना हळूंहळूं लष्करांतून कसें नेमकें व्यवस्थितपणें काढून टाकण्यांत आलें! शिक्षित व उच्चवर्णीय लोक लष्करांत राहिल्यास त्यांचा संसर्ग इतरांस होऊन सामान्य फौजी लोकांस जागतिक व भौगोलिक ज्ञान मिळणें सुलभ होईल व तसें झाल्यास इंग्रज अधिकाऱ्यांपेक्षां त्यांचें स्वदेशी अधिकाऱ्यांवरील प्रेम वाढेल तें न व्हावें म्हणून व सर्व शिपायांवर इंग्रज अधिकाऱ्यांचा वचक नीट राहावा यासाठीं सर्व अधिकार इंग्रजांचे हातीं ठेवावा या हेतूनें किंग्ज कमिशन्स फक्त इंग्रजांनाच देण्यांत येऊं लागलीं! व अशिक्षित सैनिकांमधून वाढत गेलेल्या हिंदी लोकांस व्हाइसरॉय कमिशन्स देऊं लागले. याचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला. बंडपूर्व कालीं ब्रिटिशांच्या हिंदी फौजेंत सुशिक्षित व उच्च कुलांतील लोकांस इंग्रजांच्या बरोबरीचे व कधीं कधीं वरच्या श्रेष्ठ दर्ज्याचे अधिकार देण्यांत येत, परंतु पुढें हें सर्व बंद पडलें, व शिक्षित व लष्करी पेशा राष्ट्रीय भावनेनें करणारे लढवय्ये लोकांस मज्जाव

करण्यांत आला, व मग साहजिकच हिंदी सुशिक्षित लोक लष्करांतून टिपल्याप्रमाणें कमी झाले ! पील कमिशननें सुचविलेल्या मार्गांतील मुख्य मुद्दे मागें सांगितलेंच आहेत. हिंदी सैन्यानें सदैव इंग्रज अधिकाऱ्यांच्या हाताखालीं व हुकमतींत काम करावें याबद्दल वेगळाल्या वेळीं हिंदी सैन्याच्या पुनर्घटनेंत दुरुस्त्या सुचविण्यांत इंग्रज अधिकाऱ्यांचें मत पाहिलें म्हणजे नीट लक्षांत येतें. ईडन कमिशनला जोडलेल्या विभागांत दिलेल्या मताचा सारांश असा:—

"हिंदुस्थानांतील वेगळाल्या इलाख्यांतील जिल्ह्यांतून भरती केलेल्या
"लोकांच्या वेगवेगळाल्या फौजा राखीव म्हणून ठेवण्यांत याव्या. याचे
"योगानें हिंद्वेतर देशांतून परचक्र आल्यास, अथवा नेटिव्ह स्टेट्समधील
"मोठाल्या फौजा उठल्यास, किंवा हिंदी फौजेंत बेदिली होऊन त्यांतील
"असंतोषानें विशिष्ट फौज उठल्यास ज्या प्रदेशांतील लोक उलटले अस-
"तील त्यांजवर त्यांच्याजवळच्या प्रदेशांतील किंवा दूरच्या शेतकीप्रधान
"प्रांतांतील लोकांचे राखीव सैन्याच्या तुकड्या पाठविल्यास कार्यभाग
"होईल. दक्षिणेकडील मराठे लोकांनीं पूर्वीं मर्दुमकी गाजविली व
"आजहि हिंदुथानांतील इतर भागांतील शूर लोकांच्या बरोबरीचे लढवय्ये
"लोकांत त्यांची गणना करण्यासारखे ते आहेत. या लोकांचा निःशस्त्री-
"करणकायद्यानें सर्व शक्तींचा निःपात होऊन त्यांच्यांतील लष्करी
"बाणाहि पूर्ण लयास गेला आहे. हें असलें तरी आजहि हे मराठे लोक
"गिरिकंदरांत राहणारे असून मोठे काटक आहेत, व त्यामुळें दऱ्याखोऱ्यां-
"तून व पर्वतांच्या घाटांतून चढउतारास कधीं मागें पडत नाहींत. या
"गुणांखेरीज शिपायांत अधिक गुण ते काय असतात !"

याप्रमाणें हिंदुस्थानांतील प्रादेशिक अभिमान जागा करून एकमेकांविरुद्ध इंग्रजी सत्तेस मदत व्हावी एतदर्थ प्रादेशिक लष्करें ठेवण्यांत येत, व त्यामुळें हिंदुस्थानांतील सर्व विभागांतील शिपायांस वेगळें ठेवण्यांत येई. यामुळें सर्व सैन्यांत हिंदवासी सैनिकांतहि स्वदेशप्रेमाचा लवलेशहि उत्पन्न होत नसे, मग त्यांच्यांतील राष्ट्रीय वृत्ति तर दूरच राहिली ! याचप्रमाणें हिंदी सैनिकांस शिक्षण अपुरें द्यावें, इंग्रज शिपायापेक्षां कमदर्ज्यांचीं शस्त्रें हिंदी सैनिकांस देण्यांत यावीं व विशिष्ट सैनिकविभागांत हिंदी लोकांस मुळीं घेऊंच नये—वगैरे बाबतींत विशिष्ट धोरण आंखलें जात असे.

"मागील वर्षांच्या अनुभवाचा फायदा घेण्यासाठी असें सुचविलें जातें का,
"यापुढें सबंध तोफखाना हिंदी लोकांच्या हातांतून काढून तो युरोपीयन
"गोलंदाजांकडेच सोंपवावा. जगतांतील इतर भागांपेक्षां तोफेची
"किंमत एशियामध्यें अधिक ठरेल. हिंदी लोकांस तोफांची फार भीति
"वाटते व म्हणून हिंदी गोलंदाजाला तोफा ह्या प्रेम व पूजा यांचा विषय
"होऊन बसतात. तोफांनीं युक्त असलेल्या लहानशा युरोपीयन फौजेचा
"प्रतिकार करणें अशक्य होईल व तोफा नसलेले हिंदी लोक सैन्यांत
"बंडच करूं शकणार नाहींत. यासाठीं पुष्कळसे (इंग्रजी लष्करी)
"अधिकारी हिंदी लोकांच्या हातीं तोफखाना ठेवण्याच्या विरुद्ध आहेत.
"परंतु व्यवहार्यतेच्या दृष्टीनें अगदीं या थराला जाण्याचें कारण नाहीं."
"("*Indian Defence Problem*" by Captain Modak p. 154.)
"सरहद्द व डोंगराळ प्रदेशांतील रेजिमेंट्समध्यें टू-ग्रूव्हड बंदुकी दिलेल्या
"असाव्या व त्या डोंगराळ मुलखांतील जातींच्या बंदुकीहून श्रेष्ठ
"दर्ज्याच्या असाव्यात, परंतु आपल्या खास युरोपीयन लष्कराच्या हातां-
"तील बंदुकांपेक्षां कमी दर्ज्याच्या असाव्यात... पंजाबच्या अन्तर्भागां-
"तील रेजिमेंट्समध्यें संगीनदार लाइट बेयोनेट्स पुरवाव्या." (कॅ. मोडक, पृ. १५४.)

"हिंदी लष्करांत अधिक हिंदी लोकच घ्यावे लागणार व म्हणून हिंदी
"फौज आपणांस सुरक्षित राहूं देईल अशी योजना करणें जरूर आहे."
(कॅ. मो. पृ. १५६)

" युरोपीयन सैन्यांत सुरू केलेल्या शास्त्रीय पद्धतींचें ज्ञान जसेंच्या तसेंच
"हिंदी सैनिकांस सर्वतोपरी शिकविणें योग्य होणार नाहीं. शास्त्रीय पद्धत व
"शिक्षण आपल्या (युरोपीय) राष्ट्रीय फौजेच्या हातीं आपलें वर्चस्व म्हणून
"ठेवण्यांत यावें." (कॅ मो. पृ. १५२–१५३.)

"इंग्रज सैनिकांस व हिंदी सैनिकांस परेडच्या प्रसंगाखेरीज होतां होईतों मिसळूं
"देऊं नये. खालच्या दर्ज्याच्या युरोपीय लोकांशीं अधिक दळणवळण
"राहिल्यास युरोपीयांबद्दल हिंदी लोकांत अनादर उत्पन्न होईल. सुशिक्षित
"इंग्रज लोक व इंग्रज अधिकारी यांजशीं हिंदी सैनिकांचा संबंध अधिक
"राहिल्यास हिंदी लोकांच्या मनांत आपल्या (युरोपीय) लोकांबद्दल
"विशेष आदर राहील. गव्हर्नर जनरलच्या मताप्रमाणेंच माझेंहि मत

" आहे कीं, बंगाली फौजेंतील हिंदी तोफखाना पूर्णतः काढून टाकावा व
" जेथें युरोपीयन लोकांस राहणेंच अशक्य आहे अशाच जागीं, तसेंच
" विशिष्ट सरहद्दीच्या ठाण्यावरच फक्त थोड्याशा तोफा हिंदी लोकांच्या
" हातीं ठेवाव्या. " ( कॅ. मोडक, पृ. १५२ )

हिंदी लोकांस धाकांत ठेवण्यासाठीं म्हणून हिंदी फौजेंतहि ब्रिटिश सैनिकांशिवाय इतर हिंदूेतर लोकांचा भरणाहि बराच करण्यांत येई याबद्दल नामदार गोखले यांनीं आपल्या १९०६ च्या अंदाजपत्रकावरील भाषणांत पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहे. नाम. गोखले म्हणतातः—

" फौजेंत सरहद्द प्रांताकडील माणसांचीच अधिकाधिक भरणी करण्यांत
" येते, म्हणजे हिंदूेतर लोकांचीच वाढ आहे व याचा परिणाम जवळ-
" जवळ फौजेची ठेवण दिवसेंदिवस भाडोत्री पद्धतीकडे झुकत आहे. "
( कॅ. मोडक पृ. २७० )

हिंदुस्थानचे एक वेळचे सर सेनापति लॉर्ड किचनेर यांनीं त्या वेळच्या गव्हर्नर जनरलला दिलेल्या सल्ल्यांत " सरहद्दीपलीकडील लोकांस भावी काळांत त्या प्रांतांत शांतता झाल्यावर मिलिशिया व लेव्हीमध्यें नोकरीचें आश्वासन द्यावें " असें म्हटलें आहे. ( कॅ. मोडक पृ. २७० ). १८९७ मध्यें हिंदुस्थान सरकारनें सरहद्द प्रांतांतील ड्यूरँड लाइन व हिंदुस्थानपलीकडील शासित भागांतील प्रदेशांत खड्या सैन्याऐवजीं त्याच भागांतील स्थानिक लोकांचें लष्कर उभारून सर्व ठाणीं त्यांच्या स्वाधीन करण्याचें ठरविलें. खैबर रायफल्सकडे खैबर देण्यांत आलें व कुरम आणि उत्तर व दक्षिण वझिरिस्थान प्रांत त्याच ठिकाणचे लोकांच्या स्थानिक सैन्याकडे देण्यांत आला. फक्त समाना व झोब दरींत मात्र स्थानिक फौजांना मदतगार म्हणून कांहीं खडें सैन्य ठेवण्यांत आलें. याचा परिणाम काय झाला त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें:—

" काळ जसजसा लोटत गेला तसतसें या स्थानिक सैन्यास आम्ही
" आपल्या सैन्याचा भाग म्हणून समजूं लागलों व १९१९ मध्यें अमा-
" नुल्लानें आपलें अफगाण सैन्य हिंदुस्थानांत उतरविलें असतां या
" स्थानिक सैन्यानें हवी ती मदत दिली नाहीं म्हणून आम्ही कुरकुरूं
" लागलों. युद्धकालीं इस्लामी चिथावणीमुळें सरहद्दीवरील जमातीची
" वृत्ति चंचल झाली व त्यांत अफगाणांच्या सैन्याच्या उठावणीची भर
" पडली व सरहद्दीचें स्थानिक सैन्यहि बिथरलें...हें पाहून लॉर्ड कर्झ-
" नचा थरकांप झाला ! " ( पा. २७१ )

" हे हिंद्वेतर लोक हिंदुस्थानांत शिक्षण घेऊन तयार झाल्यावर परत
" आपल्या देशांत गेले म्हणजे आमच्यावरच उलटतात व युद्धांत
" आमच्या विरुद्ध भाग घेतात. " ( कॅ मोडक, पान. २७ )

याबद्दल खुद्द लॉर्ड किचनेर म्हणतातः--

" आपण सरहद्दीकडील जमातींना लष्करी शिक्षण देऊन सैनिक बन-
"वितों व अल्पकाळ नोकरी केल्यानंतर त्यांस परत कांहीं वर्षें राखीव म्हणून
"खड्या फौजेंतील निवृत्त होणाऱ्या सैनिकाप्रमाणें न ठेवतां त्यांच्या स्वतंत्र
"देशांत परत जाऊं देतों. यामुळें त्यांच्यावर आपला कांहींहि हक्क राहत
"नाहीं. याप्रमाणें या जमातींत आपण लष्करी शिक्षणानें भरलेल्या
"लोकांचा असा एक जमाव तयार करतों कीं त्यांस एखादा कार्यकुशल
"व धडाडीचा पुढारी मिळाला असतां सरकार व जमाती यांमध्यें कांहीं
"तेढ उत्पन्न झाल्यास, किंवा त्यांचेवर नेहमीं वर्चस्व असणारे अफगाणचे
"अमीर व आपण (इंग्रज) यांत कांहीं विशिष्ट घासाघाशीचा प्रसंग उद्भ-
"वल्यास, हे लोक म्हणजे एक मोठाच पेंचप्रसंग पुढें उभा करतील. "
( कॅ. मोडक. पृ. २७१ )

यावरून हिंदी फौजेंत हिंदी लोकच कां पाहिजेत हें वाचकांच्या लक्षांत येईल. सरहद्दीपलीकडील वझीरी, बलुची, वगैरे लोकांस सैनिकशिक्षण दिल्यामुळें सरहद्दीच्या संरक्षणार्थ खर्चहि अधिक करावा लागतो. या लोकांना देण्यांत येणारा पैसा हिंदी लोकांवर खर्च केल्यास हिंदी फौजा अधिक कार्यक्षम होतील व हिंदी लोक अधिक सुसज्ज होतील. सरहद्दीपलीकडील जमातींना लष्करी शिक्षण न दिल्यास ते तितकी लष्करी गडबडहि कमी करतील व त्यांची सदैव भीति बाळगण्याचें कारण उरणार नाहीं. पण असें करावयाचें म्हटलें कीं हिंदुस्थानी लोकांविषयीं मनांतील दुराग्रह व शंका सोडली पाहिजे, मग हें व्हावें कसें ! जगतांतील एकंदर स्वतंत्र राष्ट्रांकडे पाहतां त्या त्या राष्ट्रांतील नागरिकांस लष्करांतील सर्व शाखांत शिरण्याची मोकळीक असते, व शिवाय प्रत्येक नागरिकास आत्मसंरक्षण करतां येण्यासाठीं शस्त्रशिक्षण घेण्याची व शस्त्रास्त्रें बाळगण्याची परवानगी असते. हिंदुस्थानांत मात्र याच्या उलट स्थिति आहे !

## अल्पकाल सेवापद्धति.

इंग्लंडच्या सैन्यांतील सैनिकांस लष्करांत भरती झाल्यावर सहासात वर्षें लष्करी

नोकरी केल्यानंतर सेवानिवृत्त करतात, व अशा प्रकारें सेवानिवृत्ति झालेले लोक आपापल्या गांवीं जाऊन, इतर व्यवसाय करून पोट भरत असतां त्यांस राखीव सैन्यांत ठेवण्यांत येतें, व त्यामुळें राष्ट्रांत फौजी शिक्षण घेऊन सेवानिवृत्त असे हजारों लोक प्रसंग पडल्यास राष्ट्राच्या कामीं पडूं शकतात, व त्यामुळें शांतताकाळीं खडें सैन्य ठेवण्याचें व त्यापायीं प्रचण्ड खर्च करण्याचें काम पडत नाहीं. अशा योगानें राष्ट्रीय तिजोरीत केवढी तरी बचत होते. वस्तुतः हीच पद्धति हिंदुस्थानांतहि प्रचलित असावयास पाहिजे. परंतु सर्वच इंग्रज अधिकारी या पद्धतीच्या विरुद्ध आहेत. याबद्दल ईडन कमिटी रिपोर्टांत म्हटलें आहे कीं,

> " ज्या पद्धतीनें ज्यास्तींत ज्यास्त माणसांस लष्करी शिक्षण देऊन नंतर "त्यांस जनसमूहामध्यें परत धाडून मधून लष्करी शिक्षण देत राहून त्यांस "फौजी कामांत कार्यक्षम ठेवतां येतें अशी पद्धति जी अल्पकाल सेवापद्धति "( Short Service System ) तिचा प्रारंभ फौजेंत करणें राजनीति-"दृष्ट्या समंजसपणाचें होणार नाहीं. अशा प्रकारचें हिंदी फौजी शिक्षणा-"लंकृत झालेले हजारो लोक राखीव ठेवून हिंदुस्थानांतील वेगळ्या प्रांतांत "ठेवण्यांत फार धोका असणें संभवनीय आहे. "

याचप्रमाणें " संस्थानांतील सैन्यांतहि अधिक भरती नसावी व ज्यास्त लोक लष्करी शिक्षण घेतलेले नसावेत" असें याच रिपोर्टांत नमूद करण्यांत आलें आहे. " या संस्थानी फौजा आपल्या ( इंग्रजांच्या ) मोठ्या भाडोत्री सैन्याचा एक भागच होतील व हा भाग विशिष्ट मर्यादेच्या बाहेर वाढविणें संरक्षकदृष्ट्या ठीक नाहीं. या फौजा आपल्या नेटिव्ह शिपायांना अथवा इतर संस्थानांच्या शिपायांना विरोधी राहूं शकणार नाहींत, इतकेंच नव्हे तर या फौजा ब्रिटिश गव्हर्नमेंट व क्वचित् प्रसंगीं ज्यांची सत्ता त्यांचेवर असेल त्या संस्थानिकांसुद्धां भीतीचें कारण होण्याचा संभव...त्या संस्थानिकांवर शक्य तें व सयुक्तिक वजन पाडून त्यांना वळवून आपल्या फौजा कमी करण्यास लावावें. "

या वरील सर्व उताऱ्यांवरून इंग्रज अधिकाऱ्यांचा हिंदी लोकांवरील अविश्वास पूर्णपणें व्यक्त होतो. फौजेंतील विशिष्ट विभागांत हिंदी लोकांस ठेवीत नसत व त्यामुळें आज ज्यांस पुढारलेलीं शस्त्रास्त्रें म्हणतात तीं सर्व फक्त इंग्रज अधिकारी व इंग्रज सैनिक यांच्याच हातांत आहेत ! आजच्या शस्त्रसुसज्जतेच्या जागतिक परिस्थितींत हिंदी लोकांस कसें मागें टाकण्यांत येत आहे व आलें हें ईरोप्लेन्स, टँक्स, मोटर ट्रुप्स, इंजिनिअर्स वगैरे शाखांकडे पाहतां सहज लक्षांत येण्यासारखें

आहे. हिंदी लोकांनीं लष्करी बाबतींत सदैव इंग्लंडच्या मदतीवरच अवलंबून रहावें या बुद्धीनें लष्करांत १९१७–१८ पर्यंत उच्च अधिकाराच्या लष्करी जागा हिंदी लोकांस मुळींच देण्यांत येत नसत, व युद्धोत्तर कालांतहि आजपावेतों जवळ जवळ सहा साडेसहा हजार किंग्ज कमिशनी अधिकाऱ्यांत अंदाजें फक्त १५० हिंदी अधिकारीच किंग्ज कमिशन घेतलेले होते, व तेहि सर्व शाखांतून नसून फक्त मेडिकल, व्हेटेरिनरी, पायदळ वगैरे भागांतूनच होते; या सर्व गोष्टींवरून हिंदुस्थानांत नागरिक सैन्य व राष्ट्रीय सैन्य न व्हावें याबद्दल सर्व ब्रिटिश अधिकाऱ्यांत एकवाक्यताच होती, व अजूनहि त्यांत फारसा फरक पडलेला नाहीं हें सहज लक्षांत येईल. पण या अदूरदर्शित्वानें व संशयपिशाच्चानें हिंदुस्थानचेंच नव्हे तर ब्रिटिश साम्राज्याचेंहि फार नुकसान आहे हें विचाराअन्ती सहज कळून येईल.

राष्ट्रसंरक्षणार्थ राष्ट्रांतील सर्व लोकांस लष्करी शिक्षण देणें अवश्य आहे व याप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांस तयार केल्यास या देशाकडे वांकडी नजर करण्याची छाती जगतांत कोणाचीहि होणार नाहीं. याबद्दल हिंदुस्थानी लोकांचा अभ्यासू इंग्रज मेरिडिथ टाऊनशेन्ड यानें आपल्या "एशिया अँड युरप" या ग्रंथांत एके ठिकाणीं म्हटलें आहे. तो लिहितो कीं, "आपल्या लोकांप्रमाणेंच शरीरानें धिप्पाड असून मरण्याची पर्वा न करणारे असे लढाऊ हिंदी पुरुष जवळ जवळ चार कोट तरी निघतील!" १९१७ च्या मेसापोटेमियन रिपोर्टांतील कर्नल वेजवुड यांचे नोट ऑफ डीसेन्टप्रमाणें हिंदुस्थानांत कमींत कमी ५ कोट लोक तरी लढाऊ आहेत. या पांच कोट लोकांमधून हिन्दी सैन्य राष्ट्रीय करावयाचें झाल्यास वाटेल तशी भरती करतां येईल. या संबंधांत मेरिडिथ टाऊनशेन्ड वरील पुस्तकांत म्हणतो:—"प्रशियनपद्धतीनें सक्तीची भरती केल्यास लॅन्डवेअर किंवा शांततेच्या काळीं बोलावलें जाणारें सर्व प्रकारचें सैन्य सोडून सुद्धां बराकीमध्यें २॥ कोट शिपाई सहज ठेवतां येऊन प्रतिवर्षी ८ लक्ष नवीन भरती करतां येईल, एवढें अवाढव्य मनुष्यबळ हिंदुस्थानांत आहे व या सैन्याच्या बळावर नुस्ता एशियाच नव्हे तर सबंध जगहि ताब्यांत ठेवतां येईल!" परंतु या गोष्टीकडे लक्ष न देतां हिंदुस्थानांत गोरें सैन्य कसें सतत ठेवतां येईल याच विवंचनेंत असणारे इंग्रज अधिकारी कांहींतरी शंका कुशंका काढून हिंदुस्थानाच्या लष्करी हिंदीकरणाच्या प्रश्नाला सारखी बगल देत आले आहेत. या विषयावर सायमनकमिशनचें म्हणणें होतें कीं, भविष्यकाळांतील बरींच वर्षें तरी हिंदी सैन्यांतून अनेक शाखोपशाखांतील ब्रिटिश सैनिक, ब्रिटिश रेजिमेंटल ऑफि-

सर्स व हायकमँडचे ब्रिटिश अधिकारी कमी करतां येणें शक्य नाहीं, कारण हिंदी संरक्षणाचा प्रश्न हा मुख्यतः साम्राज्याच्या रक्षणाचा प्रश्न होय ! हिंदी फौजेंत विशिष्ट भागांतील लोकच घेण्यांत येतात, त्याचें प्रमाणहि पाहण्यासारखें आहे. नेपाळांतील गुरखे लोकांच्या स्वतंत्र पलटणी असून पंजाबी मुसलमान, पठाण, शीख, रजपूत, गढवाली, जाठ, डोग्रा व मराठे इतक्या लोकांखेरीज इतर हिंदी लोक सैन्यांत घेण्यांत येत नाहीं, व घेतल्या जाणाऱ्या लोकांतसुद्धां कमीअधिक प्रमाण ठेवण्यांत येतें. हें पुढील कोष्टकावरून ध्यानांत येईल.

हिंदी फौजांत लढाऊ विभागांत दर्ज असलेले वेगळाल्या प्रांतांतील सैनिकांची संख्या ( सायमन रिपोर्ट व्हा. १ पा. ९६, मॉडर्न रिव्ह्यू, जुलै १९३० ).

| प्रांत | सैनिक संख्या |
|---|---|
| १ पंजाब | ८६००० |
| २ नेपाळ | १९००० |
| ३ संयुक्तप्रांत ( गढवाल व कुमाऊनसुद्धां ) | १६५०० |
| ४ राजपुताना | ७००० |
| ५ मुंबई | ७००० |
| ६ काश्मीर | ६५०० |
| ७ वायव्य सरहद्द | ५६०० |
| ८ मद्रास | ४००० |
| ९ ब्रह्मदेश | ३००० |
| १० हैद्राबाद | ७०० |
| ११ बलुचिस्थान | ३०० |
| १२ बहार व ओरिसा | ३०० |
| १३ मध्य हिंदुस्तान | २०० |
| १४ मध्यप्रांत | १०० |
| १५ म्हैसूर | १०० |
| १६ बंगाल | ८ |
| १७ आसाम | ० |
| १८ किरकोळ | १९०० |
| | १५८२०० |

याप्रमाणें वरील सैन्यांत पायदळांतील ८२ खड्या बॅटेलियन्समध्यें व १८ शिक्षण घेत असलेल्या बॅटेलियन्समध्यें, व २१ घोडदळ रेजिमेंट्समध्यें आणि २० गुरखा पायदळ बॅटेलियन्समधील सैनिकांचें प्रमाण पुढील कोष्टकांत दिलें आहेः--

| अनुक्रम | वर्ग | जिल्हा | पायदळ शेंकडा प्रमाण | | घोडदळ शें. प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| | | | गुरखे काढून शें. | गुरखे धरून शें. | |
| १ | पंजाबी मुसलमान | पंजाब | २७· | २२· ६ | १४·२८ |
| २ | गुरखा | नेपाळ | ... | १६. ४ | ... |
| ३ | शीख | पंजाब | १६·२४ | १३·५८ | २३·८१ |
| ४ | डोगरा | उत्तर पंजाब व काश्मीर | ११· ४ | ९·५४ | ९·५३ |
| ५ | जाठ | राजपुताना, यू. पी. व पंजाब | ९· ५ | ७·९४ | १९·०६ |
| ६ | पठाण | वायव्य सरहद्दप्रांत | ७·५७ | ६·३५ | ४·७६ |
| ७ | मराठा | कोंकण | ६·३४ | ५·३३ | ... |
| ८ | गऱ्हवाली | गऱ्हवाल | ४·५३ | ३·६३ | ... |
| ९ | यू. पी. रजपुत | यू. पी. | ३·०४ | २·५५ | ४·७६ |
| १० | राजपुताना राजपुत | राजपुताना | २· ८ | २·३५ | ४·७६ |
| ११ | कुमाओनी | कुमाओन | २·४४ | २·०५ | ... |
| १२ | गुजर्स | ईशान्य राजपुताना | १·५२ | १·२८ | ... |
| १३ | पंजाबी हिंदु | पंजाब | १·५२ | १·२८ | ... |
| १४ | अर्हर | पंजाब | १·२२ | १·०२४ | ... |
| १५ | मुसलमान रजपुत | दिल्लीचे आसपास | १·२२ | १·०२४ | ७·१४ |
| | —रंगार | | | | |
| | —कायम खानी | | ... | ... | ४·७६ |
| १६ | काचिन्स | ब्रह्मदेश | १·२२ | १·०२४ | ... |
| १७ | किन्स | ब्रह्मदेश | १·२२ | १·०२४ | ... |
| १८ | कारेन | ब्रह्मदेश | १·२२ | १·०२४ | ... |
| १९ | दक्षिणी मुसलमान | डेक्कन | ... | ... | ४·७६ |
| २० | हिंदुस्थानी मुसलमान | संयुक्तप्रांत मुख्यतः | ... | ... | २·३८ |
| | हिंदू आणि शिख | | ६०·५५ | ५०·५५४ | ६१·९२ |
| | गुरखे | | ... | १६·४ | ... |
| | मुसलमान | | ३५·७९ | २९·९७४ | ३८·०८ |
| | ब्रह्मी | | ३·६६ | ३·०७२ | ... |

१८५७ नंतर शिपायीभरतीचे प्रमाणांत हळुहळू बदल होऊन ठरविलेल्या धोरणानुसार विशिष्ट भागाकडील लोकांची संख्या वाढविली गेली, व पूर्वींच्या लढवय्ये लोकांस हळुहळू काट कसा देण्यांत आला हें पुढील कोष्टकावरून कळून येण्यासारखें आहे.

## एकंदर बेरजेंतील शेंकडा प्रमाणाचे आंकडे

| अनुक्रम | भौगोलिक विभाग | १८५६ | १८५८ | १८८३ | १८९३ | १९०५ | १९१९ | १९३० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत व काश्मीर | १० टक्यांपेक्षां कमी | ४७ | ४८ | ८३ | ४७ | ४६ | ५८.५ |
| २ | नेपाळ, गरवाल, कुमाऊन | १ टक्याहून कमी | ६ | २७ | २५ | १५ | १४.८ | २२ |
| ३ | उत्तर हिंदुस्थानांतील एक दोन बाबी वगळन | ९० टक्यांहून कमी नाहीं | ४७ | ३५ | २५ | २२ | २५.६ | २२ |
| ४ | दक्षिण हिंदुस्थान | लक्षांत न येण्याइतकें | ... | ... | ... | १८ | १२ | ५.५ |
| ५ | ब्रह्मदेश | ... | ... | ... | ... | ... | १.७ | ३ |

१८५७ पूर्व कालांत उत्तर हिंदुस्थानांतील लोकांचें प्रमाण सैन्यांत जवळजवळ ९० टक्के होतें तें १९३० सालीं फक्त २२ टक्के राहिलें व पंजाबी वायव्य सरहद्द प्रांत व काश्मीर प्रांतांतील भरतीची संख्या पूर्वी १० टक्यांहून कमी असतां आज तिचें प्रमाण ५८.०५ टक्यांवर गेलें हें कशाचें द्योतक आहे? ज्या हिंदी फौजेंत पूर्वी लढवय्ये लोक म्हणून सर्व प्रकारें योग्य असलेला माणूस जाती—उपजातीकडे न पाहतां घेण्यांत येई, पण आतां तिच्यांतच विशिष्ट जाती ( त्याच फक्त लढवय्या आहेत असें समजून ) मधीलच लोक फक्त पसंत करण्यांत येतात असें धोरण ठेवण्यांत आलें असून त्याविरुद्ध सेंट्रल ॲसेंब्लींत दरवर्षी वादविवादाचे वेळीं सरकारशीं खटके उडतच असतात. प्रथमत: जातीजातींत चुरस रहावी, व त्यांनीं एकत्र व एकदिल होऊं नये म्हणून एकजिनसी बॅटेलियन्स विशिष्ट भागांतील लोक घेऊन करण्यांत येत. परंतु लॉर्ड किचनेरच्या आमदानींत बॅटेलियन्समध्येंहि सर्व कंपनीचा एकजिनसीपणा काढून त्या ठिकाणीं

क्लास कंपनीज ठेवण्यांत येऊं लागल्या. उदाहरणार्थ, आजच्या हिंदी पायदळांत पहिल्या ११२ फ्रॉंटियर्स फोर्स रेजिमेंटमध्यें १ कंपनी पंजाबी मुसलमान, १ कंपनी डोग्रा, १ कंपनी पठाण ( खट्टक व आर्कझाइ ) व १ कंपनी शीख अशा वेगळाल्या जमातींची एकेक कंपनी मिळून रेजिमेंट उभारली जाते. याचप्रमाणें घोडदळांतहि पहिल्या स्किनर्स हॉर्सरेजिमेंटमध्यें एक द्वितीयांश स्काड्रन हिंदुस्थानी मुसलमान, तर एक द्वितीयांश स्काड्रन रजपूत ( रंगार ), एक स्काड्रन रजपूत ( संयुक्त प्रांत व पूर्व पंजाब ) व एक स्काड्रन जाठ असे आहेत. यानंतर सॅपर्स अँड मायनर्समध्यें किंग जार्जेस ओन बंगाल सॅपर्स अँड मायनर्समध्यें एक तृतीयांश शीख, एक तृतीयांश मुसमान ( यांत पठाण, पंजाबी मुसलमान व हिंदी मुसलमान येतात ), एक तृतीयांश हिंदुस्थानी हिंदु ( यांतील एक तृतीयांश भाग गऱ्हवाली रजपूत सोडून इतर गऱ्हवाली ) असें प्रमाण ठेवण्यांत आलें आहे. २० गुरखा बॅटेलियन्स, ५ मराठा बॅटेलियन्स, ३ शीख बॅटेलियन्स, ४ डोग्रा बॅटेलियन्स, ४ गऱ्हवाली बॅटेलियन्स, १ कुमाऊन बॅटेलि०, हजारा अफगाणांचें १ पायोनीअर कॉर्प्स व एक मद्रासी सॅपर्स अँड मायनर्सचें एक रेजिमेंट वगळल्यास बाकीचें पायदळ, घोडदळ, तोफखाना, सॅपर्स अँड मायनर्स, सिग्नल कॉर्प्स आणि पायोनीअर्स विभागांत क्लास युनिट्सच्या पद्धतीनें भरती करण्यांत येते. एखाद्या युनिटमधील शिपायास दुसऱ्या युनिटमध्यें आपली बदली करून घेतां येत नाहीं. कारण एका युनिटमध्यें एकाच जातीचे व वंशाचे लोक ठेवण्यांत येतात. या लष्करांतील युनिटसचें जातीय वर्गीकरणामुळें सैन्यांतील लोकांत एकजिनसी राष्ट्रीय वृत्ति निर्माण होणें शक्य नाहीं व लष्करांत आधुनिक इतर राष्ट्रांतील फौजांत ही वृत्ति वाढविलेली असल्यामुळें त्यांच्या अंगीं जो उत्साह असतो तो हिंदी सैनिकांत सद्यःपरिस्थितींत नसला तर त्यास कोणीच नांवें ठेवूं शकणार नाहीं. लढाईतील यशापयश शारीरिक गुणांपेक्षां मानसिक गुणावर अधिक अवलंबून असतें. शस्त्रास्त्रें, संख्या, मदतीचीं अनेक साधनें कितीहि असलीं, तथापि अंगीं लागणारें धैर्य व उत्साह नसेल तर इतर अनुकूलतेचा सैनिकास कांहींच उपयोग होणार नाहीं. सैनिकास प्रथमतः आत्मविश्वास असावयास पाहिजे, व त्यासाठीं त्याचे अंगीं धाडस, चिकाटी व राष्ट्रीय निश्चयाची जोड असेल तरच तो युद्धांत टिकूं शकेल. या प्रकारचा राष्ट्रीय निश्चय हिंदी सैन्यांत उत्तम प्रतीचा असावयास हिंदी शिपायास आपण हिंदी स्वतंत्र नागरिक आहोंत

ही जाणीव होणें अवश्य आहे. यासाठीं सैनिकाचे मनांत स्वदेशाविषयीं निस्सीम प्रेम व आपलेपणा पाहिजे. तरच तो मरण कस्पटासमान मानून लढूं शकेल. हिंदी लोक लढवय्ये नाहींत, निदान त्यांच्यांतील कांहीं भागांतील माणसें तरी लढाऊ नाहींत असें म्हणणें म्हणजे हिंदी लोकांचा अपमान होय! बुद्धिभेद झालेलीं माणसें आपल्या अंगीं इतरांच्या अपेक्षेनें न्यूनगंड (inferiority complex) आहे असें कबूल करून दुसऱ्याचें वर्चस्व कमी करतात. हिंदी लोकांस लष्करांतील उच्च अधिकारांतून फाटा मिळाल्यानें व ब्रिटिशांच्या लष्करी भरतीच्या ब्रिटिश धोरणामुळें लष्करी शिक्षण व पेशा बाबद्दल विशेषसी आपुलकी वाटेनाशी झाली यांत त्यांचा दोष कोणता? असा बुद्धिभेद उत्पन्न करून त्यांच्या ठायीं हा राष्ट्रविघातक न्यूनगंड उत्पन्न करण्यांत आला आहे. हिंदुस्थानच्या पूर्वीच्या इतिहासांत हैदरअल्लीच्या म्हैसुरी फौजांत काय पंजाबकडचेच किंवा फक्त आरबी किंवा मुसलमान शिपाईच होते? म्हैसूर प्रांतांत हैदरअल्लीनें उभारलेल्या फौजांतून त्याच प्रांतांतील लोक भरती झाले असले पाहिजेत, व त्यांनीं एकदां नव्हे, दोनदां नव्हे, तर हैदरच्या हयातीपर्यंत इंग्रजांच्या फौजांना दाद दिली नाहीं असें तेव्हांचा इतिहास सांगतो. लढाऊबाणा, शूरपणा, धीरता इत्यादि गुणांचा मक्ता ईश्वरानें कांहीं जगतांतील कांहीं विशिष्ट जमातींस किंवा राष्ट्रांस दिला आहे असें नसून हे गुण सर्वांस कमीअधिक प्रमाणानें वांटले गेले आहेत. गुणांचा परिपोष केला तर ते वाढीस लागतात, व त्यांचा ऱ्हास करावयाचें धोरणच आंखलें तर समाज त्या गुणांस पारखे होऊं लागतात. या दृष्टीनें हिंदुस्थानांतील सर्व लोकांस लष्करी शिक्षण दिल्यास ते स्वदेश, स्वराज्य व स्वातंत्र्य यांचें रक्षण तर करतीलच, परंतु जगतांत शांतता नांदावयासहि समर्थ होऊं शकतील. पण तें ध्येय सतत समोर ठेवून सरकारनें व पुढारी वर्गांनीं सामान्य जनतेच्या मनावर या विषयाचें महत्त्व बिंबविलें पाहिजे.



## भाग ४

# हिंदी सैन्यांतील ब्रिटिश विभागाचा फायदा कोणाला?



हिंदी सैन्यांतील एका विभागांत जवळ जवळ ६० हजार ब्रिटिश लोक व हिंदी विभागांतील बहुतेक सर्व अधिकारी ठेवण्यांत काय हेतु व या सर्वांचा होणारा खर्च किती, व त्या प्रमाणांत हिंदुस्थानचा खरोखरी इतका मोठा फायदा आहे काय? वगैरे प्रश्न आतां विचारांत घेणें जरूर आहे. यासंबंधीं विचारांत इंग्रज शिपाई हिंदी शिपायांहून खरोखरीच अधिक शूर व हुषार असतो कीं काय, व त्याचा खर्च व हिंदी शिपायाचा खर्च यांत इतकी तफावत कां हे प्रश्न विशेष महत्त्वाचे आहेत. एकंदर खर्चाकडे पाहतां या बाबतींत विशेष लक्षांत येण्यासारखी गोष्ट म्हणजे हिंदी फौजांत ठेवलेल्या ब्रिटिश सैनिक व अधिकारी यांना देण्यांत येणारा पगार, भत्ता, व रिक्रूटभरतीबद्दलच्या खर्चाशिवाय दोन बाबी अधिकीच्या विशेष आहेत, व त्या म्हणजे (१) नॉन-इफेक्टिव्ह चार्जेस व (२) कॅपिटेशन चार्जेस, या बाबी काय आहेत तें प्रथमतः पाहूं.

(१) कॅपिटेशन चार्जेसः—हिंदी फौजेंतून ठेविलेल्या प्रत्येक ब्रिटिश सैनिकाच्या नोकरीबद्दल हिंदुस्थान सरकार ब्रिटिश सरकारला विशिष्ट रकम प्रतिवर्षी देतें. ही रकम फार मोठी असते व त्याचा बोजा हिंदुस्थानावर विनाकारण पडतो. हें कॅपिटेशन चार्जेसचें बंड काय आहे तें पाहूं या.

हिंदुस्थानांतील ईस्ट इंडिया कंपनीनें चालविलेल्या मोहिमेंत वेगळाले प्रांत इंग्रजी सत्तेखालीं येत असतां पोर्तुगीज राजाकडून हुंड्यांत प्रिन्स ऑफ वेल्सला मिळालेला प्रादेशिक भाग म्हणजे मुंबई शहर १६८९ मध्यें राजाकडून ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यांत देण्यांत आलें. त्यावेळीं त्याचे रक्षणार्थ म्हणून ब्रिटिश फौजेचा लहानसा भाग हिंदुस्थानांत प्रथमतः पाठविण्यांत आला. यापुढें बरींच वर्षे या ब्रिटिश फौजेची विशेष वाढ करण्याचें कारण पडलें नाहीं, परंतु पुढें पुढें इंग्रज व फ्रेंच लोकांच्या चुरशीमुळें हिंदी संस्थानिकांच्या झगड्यांत या दोन राष्ट्रांच्या परस्परांशीं लढाया होऊं लागल्या तसतसें ईस्ट इंडिया कंपनीनें ब्रिटिश

राजसत्तेकडे फौजेची कुमक मागण्यास सुरुवात केली, व या इंग्लंडहून येणाऱ्या फौजेच्या खर्चासाठीं म्हणून ईस्ट इंडिया कंपनीला १७८१ पासून कांहीं विशिष्ट रकम ( एक रेजिमेंट मधील १००० लोकांसाठीं दोन लक्ष रुपये ! ) देण्याचा हुकूम झाला. या वेळेपर्यंत मात्र फौजेच्या प्रत्यक्षपणें होणाऱ्या खर्चापलीकडे कांहींही अधिक रकम ईस्ट इंडिया कंपनी ब्रिटिश राजास देत नसे. याचा अर्थ दिमतीसाठीं म्हणून पाठविलेल्या ब्रिटिश फौजेच्या मदतीचें भाडें म्हणून ही रकम आकारण्यांत येत असे. परंतु ही रकम हळुहळू वाढूं लागल्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीनें हा खर्च कमी आकारला जावा अशी विनंति केली. यावर पार्लमेंटनें कायदा करून यापुढें ब्रिटिश सोल्जरांमार्गें होणारे सर्व प्रत्यक्ष खर्च कंपनीनें सोसावे असें ठरविलें. परंतु हा प्रत्यक्ष खर्च हळुहळू वाढत जाऊन ह्यांत पगार व अलावन्स याबरोबर, भरती व वाहतुकीचा खर्च हेहि त्यांतच ढकलण्यांत आले. याप्रमाणें हळुहळू एकेक सदर वाढत जाऊन हा खर्च प्रमाणबाह्य वाढला याचा उल्लेख वेल्बी कमिशनमध्यें सांपडतो. याप्रमाणें कॅपिटेशन चार्ज किंवा डोईखर्च या सदरांत पुढील बाबी टाकण्यांत येतात.

( १ ) फौजेंतील प्रत्येक शाखेंत भरती होणारे रिक्रूटचा भरती व शिक्षणखर्च; यांत रिक्रूटला शिक्षण देणाऱ्या ऑफिसर्स व नॉन-कमिशन्ड ऑफिसर्सचा पगार, त्याचप्रमाणें भरती झाल्यावर मध्येंच सोडून जाणाऱ्या किंवा मरणाऱ्या इसमांचा पहिल्या वर्षांचा खर्च.

( २ ) रिकाम्या जागीं नेमलेल्या व हिंदुस्थानांत पाठवूं घातलेल्या तरुण नूतन अधिकाऱ्याचें वेतन, व रॉयल इंजिनिअर्समध्यें चॅथममध्यें दोन तीन वर्षे शिक्षण घेणाऱ्या इसमांचा खर्च.

( ३ ) व्हेटेरिनरी सर्जन्सच्या शिक्षणाचा खर्च.

( ४ ) इंडियन मेडिकल सर्व्हिसमध्यें परीक्षेस बसणाऱ्या इसमांच्या परीक्षेचा खर्च.

( ५ ) शिक्षणसंस्थांमध्यें—

रॉयल मिलिटरी अकॅडेमी, स्टाफ कॉलेज कॅंबर्ले, आर्मी मेडिकल स्कूल, स्कूल ऑफ गनरी, आर्टिलरी कॉलेज, स्कूल ऑफ एंजिनिअर्स वगैरे असून यांवर होणारा खर्च.

( ६ ) हिंदुस्थानी फौजेंत जाणाऱ्या इसमाचा पंचवीस दिवसांचा खर्च.

( ७ ) नेटले व वुलविचमध्यें आजारी पडलेल्या विद्यार्थ्यांचा खर्च व गॅस-पोर्टच्या डेपो एस्टॅब्लिशमेंट.

( ८ ) हिंदी फौजेंतून आजारी, सेवानिवृत्त झालेल्या व होणाऱ्या लोकांस परत इंग्लंडला पाठविण्याचा खर्च.

या सर्व खर्चांत प्रतिवर्षी वाढ होत गेली कशी तें पाहणें मनोरंजक व उद्बोधक आहे.

## १८६१ ते १९३२ पर्यंत कॅपिटेशन चार्जेस.

| वर्ष | साधारण ब्रिटिशसंख्या हजारांत | माणसागणिक आकार पौंड | एकूण रुपयांत खर्च | |
|---|---|---|---|---|
| | | | पौंडास १० रु. प्रमाणें | पौंडास रु. आ. १३–८ प्रमाणें |
| | | | कोटी रुपये | कोटी रुपये |
| १८६१–७० | ६४००० | १० पौंड | ६.४० | ८.५४ |
| १८७१–८२ | ६२००० | ” ” | ७.४४ | ९.४० |
| १८८३–८६ | ६१००० | ” ” | २.४४ | ३.२९ |
| १८८७–९० | ७२००० | ” ” | २.८८ | ३.८९ |
| १८९१–९५ | ७२००० | पौं. शि. ७ – १० | २.७० | ४.८६ |
| १८९६–१९०६ | ७३००० | पौं. शि. ११ – ४ | ८.९९ | १०.८४ |
| १९०७–२० | ७३००० | ” ” | ११.४५ | १२.८० |
| १९२१ | ७३००० | पौं. शि. २५ – १० | २.०८ | २.८० |
| १९२२–३२ | ६८००० | पौं. शि. २५ – १० | १९.०७ | २५.८५ |
| | | | ६३.४५ | ८२.२७ |

या कॅपिटेशन खर्चांमध्येंहि एकवाक्यता नाहीं. कधीं दरसाल दरमाणशीं ७ पौंड, तर कधीं १० पौंड, तर कधीं १२, १४, १८ याप्रमाणें अनेक वर्षी हा

खर्च बदलत आला असून फौजांमधील वेगळाल्या विभागांतील माणसांवरहि तो वेगवेगळ्या पद्धतीनें आकारला गेला हें पुढील कोष्टकावरून दिसेल. अलीकडे फौजेंतील नवी शाखा वैमानिकदल या दलांतील सैनिकांसाठीं पुढील वेगळे दर आकारण्यांत आले आहेत. ते असेः—

| वर्ष | वैमानिक दलांतील संख्या | वैमानिक दलाबद्दल इंग्लंडला दिलेली रक्कम | दरमाणशीं रुपये | पौंड = १० रु. | पौंड = १३ रु. ८ आ. |
|---|---|---|---|---|---|
| | | रुपये | | पौंड | पौंड |
| अ १९२८ | १९३३ | १३७५००० | ७११·३ | ७१·१२ | ५२·७ |
| अ १९२९ | २१७६ | १४४०००० | ६६१·७ | ६६·१७ | ४९ |
| च १९३० | २१९८ | १४१७००० | ६४४·७ | ६४·४७ | ४७·७ |
| च १९३१ | २२०९ | १४६७००९ | ६६४·१ | ६६·४१ | ४९·१ |

या खर्चासंबंधीं वेल्बी कमिशन रिपोर्टमध्यें सर चार्लस डिल्क म्हणतात कीं, हिंदुस्थानला कॅपिटेशन चार्ज, ब्रिटिश रिक्रूट शिपायाचा खर्च, सागरावरील प्रवास व प्रवासकालांतील पगार वगैरे बाबींबद्दल भरावा लागतो. ही भयंकर किंमत देणें हिंदुस्थानच्या नशिबीं येतें. या मोठ्या रकमेंतील थोड्याशा खर्चांत हिंदुस्थान सरकारला कानडा व युनायटेड किंग्डममध्यें आपलें रिक्रूटिंग ऑफिस सहज ठेवितां येईल, व याच्या मार्फतीनें वाटेल तितके शिपाई मिळवितां येतील. या खर्चाची माहिती देतांना दरवेळीं वेगळालीं विशेषणें लावण्यांत येतात, त्याबद्दल बूकॅनन साहेब म्हणतात कीं, "हिंदुस्थानकडून घेण्यांत येणारा खर्च बरोबर आहे हें सिद्ध करतांना ब्रिटिश सरकार व हिंदुस्थान यांच्या परस्परसंबंधाविषयीं वेगळाली तत्त्वप्रणाली पुढें ठेवण्यांत येते. कधीं हिंदुस्थानला स्वतंत्र म्हणून संबोधतात, तर कधीं कधीं कायदा व अंमल-

बजावणीमध्यें तो देश आपल्या अमलाखालचा म्हणून सांगण्यांत येतें. कधीं हिंदुस्थानला धंद्यांतील भागीदार म्हणून संबोधतात, तर कधीं लिमिटेड मार्केट मधील नाखुष गिऱ्हाईक म्हणून म्हणतात." (कॅ. मोडक, पृ. ३८८). ब्रिटिश साम्राज्यांतील इतर कोणत्याहि भागापासून न मागितला जाणारा पैसा हिंदुस्थानपासून घेण्यांत येतो असें हेच बुकॅनन साहेब आपल्या डिसेंटिंग मिनिटमध्यें लिहितात. "धन देतो तो अंमल गाजवितो" असा प्रघात सर्व देशांत असतो, व सर्व स्वतंत्र देशांतील तत्त्व "आधीं मागणी मग पुरवठा" ( demand before supply ) असें प्रतिपादन करण्यांत येतें, परंतु एवढी कटकटच नको म्हणून संरक्षण खर्चाची बाब व्हाइसरॉयची स्वतंत्र राखीव बाब म्हणून ठेवण्यांत येऊन या खर्चावर मत देण्याचा अधिकारच मुळीं हिंदुस्थानच्या मध्यवर्ती कायदेमंडळाकडे ठेवण्यांत आलेला नाहीं!

१८६० मध्यें ही दरमाणशीं होणाऱ्या खर्चाची रकम सात पौंड दहा शिलिंग प्रतिवर्षी घेण्याचें ठरविलें होतें. वेल्बी कमिशननें यांत कमीअधिक कांहीं केलें नाहीं. परंतु १९०७ च्या सेमर कमिटीनें हा दरमाणशीं खर्च पौंड ११-१-० असा वाढविला, म्हणजे दरवर्षी हा खर्च ३० लक्ष झाला! यांत महायुद्ध संपेपर्यंत वाढ झाली नाहीं, परंतु नंतर महर्घतेमुळें हा खर्च वाढत वाढत १९२० नंतर या खर्चाची रकम दरमाणशीं दरवर्षास २८ पौ. १० शि. ठरविण्यांत आली. हा खर्च अगदीं वाजवी आहे असें ब्रिटिश सरकार म्हणतें, पण हिंदुस्थान सरकारलाहि हें मान्य नाहीं. परंतु यांत बदल करावयाचा तर यावर इंग्लंडच्या डिफेन्स डिपार्टमेंटची मालकी, त्यांत हिंदुस्थान सरकारास तोंड घालण्याचा अधिकार नाहीं.

याचप्रमाणें इंग्लिश शिपाई व अधिकारी हिंदुस्थानांतील काम संपवून परत गेले तरी त्याबद्दलचा खर्च हिंदुस्थानास इतर तऱ्हेनें द्यावा लागतो त्यास नॉन इफेक्टिव्ह चार्जेस म्हणतात. यांत पुढीलप्रमाणें खर्च होतोः—

( १ ) सेवानिवृत्त ब्रिटिश सोल्जरांचें पेन्शन.

( २ ) नोकरीवर असतांना जखमी होऊन निकामी झालेल्या ऑफिसरांस पेन्शन.

( ३ ) सेवानिवृत्त झालेल्या ऑफिसरास पूर्णपगारी पेन्शन व सेवानिवृत्तीचा अलावन्स.

( ४ ) ऑफिसरांच्या विधवा स्त्रियांस पेन्शन व पितृहीन झालेल्या त्यांच्या मुलांस दया दाखविणारा अलावन्स.

वरील सर्व खर्च इंग्लंडचें सरकार ठरवील त्याप्रमाणें द्यावा लागतो, व त्यास हिंदुस्थान सरकारला मान तुकवावी लागते. यासंबंधांत हिं. स. नें १० ऑगस्ट १८८३ च्या एका पत्रांत असें म्हटलें आहे कीं हिंदुस्थान व इंग्लंड हे समाईक भागीदार आहेत असें म्हटलें जातें, व तें खरें धरून चाललें तर हिंदुस्थानला बरोबरीचा भागीदार म्हणून खर्चाच्या बाबतींत होणाऱ्या सुधारणांवर मत देतां आलें पाहिजे. परंतु या बाबतींत हिं. स. ला मुळींच मताचा अधिकार नाहीं. ब्रिटिश फौजेंत होणाऱ्या सुधारणांवरील विचारविनिमयांत हिं. स. चें मत केव्हांहि घेण्यांत आलें नाहीं, परंतु या सुधारणांमुळें वाढणाऱ्या खर्चाचा बोजा मात्र हिंदुस्थान सरकारच्या तिजोरीवर टाकण्यांत आला. ( *Indian Military Defence*, P. 58. )

याचप्रमाणें हिंदुस्थानांत ठेवण्यांत येणारा ब्रिटिश फौज साम्राज्यसंरक्षणार्थ असून तिच्यामुळें हिंदी सैन्याच्या कार्यक्षमतेंत मुळींच भर पडण्याचा संभव नसतांहि या साम्राज्यसंरक्षणार्थ ठेविलेल्या फौजेचा खर्च, त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या मर्यादेबाहेर पाठविण्यांत येणाऱ्या याच फौजेचा खर्च, शस्त्रास्त्रसुसज्जता व किल्ल्यांची डागडुजी यांवर होणारा खर्च, यांचा हिंदुस्थानच्या संरक्षणार्थ फारसा संबंध नसून पूर्वेकडील भागांत ब्रिटिश सत्ता कायम ठेवण्याशीं याचा संबंध येतो. याचें धोरण ठरविण्याचा हक्क मात्र हिंदुस्थानसरकारच्या हातीं नसून तो सर्वस्वीं साम्राज्य सरकारच्या हातीं आहे. सर्व गोष्टी पाहतां हिंदुस्थानांत साम्राज्यसंरक्षक फौज ठेवण्यासाठीं होणाऱ्या खर्चापैकीं न्याय व उदारबुद्धि ठेवूनच रास्त खर्च हिंदुस्थान सरकारकडून घेण्यांत यावा असें हिं. स. नें आपल्या ५ मार्च १८८८ च्या डिसपॅचमध्यें म्हटलें आहे.

याप्रमाणें हिं. स., वेल्बी कमिशन, मायनॉरिटी रिपोर्ट, नाम. गोखले यांची वेल्बी कमिशनपुढील साक्ष, सर शिवस्वामी ऐयर यांचें इंडियन कॉन्स्टिट्यूशनल प्रॉब्लेम्स व इतर अनेक हिंदी पुढारी व कांहीं इंग्लिश लिबरल व लेबर पुढाऱ्यांच्या

लिखाणावरून फौजी खर्च हिंदुस्थानला किती जड होतो हें सहज लक्षांत येईल. असें असूनहि हा खर्च खरोखरीच हिंदुस्थानच्या हिताचा असल्यासहि हरकत नाहीं असें म्हणतां आलें असतें. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. हिंदुस्थानांत पाठविल्या जाणाऱ्या ब्रिटिश सोल्जराचा रिक्रूटभरतीपासून, शिक्षण, प्रवास, अल्पकाळ नोकरी, सेवानिवृत्ति, पेन्शन व इतर अलावन्स वगैरे धरून होणारा सर्व खर्च हिंदुस्थानच्या तिजोरीमधून होतो, परंतु या इंग्रज शिपायांचा खरा फायदा राखीव शिपाई या नात्यानें अखेर इंग्लंडलाच मिळतो. इंग्लंडांत मुबलक जमीन नाहीं, व हिंदुस्थानांत जमिनीचें अफाट क्षेत्र पसरलें आहे. म्हणून हिंदुस्थानांत येणाऱ्या नवशिक्या इंग्रज शिपायास सैनिक शिक्षण पांचसहा वर्षें हिंदुस्थानच्या प्रशस्त भूमीवर मिळून तयार होणारा अनुभवी शिपाई हा नोकरीच्या शेवटीं परत इंग्लंडला जातो, व येथें त्याची इंग्लडच्या राखीव सैन्यांत भरती होते. हिंदुस्थानांत त्याच्या जागीं पुनः नवशिक्या इंग्रज सैनिक दर पांच सहा वर्षांनीं येतो. याचा सगळा खर्च हिंदुस्थानाचा, पण अखेर फायदा इंग्लंडचा ! खासा न्याय आहे कीं नाहीं ! यासंबंधानें मेजर ग्रॅहॅम पोल आपल्या "*I refer to India*" या मध्यें म्हणतो कीं " जरी मनमोकळेपणानें या गोष्टीची कबूली दिली जात नाहीं तरी ही गोष्ट खरी कीं ब्रिटिश फौजेची मुख्य शिक्षणाची जागा हिंदभूमि होय. ही हिंदी ब्रिटिश फौज सदैव सुसज्ज स्थितीतच ठेवण्यांत येते. " ( मोडक, पा. ८६ )

हिंदुस्थानांतील हिंदी खर्चावर पोसल्या जाणाऱ्या ब्रिटिश फौजेपासून खरा फायदा इंग्लंडचा कसा होतो व त्यासाठीं काय काय तत्त्वमालिका पुढें ठेवण्यांत येते याचा थोडासा विचार करावयास पाहिजे. सर जॉइनसन हिक्स, इंग्लंडचा माजी होम सेक्रेटरी, एका प्रसंगीं म्हणतो कीं, " हिंदुस्थानच्या फायद्याकरितां आम्ही हिंदुस्थान जिंकला नाहीं, तर ग्रेट ब्रिटनच्या तयार मालाला मोकळें द्वार म्हणून तो देश जिंकला. " याचाच आधार घेऊन मेजर ग्रॅहॅम पोल आपल्या पुस्तकांत लिहितो कीं, " हिंदुस्थानच्या लाखों मूकजनांचे आम्ही ट्रस्टी आहोंत असें म्हणणें खास प्रामाणिकपणाचें नाहीं. हिंदुस्थानची प्रजा मुळींच मुकी राहिली नसून आम्हीं हिंदुस्थानावर जो आमचा पगडा ठेविला आहे तो फक्त साम्राज्य व इंग्लंडचें हित एवढ्याकरितांच आहे. " ( मोडक, पा. ८३ ) हाच ग्रंथकार पुनः म्हणतो कीं, पूर्ण हिंदी फौज फारच कमी खर्चात उभारतां येईल.

खरी गोष्ट ही आहे कीं आपल्या पथकांना उत्तम लष्करी शिक्षण हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश फौजेमुळें मिळतें व ब्रिटिश फौज हिंदुस्थानांतून काढून टाकल्यास या फौजेवर होणारा खर्च आज जो हिंदुस्थान सोशीत आहे तो उद्यां ब्रिटिश प्रजेवर बसेल, व असें न केलें तर ब्रिटिश फौज कमी तरी करावी लागेल. ( मोडक, पा. ८३.) यासंबंधांत जनरल मॉरिसहि हेंच म्हणतो कीं, "ब्रिटिश फौज सुसज्ज, जय्यत व युद्धक्षम राहाण्यासाठीं इंग्लंडला माणसाबरोबर विपुल भूभागाचीहि आवश्यकता आहे, व ही मोठी खर्चाची बाब आहे. फौजेचें उत्तम शिक्षण व हालचाली करण्यासाठीं मुबलक मोकळी सपाट जमीन पाहिजे; अशा जागींच शिक्षण होतें, व त्यामुळें फौजेचे सर्व भाग एकत्र होऊन त्यांचें कार्य चालू राहील व त्यावर आपलें युद्धसामर्थ्य अवलंबून राहील." इंग्लंडला आपली सत्ता एशियांत पूर्णपणें प्रस्थापित करतां यावी म्हणून, प्रथमतः, व नंतर साम्राज्याचे सर्व मार्ग, वसाहती यांचें संरक्षण करण्यासाठीं म्हणून, मध्यवर्ति जागेवर कोठें-तरी ब्रिटिश फौज ठेवणें अवश्यच होतें. हिंदुस्थान हाच एक असा दुबळा देश दिसला कीं तेथें आपल्या खिशांतून फारसा खर्च न होतां हिंदुस्थानच्या तिजोरीवर ही फौज पोसतां यावी. आजपर्यंत हा खर्च वाढत्या प्रमाणांत हिंदुस्थानकडून करविण्यांत आला. याबद्दल सेंट्रल ॲसेंब्लींत व पूर्वीच्या कलकत्ता व सिमला येथील इंपीरियल कौन्सिलांत वादविवाद झाले. त्यांत बरीच मनोरंजक माहिती मिळते. यासंबंधांत अनेक प्रसंगीं खडाजंगीचें वाग्युद्ध झालें. लॉर्ड कर्झन यांच्या मतेंही हिंदी ब्रिटिश फौज फारच उपकारक आहे. हिंदी ब्रिटिश फौजेकडे तीन महत्त्वाचीं कामें येतात तीं म्हणजे ( १ ) हिंदुस्थानांत शांतता राखणें ( २ ) हिंदी सरहद्दप्रांतांचें संरक्षण करणें व ( ३ ) जगतांत कोठेंहि साम्राज्यहितसंरक्षणार्थ म्हणून तयार असलेली फौज म्हणून. लॉर्ड बर्कनहेड, माजी भारतमंत्री म्हणतात कीं, "हिंदुस्थानची बाजारपेठ हातची गेल्यास लँकेशायरचें नशीब फुटलेंच म्हणावयाचें ! ग्रेट ब्रिटनमधील सर्व औद्योगिक केंद्रांस व्यापारी फायदा मिळतो व व्यापारास हिंदुस्थानचें द्वार खुलें असतें. आपल्या साम्राज्यघटनेंत हिंदुस्थान हा फार महत्त्वाचा भाग आहे." हा भाग व्यापारासाठीं सदैव मोकळा ठेविला पाहिजे व व्यापाराच्या संरक्षणार्थ अर्थात्च ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत पाहिजेच असा हा परस्पर संबंधाचा कोटिक्रम आहे.

हिंदुस्थानचें संरक्षण हिंदी लोक करूं शकणार नाहींत हें म्हणणें सत्यास धरून होणार नाहीं. साम्राज्याच्या मदतीसाठीं हिंदी शिपायांनीं आजपर्यंत ब्रिटिश फौजेला अनेक वेळां कुमक करून आपलें युद्धकौशल्य व कार्यक्षमता दाखविली आहे. मेसापोटेमिया, इजिप्त, फ्रान्स, अरबस्तान वगैरे हिंदुस्थानापासून हजारों मैल लांबीचा प्रवास करून युद्धप्रसंगीं घरदार सोडून सर्व सुखसोयींचा त्याग करून लढत केली, ते हिंदी लोक हिंदुस्थानचें संरक्षण करूं शकणार नाहींत असें म्हणणें कृतघ्नपणाचें नसलें तरी खास सयुक्तिक तर नाहींच नाहीं. परंतु ज्या ब्रिटिश शिपायाची इतकी महती सांगण्यांत येते तो खरोखरीच हिंदुस्थानच्या संरक्षणास अवश्यच आहे कीं काय हें पाहूं.

हिंदुस्थानवर परचक्र यावयाचें झाल्यास तें वायव्य सरहद्दीवरूनच येणार असें मत दिल्यामुळें लॉर्ड किचनेर यांनीं लढाईच्या तोंडाशीं उभें राहण्यासाठीं म्हणून (Covering troops) बराचसा फौजी भाग पंजाबकडे ठेविला. इंग्रज शिपायांशिवाय सरहद्दीचें संरक्षण अशक्य आहे असें सायमन कमिशन व डिफेन्स सब-कमिटीचें म्हणणें होतें. यावरून आपण असें समजावयास पाहिजे कीं सरहद्द प्रांतावरील मोहिमेंत युद्धार्थ पाठविलेल्या सैन्यांत इंग्रज शिपाई अधिक असतील, पण वस्तुस्थिति तशी नसून या मोहिमेंत हिंदी शिपायांचाच भरणा अधिकीचा होता असें दिसतें. १८५१ ते १८९०–९१ यामधील कालांत एकूण जवळ जवळ वीस मोहिमा झाल्या. त्यांचीं नांवें व काळ येणेंप्रमाणें आहे––

सरहद्दीकडील मोहिमाः––(१) मोहमंड्स १८५१–५२; (२) रनिझासिस १८५२; (३) वझीरी १८५२: (४) शिराणी १८५३; (५) ओरकझाई १८५५; (६) मिरकझाई व कुसम १८५३–५७; (७) डेरागाझीखान १८५३–५७; (८) वझीरी १८६०; (९) वझीरी १८६०; (१०) ब्लॅक मौंट्स एक्स्पिडिशन १८६८; (११) ओरकझाई १८६८; (१२) दावर १८७२; (१३) जोवाकी एक्सपिडिशन १८७७–७८; (१४) १८८०; (१५) महसूद १८८१; (१६) थोच व्हॅली १८९०–९१ (१७) मिरनझाई पहिली १८९१; (१८) मिरनझाई दुसरी १८९१; (१९) महसूद १८९४-९५; (२०) महसूद ब्लॉकेड १९००-०२

वरील २० मोहिमांमधील क्रमवारी मोहिमांत हिंदी व ब्रिटिश शिपायांचें शेंकडा प्रमाण काय होतें तें सरासरी पुढील कोष्टकांत दिलें आहे.

| मोहिमांची संख्या | हिंदी शिपाई शेंकडा प्रमाण | ब्रिटिश शिपाई शेंकडा प्रमाण | ब्रिटिश + हिंदी बरोबरी सरासरी |
|---|---|---|---|
| ३ | ८४ | १६ | १ : ६ |
| २ | ८५ | १५ | १ : ६.७ |
| २ | ८८ | १२ | १ : ८.३ |
| १ | ९० | १० | १ : १० |
| १ | ९२ | ८ | १ : १२ |
| १ | ९४ | ६ | १ : १६.८ |
| २ | ९५ | ५ | १ : २० |
| २ | ९६ | ४ | १ : २५ |
| २ | ९८ | २ | १ : ५० |
| ४ | १०० | ० | ० : १०० |

वरील आंकडे कॅप्टन मोडकांनीं लिहिलेल्या "इंडियन डिफेन्स प्रॉब्लेम्स" या पुस्तकांतील पान १९०–१९१ वर सांपडतील. या आंकड्याकडे नजर देतां प्रथम प्रथम सरहद्द मोहिमांतून थोडे तरी इंग्रज शिपाई कामीं येत, परंतु हळुहळू त्यांची जागा हिंदी शिपायांनींच भरून काढलेली दिसते व या सर्व मोहिमांत हिंदी सैन्याची यशस्वी मोहीम झाली ती कोणाच्या जोरावर ? हिंदुस्थानी फौजेंत ब्रिटिश व हिंदी सोल्जरचें प्रमाण कांहीं जागीं एकाला दोन, तर कांहीं जागीं एकाला तीन असें ठेवण्यांत आलें आहे व या ब्रिटिश शिपायांची सरहद्दसंरक्षणार्थ अत्यंत जरूर आहे असें म्हणत असतां या मोहिमांतून त्यांना फारसा प्रवेश नाहीं व ज्या थोड्याशा लोकांना प्रवेश दिला त्यांची वर्णी राखीव म्हणून ठेवण्यांत आली व प्रत्यक्ष गोळीबाराच्या तोंडाशीं हिंदी फौजच देण्यांत आली. यावरून परचक्रनिवारणार्थ इंग्रज शिपाईच अधिक उपयोगी हें म्हणण्यांत काय अर्थ आहे ! यानंतर साम्राज्यसंरक्षणार्थ या ब्रिटिश फौजेची अवश्यकता आहे असें म्हणत असतां हिंदुस्थानाबाहेर युद्धार्थ पाठविलेल्या सैन्यांत बरेंच हिंदी सैन्यहि पाठविलें गेलें व या हिंदी लोकांनीं बहादुरी गाजविली असें सर्व इंग्रज लोक मुक्तकंठानें गातात.

युद्धांत तोफखान्याचा फार मोठा उपयोग आहे व तो भाग हिंदी फौजेंत मुख्यत्वें ब्रिटिश शिपायांकडेच सोंपविला आहे, पण सरहद्द प्रांतांतील डोंगराळ मुल-

खांत व सिंध-बलुचिस्तानकडील उष्ण प्रदेशांत मात्र लहान पल्ल्याच्या तोफा व मौंटन बॅटरीज् मात्र हिंदी सैनिकांकडे दिल्या व याचें कारण या प्रांतांतील डोंगराळ व उष्ण हवेंत इंग्रज शिपाई टिकूं शकत नाहीं. इंग्रज सरकारच्या जगतांतल्या सर्व युद्धप्रसंगीं गेल्या ५०–६० वर्षें हिंदी सैनिकांनीं ब्रिटिश शिपायांस मदत करून मर्दुमकी गाजविली. सुदान, ॲबिसीनिया, ईजिप्त, जावा, मसाओ, मॅनिल्ला, चीन, स्ट्रेट्स सेटलमेंट वगैरे प्रदेशांत व गेल्या महायुद्धांत फ्रान्स, डार्डनेल्स, ईजिप्त, मेसापोटेमिया, इराक, दक्षिण आफ्रिका या प्रदेशांत युद्धांत खांद्याशीं खांदा लावून ब्रिटिश शिपायांबरोबर हिंदी शिपाई लढला, इतकेंच नव्हे तर पाश्चिमात्य सैनिकांस ज्या देशाची माहिती होती त्या देशांत तरी ते लढत होते. पण हिंदी शिपाई मात्र अननुभूत व स्वदेशाहून फार दूर व भलत्याच लोकांचे रक्षणार्थ खडतर प्रसंग व कष्टमय स्थितींत लढला. या संबंधांत लॉर्ड कर्झन यांनीं हिंदी शिपायांच्या शौर्याची मुक्तकंठानें स्तुति केली आहे. लॉर्ड कर्झन म्हणतात—' हिंदुस्थानखेरीज आपल्याला केप कॉलनी घेतां आली नसती, व दक्षिण ऑफ्रिकेंतील वसाहतींची वाढहि करतां आली नसती. हिंदुस्थान आमच्या अमलाखालीं नसता तर नेपोलियनला सेंट हेलेनामध्यें ठेवतां आलें नसतें, मॉरिशस घेतां आलें नसतें, मेसापोटेमियामध्यें वर्चस्व ठेवणें अशक्य झालें असतें व इराणचे आखातावर प्रभुत्व ठेवतां आलें नसतें. " या सगळ्याचा अर्थ हिंदी शिपायांची मदत म्हणजे इंग्रजांच्या यशोविस्ताराचा पाया होय. पण हें सर्व कबूल करूनहि पुनः हिंदुस्थानचे संरक्षणार्थ ६० हजार ब्रिटिश फौज हवी हें इंग्रज सरकारचें तुणतुणें सुरूच असतें ! याप्रमाणें परचक्रनिवारण व साम्राज्यसंरक्षण या बाबींसाठीं ब्रिटिश शिपायांची मुळींच अवश्यकता नाहीं. साम्राज्य, साम्राज्य म्हणतात तें तरी आहे काय ? साम्राज्य म्हणजे इंग्रजांची हिंदुस्थानवरील सत्ता याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. यासंबंधीं मेरिडिथ टौनशेंड यानें आपल्या " एशिया अँड यूरप " या पुस्तकांत म्हटलें आहे कीं, साम्राज्य म्हणजे, कांहीं परीक्षा पास होऊन घेतलेले व कांहीं निवडून घेतलेले व ज्यांस राज्य करण्यासाठीं दिलें आहे असे जवळ जवळ १५०० लोकांचें एक कार्पोरेशन होय ! हें गोऱ्या लोकांचें मंडळ ६५ हजार शुभ्र शिपायांच्या फौजेला पगार मिळवून देऊन स्वतःचें रक्षण करून घेतें व याचें नांव हिंदी साम्राज्य होय ! साम्राज्य म्हणतात तें याशिवाय वेगळें कांहीं नाहीं. या १५०० लोकांना काढून

टाका व तांबड्या पोषाकी लहानशा शुभ्र सैन्यास हरवा कीं साम्राज्य संपुष्टांत आलेंच, त्याचें बांधकाम ढासळलेंच ! एवढें होतांच ह्या जागीं सावळा हिंदुस्थान, न बदललेला व न बदलणारा असा पुनः दृग्गोचर होऊं लागतो ! याचा अर्थ हाच कीं ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्ता सदैव अधिष्ठित ठेवण्याकरितांच आहे. या हेतूच्या सिद्ध्यर्थ एक ना अनेक कारणें पुढें करण्यांत येतात. ब्रिटिश हित-रक्षणार्थ या फौजेचा उपयोग असून तिचा हिंदुस्थानच्या हिताशीं यत्किंचितहि संबंध नाहीं. शिवाय राष्ट्रसंरक्षणाचा प्रश्न निघाला कीं राष्ट्रांतील लोक म्हणजे ज्यांचा विशिष्ट देशाचा नागरिक या नात्यानें संबंध येतो, ज्यांची मालमत्ता, जननमरण, संस्कृति हीं एखाद्या विशिष्ट देशांत असतात ते. या दृष्टीनें पाहतां हिंदुस्थानचें संरक्षण हिंदी लोकांनीं करावयाचें कीं बाहेरच्या लोकांनीं करावयाचें ? कोण-त्याहि देशाचें लष्करी धोरण केव्हांहि त्या देशाचे संरक्षणाचे विचारानेंच ठरविलें पाहिजे. देशाचें संरक्षण ज्या ज्या तऱ्हेनें होईल त्या सर्वांचा समावेश एकजागीं करून त्यांच्यासाठीं विशिष्ट धोरण ठरविणें यांत पैसा, माणुसपुरवठा व शस्त्रसामुग्री या सर्वांचा विचार व्हावयास पाहिजे. प्रत्येक राष्ट्राला वरील सर्व बाबतींत स्वावलंबी राहणेंच इष्ट आहे, कारण कोणतेंहि राष्ट्रसरकार दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रसरकाराविषयीं साशंकच राहणार. फ्रेंच ग्रंथकार जॉर याच्या मतें तर प्रत्येक राष्ट्रास आपल्या संरक्षणार्थ नागरिक सैन्य उभारलेंच पाहिजे. डिफेन्स म्हणजे संरक्षण व संरक्षण म्हणजे तरी काय ? आपल्यावर आक्रमण करणारा विरुद्ध लढून त्याला जिंकून माघार घ्यावयास लावणें याचें नांव स्वसंरक्षण. मग हें काम त्याच राष्ट्रांतील नागरिक करतील कीं पैशाकरतां नोकरी करणारे परदेशचे भाडोत्री लोक करतील ? परदेशस्थ माणूस फार झालें तर पगारापुरतें काम करील व तेंहि जीव संभाळून; त्याला खास नागरिकाचा जिव्हाळा कसा असणार ? यावरून हिंदुस्थानचे संरक्षणार्थ ब्रिटिश फौजेची अगदीं अवश्यकता आहेच असें म्हणतां येत नाहीं.

यानंतर राहिलें अन्तःसंरक्षण. हिंदुस्थानांत अनेक जातिभेद व अन्तस्थ कलह असल्यामुळें हिंदी फौजेपेक्षां केव्हांहि हिंदी लोकांचा ब्रिटिश शिपायांवरच अधिक विश्वास बसेल असेंहि मत प्रतिपादन करण्यांत येतें.

देशांत शांतता रहावी व कायद्याचें रक्षण व्हावें म्हणून पोलिस खातें ठेव-ण्यांत येतें, व यांचे वर्तनें कोणत्याहि देशाचें अन्तःस्वास्थ्य रक्षण केलें जात

असतें. मग हिंदुस्थानांतच असें काय संकट आहे कीं ज्यासाठीं ब्रिटिश फौजेची या बाबतींत अवश्ययकता भासावी ? हिंदुस्थानांत साधारणतः २ लक्ष २२ ह. पोलिसची फौज आहे असें धरावयास हरकत नाही, व त्यावर साधारणतः १२ कोटी ३८ लक्ष रुपयांचा खर्च होतो असें दिसतें. ( कॅ. मोडक यांचें इंडियन डिफेन्स, पान ६३ ). पोलिस खात्यांतहि दोन विभाग आहेत, सिव्हिल व मिलिटरी. या खात्यांत अधिकारी व इतर आणि त्यांत शिवाय हिंदी व ब्रिटिश हे भेद आहेतच. त्यांची संख्या साधारणतः पुढीलप्रमाणें आहेः—

| | इन्स्पेक्टर जनरल आणि डी. आय. जी. | डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडंट | १ इन्स्पेक्टर्स २ सब इन्स्पेक्टर्स ३ सार्जंट्स | मिलिटरी पोलीस | पोलीस स्वार | कॉन्स्टेबल्स | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सिव्हिल | ६२ | १०८७ | १३७४५ | २४९०३ | २२५६ | १५६२१२ | १९८१६५ |
| मिलिटरी | २२ | ६८ | ७१२ | २२३६ | ३३३४ | २०९७८ | २४०१६ |
| एकूण | ८४ | ११५५ | १४४५७ | २७१३९ | ५५९० | १७७१९० | २२२१८१ |

वरील कोष्टकांतील २ व ३ कॉलमांत बहुतेक ब्रिटिश लोकच असून थोडेफार डी. एस. पी. हिंदी असतीलहि. याचप्रमाणें मिलिटरी व स्वार पोलिसांतहि बरेच इंग्रज आहेत. हें सर्व असूनहि शिवाय अन्तःस्वास्थ्यासाठीं वर ब्रिटिश फौजहि पाहिजेच म्हणे ! ती कशाला ? दंगेधोपे मोठ्या प्रमाणांत झाल्यास फौजीबलाची अवश्यकता मधून मधून लागतेच, पण त्यांतहि स्वास्थ्यसंरक्षणार्थ म्हणून जी फौज ठेविली जाते त्यांतहि सैनिक हिंदी व इंग्रज यांचें प्रमाण १ हिंदी बरोबर १·२४ ब्रिटिश असें असतेंच. ( शिवस्वामी ऐयर यांचें पुस्तक पा. १०८ ). एकंदर फौजेंतील धोरणानुसार १ इंग्रज बरोबर २ ते ३ हिंदी शिपाई हें असतां

अन्तःस्वास्थ्याच्या धोरणांत मात्र हिंदी लोक कमी व इंग्रज अधिक–निदान बरोबरीचे–हें धोरण म्हणजे हिंदी शिपायांवरहि इंग्रज अधिकारी विश्वास ठेवीत नाहींत असें नाहीं कां होत ?

यासंबंधांत सर जॉन ॲस्टन " डिफेन्स प्रॉब्लेम " पुस्तकांत लिहितात कीं–देशांतील जनता स्वदेशभक्तीनें प्रेरित असूनहि तिच्यांत कांहीं लोक तरी राष्ट्र-हिताच्या विरुद्ध वर्तन करणारे असणारच. प्रत्येक राष्ट्राला ही गोष्ट लागू असतेच. पण तेवढ्यासाठीं याच्या प्रतिकारार्थ होणाऱ्या योजनेची पूर्णतः शहानिशा करण्याचें व त्यांतील एकूण एक गोष्टींचा ऊहापोह करण्याचें कारण नाहीं. फक्त इतकें सांगितलें म्हणजे पुरें कीं राष्ट्रसंरक्षणांतील या विभागांत फौजे-पेक्षां पोलिसांचाच अधिक उपयोग होऊं शकेल. हिंदी शिपायांसंबंधीं मेजर जनरल ब्राउनस्लो म्हणतात कीं " हिंदी शिपाई लढवय्या जातीचा असेल तर केवळ मर्दुमकीसाठीं लढतो, व आमच्यासाठीं त्यानें अनेक प्रसंगीं आपलें रक्तहि सांडलें ही गोष्ट खरी; परंतु त्याच्या देशभक्तीवर आम्हांला विसंबून मात्र राहतां येत नाहीं. " ( मोडक, पा. ६५ ) पील कमिशनच्या मतें तर हिंदी फौजेंत राष्ट्रीय वृत्तीचा पूर्ण अभाव आहे. हिंदी फौज म्हणजे धंदेवाले व भाडोत्री लोकांची जूट व त्यांत काम करण्यास मुख्य स्फूर्ति म्हणजे पगार! व त्यांच्या-मध्यें उत्पन्न करण्यांत आलेला नकली शूरपणा ! याप्रमाणें कोणत्याहि ब्रिटिश अधिकाऱ्याच्या मतें विश्वास असा फक्त ब्रिटिश शिपायांवरच ठेवतां येईल. फील्ड मार्शल ब्राउनस्लो म्हणतात " ज्यांना हिंदुस्थान माहीत आहे त्यांचें ठाम मत आहे कीं देशांत शांततारक्षणार्थ ब्रिटिश सोल्जर अधिक पाहिजेत." हे पुढें आणखी म्हणतात कीं, राजकीय धोरणाच्या विविधतेबद्दल आपण कितीहि वादविवाद केले व पद्धतींचे प्रयोग केले तरी सरहद्दीचे रक्षणार्थ हिंदी शिपाई ठेवावयाचे कीं सरहद्द प्रांतांतील लोक ठेवावयाचे हा प्रश्न निघाला कीं त्याला उत्तर एकच आहे व तें हें कीं "ब्रिटिश सोल्जर!". हेच गृहस्थ पुढें म्हणतात, "वेळेवर साम्राज्य मुष्टिप्रदर्शन करावयासाठीं रक्तपाताचीहि जरूरी नाहीं. केवळ फुसके-बार काढल्यानें मुंबई व बंगाल शांत करतां येईल...हिंदुस्थानावर नजर ठेव-ण्यास किंवा त्याचें रक्षण करण्यास अगदीं तरबेज पायदळच पाहिजे असें नाहीं. परंतु राज्यकर्त्यांच्या वर्णाचे व मोठ्या संख्येचे सोल्जर्स असले म्हणजे झालें ! "

ब्रिटिश हिंदुस्थान वगळल्यास बाकी राहिलेल्या एक तृतीयांश हिंदुस्थानांत पसरलेल्या देशी संस्थानांच्या फौजेंतून कांहीं हिंदी लोकांस लष्करी पेशा उचलतां येईल. परंतु संस्थानांच्या पूर्वीच्या फौजा कमी करून त्या सर्वांवर एक प्रकारचें नियंत्रण घालून त्यांना इंपीरियल सर्व्हिस ट्रुप्स असें नांव देण्यांत आलें व त्यांवर १९०७ पासून ब्रिटिश अधिकाऱ्यांची देखरेख व हुकमत आहे. हें करण्याचें कारणहि संस्थानिकांस फौजी बाबतींत निर्बल व पौरुषहीन करणें हेंच दिसतें. यासंबंधींहि मेजर जनरल ब्रौनस्लो आपल्या स्ट्रे नोट्सम‌ध्यें म्हणतात, " उत्साही राजवेड्यांच्या मतें संस्थानिकांच्या लष्करी आकांक्षांना मोकळा मार्ग करावयास पाहिजे व त्यांना हुद्दे व मान देऊनहि शांतताकाळीं व युद्धप्रसंगींहि अधिकाराच्या जागा द्याव्या व हिंदुस्थानास आपण स्वायत्तता देतांना या संस्थानिकांस आपली जागा घेतां यावी म्हणून त्यांस एव्हांपासूनच शिक्षण द्यावें." संस्थानांची प्रस्तुतची ठेवण व राज्यकारभारामुळें हिंदुस्थानच्या एक तृतीयांश भागाच्या राज्यकारभाराची आपली दगदग कमी होते व आपल्या साम्राज्यासही बळकटी येते. त्यांच्या सैन्यांत वाढ करणें, व त्यांच्यांतील लष्करी उत्साह वाढविल्यास तेंहि आपणांस एक चिंतेचें कारण होईल—व काय सांगावें त्यांतून संकटहि उत्पन्न होण्याचा संभव आहे !...मागील इतिहास किंवा वर्णभेद हे आपणांस विसरतां कामा नयेत. "

याप्रमाणें आपण कोणत्याहि ब्रिटिश अधिकाऱ्याचें लिखाण किंवा भाषण पाहिलें तर हिंदुस्थान आपल्या हातांत ठेवण्यासाठीं ब्रिटिश शिपायांची ब्रिटिश सरकारला क्षणोक्षणीं आवश्यकता भासते हेंच सत्य बाहेर पडतें. कांहीं मुत्सद्दी व उदारमतवादी इंग्रज हिंदुस्थानी लोकांच्या हितासाठीं हिंदुस्थान आम्ही आपल्या हातीं ठेवतों असा आव आणतात. पण कधीं कधीं मोठाले जबाबदार इंग्रज अधिकारी हिंदुस्थान ब्रिटिश हिताकरितांच इंग्रज हातीं ठेवतात हें स्पष्टच सांगतात. याबद्दल मेजर ग्रॅहम पोल आपल्या " *I refer to India* " नामक पुस्तकांत म्हणतात कीं " आम्हीं ब्रिटनच्या मालास खुला दरवाजा असावा म्हणून हिंदुस्थान जिंकून घेतला. हिंदी लोकांसाठीं आम्ही हिंदुस्थान हातांत ठेवतों असें म्हणणारा भोंदू मी नव्हें; सर्वसामान्यतः ब्रिटिश माल व विशेषतः लँकेशायरच्या मालास खुलें द्वार असावें म्हणून आम्हीं हिंदुस्थान जिंकला." " हिंदुस्थानांतील आमची फौज मुख्यतः हिंदुस्थानच्या फायद्याकरितां नाहीं. "

वरील सर्व गोष्टींवरून इंग्रज राज्यकर्त्यांस आपलें राज्य हिंदुस्थानांत सुरक्षित रहावें व साम्राज्यरक्षणाचें सागरावरील सर्व मार्गांचें संरक्षण करतां यावें व इंग्लंडला पोषणासाठीं लागणाऱ्या परदेशांतून इंग्लंडमध्यें जाणाऱ्या खाद्य वस्तु अखंडित मिळत राहण्यासाठीं ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत विशेषतः व इतर सागरावरील ठाण्यांच्या जागीं कमी अधिक प्रमाणांत ठेवावयास पाहिजे यांत संशय नाहीं. जितांनीं जेते सांगतील तें निमुटपणें ऐकावें असाच नियम असला तरी जेत्यांनीं सांगितलेलें तें सर्व खरेंच असतें असें नाहीं. यावरून ब्रिटिश फौजांचा उपयोग नाहीं, अगर झाला नाहीं किंवा ते लोक शूर नाहींत असें म्हणण्याचें धाडस कोणीहि करणार नाहीं. परंतु हें जसें खरें तसें अनेक दुर्धर प्रसंगीं अनेकदां हिन्दी शिपायांनीं मर्दुमकी गाजवून व कित्येकदां वरिष्ठ इंग्रज अधिकारी युद्धांत मारले गेल्यावरहि अनुभव नसलेल्या कनिष्ठ हिन्दी अधिकाऱ्यांनीं जर्मन शत्रूंना फ्रान्समध्यें ची ची करावयास लावलें हेंहि खोटें नाहीं. मग उठल्यासुटल्या हिन्दी शिपायांना अनुभव नाहीं, व त्यांच्यांत लष्करी पुढारीपणाचे गुण नाहींत हें म्हणण्यांत काय अर्थ आहे ? मेसापोटेमियन कमिशनच्या रिपोर्टांतील वेगळ्या कैफियतींत कमँडर जे. सी. वेजवुड म्हणतात ( १९१७ ) " हिन्दी फौजेंतील रेजिमेंटल ऑफिसर्स व सामान्य सैनिक ( Rank and file ) कमशिक्षण, शास्त्रीय शिक्षणांतील अपूर्णता व कागदोपत्रीं राखीव म्हणून दाखविण्यांत येत असले तरी त्यांनीं युद्धांत केलेला पराक्रम पाहिला कीं असें म्हणावयास पाहिजे कीं हिंदी लोकांस व्यवस्थितपणें भरती करून, शिकवून सुसज्ज राखलें तर त्यांची बरोबरी करणारे दुसरे सैनिक दिसणार नाहींत." ( कॅ. मोडक, पा. ३७ ) असो.

या सर्व लिखाणावरून हिंदुस्थानच्या संरक्षणार्थ हिंदी फौजेला इतर परदेशी शिपायांची मदत हवीच हें ह्मणणें योग्य नाहीं असें निस्पृहपणें विचार करणारांना पटल्यावांचून राहणार नाहीं. याबरोबरच दुसरीहि गोष्ट ओघाओघानेंच येते व ती ही कीं हिंदी लोकांस स्वसंरक्षणक्षम होण्यासाठीं लष्करी शिक्षण देणें व त्यांना हत्यारें वापरण्यास परवानगी देणें याहि गोष्टींची जरूरी आहे. शिवाय ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत ठेवावयाची असल्यास तिच्यांत व हिंदी फौजेंतील खर्चांत एकवाक्यता असावयास पाहिजे. परंतु येथेंहि सापत्नभाव दिसून येतो, व हिंदी लोकांच्या खर्च करण्याच्या शक्याशक्यतेचा मुळींच विचार करण्यांत येत नाहीं. म्हणून ब्रिटिश सोल्जर व हिंदी सोल्जर यांच्यामध्यें पगार, भत्ता, शिक्षण,

दुय्यम व्यवसाय व इतर अनेक लहानसहान बाबतींत काय फरक आहे तो थोडक्यांत पाहूं. हिंदी व इंग्लिश नॉन–कमिशन्ड अधिकाऱ्यांत काय भेद आहे तो पुढील कोष्टकावरून सहज समजेल.

हिंदी सैन्यांतील ब्रिटिश सैनिक व ज्यूनिअर ऑफिसर्स आणि हिंदी सैनिक आणि अधिकारी यांच्या पगाराचें तुलनात्मक विवेचन दर्शविणारें कोष्टक.

| ब्रिटिश सैनिक व ज्यूनियर ऑफिसर | मासिक पगार | हिंदी व इतर अधिकारी | मासिक पगार | दोन्ही पगारांचें तुलना. प्रमाण |
|---|---|---|---|---|
| सोल्जर फर्स्ट ग्रेड, | ५५–०–० | सोल्जर | १६–०–० | ३·५:१ |
| सोल्जर सेकंड ग्रेड, दोन वर्षांनंतर | ७१–०–० | सोल्जर | १६–०–० | ४·५:१ |
| सोल्जर थर्ड ग्रेड | | सोल्जर | १६–०–० | |
| लान्स कॉर्पोरल | ८६–८–० | लान्स नाईक | १८–०–० | ४·७५:१ |
| कॉर्पोरल | १०१–८–० | नाईक | २२–०–० | ४·५:१ |
| लान्स सार्जन्ट | १११–८–० | लान्स हवालदार | २३–८–० | ४·७५:१ |
| सार्जन्ट | १४४–०–० | हवालदार | २५–०–० | ५·७५:१ |
| कंपनी क्वार्टर मास्टर सार्जन्ट | १९३–०–० | कंपनी क्वार्टर मास्टर हवालदार | ३३–०–० | ५·७५:१ |
| कलर सार्जन्ट | | | | |
| रे. क्वा. मा. सार्जन्ट | २४४–०–० | रे. क्वा. मा. हवालदार | ३५–०–० | ६·२५:१ |
| रेजिमेंट सार्जन्ट मेजर | २८४–८–० | रेजि. हवालदार मेजर | ४०–०–० | ७.१:१ |
| सेकंड लेफ्टनंट | ४३५–०–० | जमादार | ७५–०–० | ६:१ |
| ,, ,, एक वर्षांनंतर | ५१०–०–० | ,, एक वर्षांनंतर | ८०–०–० | ६·२५:१ |
| ,, ,, पांच वर्षांनंतर | ६१०–०–० | ,, पांच वर्षांनंतर | १०० | ६:१ |
| ,, ,, सात वर्षांनंतर | | सुभेदार | १३० | |
| | | सुभेदार | १६० | |

वरील आंकडे सर्वसाधारण घेतले आहेत. वस्तुतः फौजेंतील वेगळाल्या विभागांत पगाराचें मान वेगवेगळें आहे. पगाराचे दर, अंगचे गुण, हुद्दा, नोकरी व हुकमतींतील विशेष जबाबदारी यांवर अवलंबून असतात. सर्वसाधारण सोल्जरचें सरासरी प्रमाण धरण्यांत आलें आहे. यांमध्यें अलावन्सेस धरण्यांत आले नाहींत व हे धरून त्याची सरासरी केली तर ब्रिटिश शिपायी यांच्या पगार प्रमाणांत अधिक वाढ होईल. हें अलावन्सचें प्रमाण पाहिलें तर तेथेंहि गोऱ्या शिपायास दिलेल्या सवलती हिंदी शिपायापेक्षां फार अधिकच्या

आहेत हें सहज दिसेल. याशिवाय कांहीं अलावन्स फक्त ब्रिटिश सोल्जर्सनाच दिले असून त्यांची गंधवार्ताहि हिंदी शिपायांस नसते हें पुढील कोष्टकावरून दिसेल.

**ब्रिटिश व हिंदी शिपायास मिळणाऱ्या अलावन्सचें बरोबरी प्रमाण दर्शविणारें कोष्टक--**

| अलावन्सचें नांव | प्रमाण ब्रिटिश | प्रमाण हिंदी | शेंकडा प्रमाण प्रत्येकीं ब्रिटिश | शेंकडा प्रमाण प्रत्येकीं हिंदी |
|---|---|---|---|---|
| १ मेसिंग अलावन्स | ०-३-६ दररोज | ०-१०-० दरमाहा | ९१ | ९ |
| २ किट अलावन्स क्वार्टर्ली | १८-०-० | ४-७-० | ८० | २० |
| ३ क्लोदिंग अलावन्स क्वार्टर्ली | ९-०-० | ५-५-० | ६३ | ३७ |
| ४ हेअर कटिंग अलावन्स | ३-०-० | ०-०- | १०० | ० |
| ५ इक्विपमेंट अलावन्स विवाहित शिपायासाठीं मासिक | २-४-० | ० | १०० | ० |
| ६ एज्युकेशन प्रोफिशिअन्सी पे | ०-२-३ दररोज | ० | १०० | ० |
| ७ मिलिटरी प्रोफिशिएन्सी पे. मासिक | ७-६-० | २-८-० | | |
| ८ मॅरेज अलावन्स मासिक | ३०-०-० | -- | १०० | ० |
| ९ मॅटर्निटी बेनिफिट तत्कालिन मासिक | ३०-०-० | ० | १०० | ० |
| १० चिल्ड्रन्स अलावन्स ४ मुलांपर्यंत | १०-०-० | ० | १०० | ० |
| ११ चार मुलांपुढें दरमुलास मासिक | ५-०-० | ० | | |
| १२ शाळेची फी सिव्हिल स्कूलमध्यें शिकणाऱ्या मुलांसाठीं | प्रत्यक्ष फी | ० | १०० | ० |
| १३ विवाहित शिपायास फर्निचरला | ३-४-० | ० | १०० | ० |
| १४ पाणी—पठार | २० गॅलन | ८ गॅ. | ७१ | २९ |
| ,, — | १५ गॅलन | ५ गॅ. | ७५ | २५ |
| १५ उत्तम नोकरीबद्दल बक्षीस | ८० रु. | २५ | ७६ | २४ |
| ,, वागणुकीबद्दल ,, | ५० | २५ | ६७ | ३३ |
| १६ और्ध्वदेहिक अलावन्स | १३० | २० | ८६ | १४ |

हे सर्व आंकडे कॅ. मोडकांच्या इंडियन डिफेन्स प्रॉब्लेम या पुस्तकांतील पा. २१९-२२० वरून घेतले आहेत.

वरील आंकड्यांवरून लष्करांत एकाच प्रकारचीं कामें करणाऱ्या सैनिकांस वर्णभेदामुळें कसें वेगळाल्या पद्धतीनें वागविलें जातें हें लक्षांत येईल व शिवाय इंग्रज शिपाई हिंदुस्थानास कसा महाग पडतो हेंहि समजेल. याशिवाय रणांगणांत खांद्याशीं खांदा भिडवून लढणाऱ्या ब्रिटिश व इंडियन फौजी विभागांतील वेगळाल्या युनिट्सनाहि कसें वेगवेगळ्या पद्धतीनें भेदपूर्णपणें वागविलें जातें तें कळण्यासाठीं घोडदळ व पायदळ पलटणींच्या खर्चांचें प्रमाणहि पाहण्यासारखें आहे.

| अनुक्रमांक | अलावन्सचें नांव | घोडदळ | | पायदळ | |
|---|---|---|---|---|---|
| | | ब्रिटिश | हिंदी | ब्रिटिश | हिंदी |
| | | रु. आ. पै. | रु. आ. पै. | रु. आ. पै. | रु. आ. |
| १ | बँन्ड अलावन्स | २००-०-० | १००-०-० | २००-०-० | १००-० |
| २ | बेओनेट फाइटिंग | ० | ० | ० | ० |
| ३ | बट्स अँड टार्जेट | ० | ० | ० | ० |
| ४ | लाइन्स कॉन्टिनेन्ट | १२-०-० | ११-४-० | ९-०-० | ० |
| ५ | एज्युकेशनल ट्रेनिंग ग्रँट | ०-७-० | ०-३-० | ०-७-० | ०-३ |
| ६ | लायब्ररी | १७६-८-० | ० | १७६-८-० | ० |
| ७ | लायब्ररी लाइटिंग अलावन्स | ४-०-० | ० | ६-०-० | ० |
| ८ | मटेरियल फॉर लान्स अँड सोर्ड | ० | ० | ० | ० |
| ९ | मार्किंग इक्विपमेंट | ९०-०-० | ० | ० | ० |
| १० | ऑफिस अलावन्स ॲडज्युटन्ट | ९०-०-० | ० | १०५-०-० | ० |
| ११ | ,, ,, क्वार्टर मास्टर | ८५-०-० | ० | ८५-०-० | ० |
| १२ | ऑफिसर मेस अलावन्स | १५०-०-० | १२५-०-० | १५०-०-० | १२५-० |
| १३ | पेंट अँड ब्रशेस | ० | ० | ० | ० |
| १४ | पेटि स्टोअर्स | १८-०-० | ० | १८-०-० | ६०-० |
| १५ | पेटि सप्लाइज् | १०५०-८ | ० | १३००-० | ० |
| १६ | ,, ,, | ६७०-०-० | ० | ८५०-०-० | ० |
| १७ | रेंजिस अँड मस्केट्री अप्लायन्सेस | ० | ० | ० | ० |
| १८ | रिपेअर्स ऑफ आर्म अकूटिमेंट्स | २४०-०-० | रिझर्व्हस | १८०-०-० | रिझर्व्हस |
| १९ | ,, फाइल्स अँड ग्रूव्हज् | २०-०-० | ० | ० | ० |
| २० | रायडिंग स्कूल्स अँड जंप इनीशिअल्स | ३६०-०-० | ३६०-०-० | ० | ० |
| २१ | स्टेशनरी अलावन्सेस | ९८०-०-० | ७२०-०-० | ९८०-०-० | ७२०-० |
| २२ | अपकीप ऑफ सायकल्स | २०-०-० | २०-०-० | २०-०-० | २०-० |

याप्रमाणें भेदभावाच्या आणखी कित्येक गोष्टी सांगतां येतील, परंतु यावरून एक गोष्ट तरी निश्चित लक्षांत येण्यासारखी आहे व ती ही कीं हिंदुस्थानांतील फौजेंतील ब्रिटिश विभागाचा खर्च हिंदुस्थानच्या हितापेक्षां इंग्लंडच्या हितसंरक्षणाकडे ज्यास्त झुकणारा असून हिंदुस्थानच्या संरक्षणासाठीं या महागड्या व भाडोत्री फौजेची तितकी अवश्यकता नाहीं. इंग्लंड व इतर स्वतंत्र राष्ट्रांच्या मानानें हिंदुस्थानचा फौजी खर्च हिंदुस्थानच्या पैदाशीच्या मानानें फार डोईजड होतो व त्यांतील बराचसा भाग या ब्रिटिश विभागावर होतो. हा कमी केल्यास हिंदी फौजेंत कमींत कमी दीड दोन लक्ष अधिक हिंदी सैनिक ठेवतां येतील. हिंदी शिपायांच्या तिपटी चौपटीचा खर्च इंग्रज शिपायांवर होतो हें इंग्रज लोकांनींच म्हटलें आहे. पायदळांतील हिंदी शिपाई व इंग्रज शिपाई यांचा खर्च प्रत्येकीं अनुक्रमें ६९३ व १९३९ रुपये असा येतो ! म्हणजे हिन्दी शिपायाच्या तिप्पट खर्च इंग्रज शिपायासाठीं करावा लागतो. याचा अर्थ असा की, आज हिन्दी फौजेंत असणारे सुमारें ६० हजार ब्रिटिश सोल्जर कमी करून त्या जागीं हिंदी शिपाई त्याच खर्चांत १ लक्ष ८० हजार मिळूं शकतील; किंवा ६० हजार इंग्रज शिपाई कमी करून त्या जागीं तितकेच हिन्दी शिपाई ठेवावयाचें म्हटलें तरी आज ६० हजार शिपायांवर होणाऱ्या खर्चाचा दोन तृतीयांश भाग कमी होऊन ती बचत हिंदुस्थानच्या तिजोरींत पडेल. इतर स्वतंत्र राष्ट्रांतील फौजा व हिंदुस्थानांतील फौजा यांच्या प्रमाणांतहि फार तफावत दिसून येते. हिंदुस्थानाला लवकरच युद्धसमाप्तीनंतर (१९३९-४० मधील युद्ध) "शक्य तितक्या लवकर" डोमिनियन स्टेटस देण्याचा विचार होईल असें ब्रिटिश मुत्सद्दी सांगत आहेत. तें काय होईल तें होवो. परंतु त्यावरून हिंदुस्थान व डोमिनियन्सची फौजीबाबत तुलना करणें क्रमप्राप्तच आहे.

कॅनडामधील लोकसंख्या सुमारें ९७ लक्ष असून त्यांतील सुमारें ११·९७ लक्ष लोकांस लष्करी शिक्षण दिलें जातें, म्हणजे सुमारें १२ टक्के लोक लष्करी पद्धतीनें तयार ठेवण्यांत येतात. यावर होणारा खर्च शेंकडा ४·७५ ( मिळकतीच्या प्रमाणांत ) टक्केच फक्त होतो असें तज्ज्ञ सांगतात. हिंदुस्थानच्या ३५ कोट लोकसंख्येंतील निम्मे स्त्रिया सोडून दिल्या तर जवळ जवळ १७–१८ कोट लोकसंख्या पुरुषांची आहे. त्यांतील सुमारें अर्धा लक्ष लोकांस लष्करी शिक्षण दिलें जातें असें समजूं तर या प्रमाणानें हिंदुस्थानांत लोकसंख्येच्या १/१८००

एवढाच भाग लष्करी होऊं शकतो, व यावर होणारा खर्च मात्र मिळकतीच्या मानानें शेंकडा ४५ टक्के होतो ! याप्रमाणें खर्च अधिक, पण लष्करी मिळकत कमी अशी हिंदुस्थानची स्थिति आहे, व याचें कारण हिंदुस्थानचा लष्करी खर्च इंग्रज सरकारच्या सत्तेच्या अनुरोधानें होतो व त्यांत हिंदुस्थानच्या हिताचा प्राधान्येंकरून विचार केला जात नाहीं.

देशांतील लोकसंख्या, मिळकतीचा आंकडा व भूमीची ठेवण यावर वस्तुतः लष्करी धोरण अवलंबून असावयास पाहिजे. या मानानें हिंदुस्थानांत किती भयंकर खर्च होतो व या देशाचा त्या प्रमाणांत फायदा न होतां हा देश परा-लंबीच राहतो हें पुढील कोष्टकावरून दिसेल. मिळकतीच्या मानानें कॅनडा, न्यूझीलंड, ऑस्ट्रेलिया वगैरे देशांचा लष्करी खर्च शेंकडा ४ ते ६ च्या दरम्यान सरासरीनें होतो असें तज्ज्ञांच्या लिखाणावरून दिसतें.

| अनुक्रमांक | देश | लोकसंख्या | | लष्करी शिक्षणानें सुसज्ज प्रजा | प्राप्ति-उत्पन्न | प्राप्तीच्या मानानें संरक्षण खर्चाचें प्रमाण शेंकडा |
|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण संख्या | पुरुष संख्या | | | |
| | | कोटिलक्ष | | | कोटि | |
| १ | इंग्लंड | ४-५० | २-२० | ६० लक्ष | ८०.००० | शें. १४.७५ |
| | | | | | कोटि फँक्स | |
| २ | फ्रान्स | ४-१ | ... | ... | ४.८७२ | शें. १८.७५ |
| | | | | | को. ल. डालर | |
| ३ | कानडा | ९५ लक्ष | ४० लक्ष | ११ लक्ष | ४५.५० | शें. ४.७५ |
| | | को. ल. | को. ल. | | | |
| ४ | हिंदुस्थान | ३५-० | १७-५० | १ लक्षाहून कमी | १३४ को. रुपये | शें. ४५.२९ |

याबद्दल वेल्बी कमिशनच्या साक्षीमध्येंहि नाम. गोखले यांनीं राष्ट्रखर्च व त्यांतील लष्करी खर्च यांचे शेंकडा प्रमाणाचे आंकडे दिले आहेत तेहि वरील सिद्धान्तास पुष्टि देणारेच आहेत.

| अनुक्रम | देश | एकूण खर्च | लष्करी खर्च | एकूण खर्चाचे मानानें लष्करी खर्चाचें प्रमाण |
|---|---|---|---|---|
| | | दशलक्ष पौंड | दशलक्ष पौंड | |
| १ | युनायटेड किंगूडम (इंग्लंड) | ९१·३ | १७·८ | शें. १९ |
| २ | फ्रान्स | १३८·० | २५·९ | ,, ,, |
| ३ | इटली | ७२·४ | ९·४ | शें. १३ |
| ४ | जपान | १६·२ | २·६ | शें. १६ |
| ५ | ग्रीस | ४·२ | ·५८ | शें. १३ |
| ६ | रशिया | ७३·० | २१·० | शें. २१ |
| ७ | हिंदुस्थान | ७३·२ | २५·४ | शें. ३० |

याप्रमाणें आज कित्येक वर्षे हा हिंदुस्थानचा लष्करी खर्च डोईजड होऊनहि पुनः हिंदुस्थानास आरमार व वैमानिक दल पुरें नाहीं तें नाहींच ! आरमाराकरितां इंग्लंडाच्याच तोंडाकडे पहात बसावें लागतें अशी आज स्थिति आहे. या सर्व गोष्टीवरून हिंदुस्थानला स्वसंरक्षणक्षम होतां येण्यासाठीं फारसे काय पण मुळींच प्रयत्न झाले नाहींत हें सहज दिसेल. लष्करी खर्चाच्या बाबतींत पाहिलें तरीहि कुल लष्करी खर्च व खुष्की सैन्य यांचे प्रमाणांतहि हिंदुस्थानचा खर्च फार मोठ्या प्रमाणांत होतो हेंहि पुढील कोष्टकावरून दिसेल.

इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांचा कुल लष्करी खर्च आणि खुष्की सैन्य खर्च यांचें परस्पर शेंकडा प्रमाण खालीं दिल्याप्रमाणें आहेः—

| देश | कुल लष्करी खर्च | खुष्की सैन्याचा खर्च | यांमधील शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| इंग्लंड | १२०·६९ | ४१·५६ | ३४·७ |
| हिंदुस्थान | ५७·०७ | ५३·८६ | ९४·५ |

इंग्लंडचें खुष्की सैन्य सुमारें १ ल. ४४ ह. असून त्याचा खर्च ४१ कोटी होतो, पण तोच हिंदुस्थानच्या सैन्यांत २ ल. २० ह. सैन्यास ५३ कोटी रुपये खर्च होतो व त्यांतील इंग्लंडच्या प्रत्येक सैनिकावर प्रत्येक हिंदी शिपायाच्या तीनचार पटींनीं अधिकीचा होतो. यावरून हिंदी लष्करी खर्च डोईजड असूनहि प्रत्यक्ष हिंदुस्थानपेक्षां साम्राज्यसंरक्षण व ब्रिटिश हितसंबंधसंरक्षणार्थ होतो हेंहि सहज लक्षांत येईल.



# भाग ५
# ब्रिटिशपूर्वकालीन हिंदी राष्ट्र-फौज

मेरिडिथ टौनशेन्ड नामक इंग्रज ग्रंथकर्त्यानें आपल्या " एशिया आणि युरप " या पुस्तकांत हिंदुस्थानच्या लोकसंख्येंतील १२ कोट लोक सहज लढाऊ होऊं शकतील असें विधान केल्याबरोबर इंग्रज तज्ज्ञ हंसूं लागतात व त्याचा परिणाम हिंदी मनावरहि स्वतःच्या पराक्रमाविषयीं असमाधानकारक होतो. लढाईच्या कामांत " पाहिजे जातीचें । येऱ्या गबाळाचें काम नोहे " असें आपण ऐकतों, व गेल्या शेंदीडशें वर्षांत स्मशानवत् शांततेंत व परदास्यांतील सुखसोयींत मुरलेल्या बैठ्या लोकांस स्वतःच्या कर्तबगारीबद्दल शंका आल्यास कोणाचा इलाज ? पण वाघाच्या खानदानींत जन्मून स्नेहसंबंध व सान्निध्यप्रसंगानें मेंढरांच्या कळपांतील नरम झालेल्या वाघास त्याचें व्याघ्ररूप दाखविण्यास आरसा दाखवावा लागतो त्याप्रमाणें आज युद्धभूमीवरून शंभर सवाशें वर्षें परावृत्त ठेवण्यांत आलेल्या हिंदी लोकांस आमचे पूर्वज खरोखरीच लढत होते असें वाटत असल्यास त्यांचेपुढें खरी स्थिति ठेवून " हिंदुस्थानी नागरिक " इतर स्वतंत्र देशांतील नागरिकांप्रमाणें लढत होता व स्वदेशरक्षणार्थ झटत होता हें समजण्यासाठीं थोड्या वेळांत हिंदुस्थानांतील फौजी इतिहासाकडे विहंगमदृष्ट्या नजर टाकणें अवश्यक आहे.

उत्तर हिंदुस्थानांत वायव्य सरहद्दीवरून हिंदुस्थानांत येणाऱ्या आक्रमक राष्ट्रांस प्रतिकार करण्यास मोठमोठालीं सैन्यें हिंदुस्थानांत होतीं. आजच्याप्रमाणेंच दोन हजार वर्षांपूर्वीं हिंदी सैन्यांतहि पायदळ ( पदाति ), घोडदळ ( तुरंग ), रणगाडे ( रथ ) व मोटरित सैन्य हत्तींच्या रूपांत होतें. पौराणिक काल रामायण, महाभारतादि सोडून अगदीं आधुनिक समोर दिसणाऱ्या दोन हजार वर्षांतील कालांतहि अलेक्झांडरच्या सैन्यास प्रतिकार करण्यासाठीं एका लहानशा पुरुषोत्तम नांवाच्या संस्थानिकानें ३० ह. पायदळ, ६ ह. घोडदळ ६०० रथ व २०० हत्ती आपल्या संस्थानांतून युद्धार्थ उभे केले होते. पूर्वीं हिंदुस्थानांत धर्मयुद्ध करणारे वीर होते व त्यामुळें रात्रीं युद्ध होणार नाहीं असें समजणारा पौरस राजा ॲलेक्झांडरच्या रात्रीच्या अचानक हल्ल्यामुळें अपजय

पावला ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. अशा वेळीं हिंदु लोकांनी दाखविलेल्या पराक्रमामुळें ग्रीकांच्या महत्त्वाकांक्षेस मोठाच जोराचा धक्का बसला, व त्यांच्या हिंदुस्थानावरील आक्रमणाची लाट मागें सरली.

चंद्रगुप्ताजवळ ६ लक्ष पायदळ, ३० ह. घोडदळ, ९००० फौजी हत्ती व ८००० रथ इतकें खडें सैन्य असे. याशिवाय सैन्याच्या बरोबर परंतु प्रत्यक्ष लढवय्ये म्हणून गणती न केलेलीं कितीतरी माणसें व वाहतुकीचीं साधनें असत. यावर शासनसंस्था म्हणून तीस सभासदांचें वॉर बोर्ड असे. मौर्यांच्या या सैन्यानें बॅबिलोनियन बादशहा सेल्यूकसचा पराजय केला होता. यानंतरच्या कालांतहि कनिष्कराजानें ७० ह. घोडदळासमवेत एक मोठी सेना हिमालय ओलांडून तुर्कस्थान व तिबेटांत पाठवून ते देश आपल्या अमलाखालीं आणले होते. कनोजच्या श्रीहर्ष राजाचे खड्या सैन्यांत १० लक्ष पायदळ, १ लक्ष घोडदळ, व ६० ह. लढाऊ हत्ती होते. श्रीहर्षानंतर मात्र आपापसांतील कलह, द्वेष, मत्सर वगैरे अनेक कारणांमुळें उत्तर हिंदुस्थानांतील राष्ट्रांत बेबनाव वाढून आक्रमकांस तोंड देण्यासाठीं लागणारी राष्ट्रीय जूट नाहींशी झाली व त्यामुळें पुढें घोरी, गझनवी घराण्यांपुढें हिंदु राजांना फारसा पराक्रम गाजवितां आला नाहीं. मधून मधून पृथ्वीराज, राणा प्रताप यांच्यासारखे शूरवीरांनीं बाजू राखण्याचा प्रयत्न केला; परंतु अन्तस्फूर्तीचा अग्नि थंडावलेल्या व बुद्धिभेदानें न्यूनगंड उत्पन्न झालेल्या रजपूत राजेरजवाड्यांनीं इस्लामी सत्तेपुढें माना वांकवून, त्यांचा मांडलिकपणा पतकरून आपलीं आसनें कशीं तरी टिकवून धरलीं. हल्लींच्या संस्थानांतून हीच परंपरा चालूं आहे. यानंतर बाबर, अकबर, शहाजहान यांच्या कारकीर्दीतहि हिंदु लोकांनीं पराक्रम गाजविले, पण ते स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें मात्र नव्हे. जयपुर, जोधपुर, बिकानेर, आलवर वगैरे अनेक रजपुत संस्थानें मोंगल पादशाहीचे मांडलिक म्हणून पादशाही सैन्यांत लढले व त्यांनीं लोकोत्तर पराक्रमहि गाजविले.

यानंतरचा उज्ज्वल काल दक्षिण हिंदुस्थानांतील होता. पूर्वी श्रीहर्षवर्धनानें उत्तर हिंदुस्थानांत साम्राज्य प्रस्थापित करून दक्षिणेवर मोर्चा फिरविला असतां महाराष्ट्र राजा पुलकेशी हा त्यास आपल्या अजस्र सेनेनिशीं आडवा होऊन त्यानें हर्षाला थोपवून धरलें होतें. दक्षिणेंतील अखेरचें स्वतंत्र हिंदवी राज्य म्हणजे विजयानगरचें. या राज्याचा अधिपति कृष्णदेवराज याच्या ९ लक्ष

सैन्यांत ३३ ह. घोडदळ व ६०० हत्ती होते असें नेनेझ या परदेशस्थ फिरस्त्यानें म्हटलें आहे.

पूर्वेतिहासाचें थोडक्यांत एवढें निरीक्षण करून गेल्या दोनतीनशें वर्षांतील हिंदी लोकांच्या लष्करी बाण्याच्या इतिहासाकडे पाहूं.

दक्षिण हिंदुस्थानांतील मुसलमानी पादशाहीच्या परस्परांतील चुरशीत त्या वेळचे मराठे सरदार आपल्या परक्रमानें मुसलमानी सत्तेला प्रस्थापित व दृढमूल करण्यांत प्रथमत: दंग होते. मोंगल बादशहांना आसेतुहिमाचल साम्राज्य वाढवावयाचें असल्यानें त्यांनीं दक्षिणेंतील मुसलमानी पादशाहीवर आक्रमणास प्रारंभ केला. अहमदनगरच्या निजामशाहीला अंकित करण्यासाठीं मोठें सैन्य आलें असतां निजामशाहीच्या वतीनें श्रीशिवाजी छत्रपतींचे वडील शहाजी राजे लढले. निजामशाही जिंकली गेल्यानंतर शहाजी राजे विजापूरचे सरदार होऊन त्यांनीं कर्नाटकांत अनेक स्वाऱ्या केल्या. शिवाजी राजे भोसले यांस प्रथमत: विजापुर पादशाहीशीं व नंतर मोंगल पादशाहीशीं टक्कर द्यावी लागली, व त्याबरोबरच जंजिऱ्याच्या शिद्दीबरोबर व यावनी सत्तेस गुपचुप मदत करून आपलें वर्चस्व हिंदुस्थानभर बसवूं पाहणाऱ्या इंग्रजांबरोबरहि दोन हात करावे लागले. शिवाजीमहाराजांनीं पायदळ, घोडदळ व आरमार वाढवून हिंदुपद-पादशाही प्रस्थापित केली त्यावेळीं त्यांच्या फौजेंत १ लक्ष पायदळ, ३० ह. घोडदळ व १२०० हत्ती असून शिवाय ३०० किल्ल्यांवर संरक्षक लहान गॅरिझन्स होतींच. तोफखाना मोठासा नव्हता, परंतु २०० जहाजांचें आरमार असून त्यानें कोंकण किनाऱ्यावर आपलें वर्चस्व बसविलें होतें व त्यानें इंग्रजांच्या व शिद्दीच्या आरमारांना कित्येकदां पराभवाचें पाणी पाजलें होतें. यानंतर अगदी अलीकडच्या म्हणजे पेशवाईच्या काळींहि मराठ्यांचा सैन्यविस्तार फार मोठा होता हें पुढील माहितीवरून दिसेल.

शिवाजी छत्रपतींनीं खडें सैन्य ठेवण्याचा उपक्रम केला असें वर सांगितलें, परंतु इतर देशांप्रमाणेंच हिंदुस्थानांतहि सरंजामी सरदारांवर स्वाऱ्यांची व संरक्षणाची भिस्त मुख्यतः ठेवण्याची चाल होती. खुद्द पेशव्यांपाशीं खडें सैन्य फार थोडें असे, व म्हणून त्यांस मदतगार असणाऱ्या मराठामंडळाच्या फौजेवर विसंबून रहावें लागे. मराठ्यांचा सर्व भार बहुधा शिलेदारी फौजेवर; त्यामुळें पायदळापेक्षां या सैन्यांत घोडदळ अधिक असे. शिवाय शत्रुमुलखांत शिरून अचानक हल्ला मारून लांबचा पल्ला गांठण्यास लागणारी चपलता माणसाच्या

पायापेक्षां घोड्याच्या पायांत अधिक राहाणार, म्हणून शिलेदारांचें महत्त्व विशेष. हिंदुपद्पाद्शाहीचे मुख्य आधारस्तंभ म्हणून असलेले सातारचे भोसले यांच्याजवळ दोन हजारांपेक्षां ज्यास्त खडी फौज होती कीं नव्हती याची शंकाच. त्यांच्या खालोखाल इतमाम पेशव्यांचा व त्यांच्या करवीं राज्यकारभार चालत असल्यामुळें त्यांस वस्तुतः खडी फौज ठेवणें अवश्य होतें, पण त्यांच्याजवळहि खास फौज अशी दहापांच हजारांहून जास्त नसावी. प्रसंग पडल्यास एकदम सैन्य उभारतां यावें म्हणून सर्व मराठे सरदारांस तैनात जहागिर मुलूख तोडून देऊन त्यांतून त्यांनी तैनाती फौज पुरविण्याची मात्र तरतूद केलेली होती. तिचा तपशिल पुढीलप्रमाणें आहेः—

| सरदार | फौज | जहागीर | सरदार | फौज | जहागीर |
|---|---|---|---|---|---|
| शिंदे अलीजा बहादुर | २२००० | ९० लक्ष | सुलतानराव | ५०० | १॥ ल. |
| मल्हारराव होळकर | २२००० | ९५ ,, | पुरंदरे | ३०० | २ल.३२ह. |
| आनंदराव पवार | १५००० | ४५ ,, | शेखमिरे | १५० | ६० ह. |
| पटवर्धन चिंतामण | | | अंबेकर | | ८० ह. |
| पांडुरंग, गंगाधर | ३००० | ११ ,, | भोसले ( खानदेश ) | २०० | ७५ ह. |
| गोविंद | | | नायगांवकर | ५०० | १॥ ल. |
| पटवर्धन परशुराम | | | राजेबहादुर | ३००० | ९ लक्ष |
| रामचंद्र | १५०० | ६॥ ,, | विठ्ठलराव संदर | ३००० | १२ लक्ष |
| पटवर्धन कुरुंदवाडकर | ३०० | २॥ ,, | खंडेराव धोडेकर | ८०० | २ल.४०ह. |
| प्रतिनिधि | ५००० | १४ ,, | अल्लीबहादर | १०००० | २२ लक्ष |
| रास्ते | ३००० | ११ ,, | दाभाडे | ५०० | १ल ३५ह. |
| घोरपडे मुधोळकर | ८०० | ४ ,, | रघूजी भोसले | | |
| पानसे | तोफखाना | ३॥ ,, | ( नागपुर ) | २५००० | १ कोटी |
| थोरात | ५०० | ११ ,, | गायकवाड | ५००० | ७२ लक्ष |
| भापकर | १५० | ६० हजार | मंत्री इस्लामपुरकर | ३०० | ७५हजार |
| हरिपंत फडके | | १ल.८०ह. | | | |
| नाना फडणवीस | ७०० | ४॥ ल. | आंग्रे(कुलाबा)सुमंत | | एकूण |
| त्र्यंबकराव पेठे | १२०० | ७॥ ल. | चिटणवीस, अमात्य | | जहागीर |
| भोसले अक्कलकोट | १००० | ४॥ ल. | | | ३ल.७७ह. |

एकूण राजमंडळ १ कोटी ८० लक्ष

वरील आंकड्यांकडे पाहतां सरंजामी फौज फार मोठी असून तिचा उपयोग देशाच्या वेगळाल्या भागांच्या संरक्षणार्थ होत असे, व त्यांत या सरदारांनीं अनेकदां पराक्रम गाजवून मराठी सत्ता बसविली, वाढविली व तिला वैभव-शिखरावर पोहोंचविलें यांत शंका नाहीं. मराठ्यांना श्रीशिवछत्रपतींनीं संघटित करून मराठी सत्ता वाढवून धर्मसंस्थापना केल्यामुळें त्यांस अत्यंत संकटांत काळ काढावा लागे. परिस्थित्यनुरूप त्यांस " गनिमीकाव्याची लढाई " करावी लागे, व त्यामुळें त्यांस एका जागीं तळ देऊन धीमेपणानें लढाई करणें माहीत नव्हतें. विद्युल्लतेप्रमाणें आज येथें तर उद्यां तेथें याप्रमाणें सतत फिरतें राहून कोठेंच शत्रूच्या दृष्टीस न पडतां मुलुखगिरीचें कार्य करावें लागल्यानें त्यांची मदार सर्वस्वीं घोडदळावर अधिक असे. जमिनीवर पाय रोखून युद्ध करण्याची प्रथा प्रथमतः सदाशिवराव भाऊ पेशव्यांनीं पानिपतास पाडली, परंतु त्यांत त्यांस अपयश आलं. ही लढाऊ पद्धति मोंगल सरदारांस जेर करण्यास कारणीभूत झाली, पण तिचा इंग्रज सैन्याशीं प्रसंग येतांच तितकासा उपयोग होईनासा झाला, व म्हणून पुढेंपुढें मराठ्यांस पायदळ वाढविण्याची अवश्यकता वाटूं लागली व कवायती सैन्य असावें असें वाटूं लागल्यानें त्या पद्धतीचा उपक्रम शिंद्यांनीं आपल्या सैन्यांत केला हें इतिहासप्रसिद्ध आहे. ह्या वेळच्या अशांत-तेच्या काळीं हिंदुस्थानांत लष्करी शाळा नव्हत्या, व कवायतीची शिस्तशीर पद्धति प्रचलित नसल्यामुळें तिची उणीव त्यांस पाश्चात्यांच्या सैन्यापुढें पदोपदीं जाणवूं लागली होती. महाराष्ट्रीय सैन्यांतील शेतकरी आपल्या देशाचें संरक्षण करीत, परंतु त्यांस महाराष्ट्राच्या बाहेर जाणें जीवावर येई. याच्या उलट मराठी लष्करांत शेतीवाडी नसलेले, परंतु अंगीं लष्करीबाणा असलेले उदरंभरणार्थी उत्तर हिंदुस्थानी, गोसावी वगैरे, तसेंच परदेशस्थ अरबी लोक पायदळांत भरती होत. त्यांस घरदार व जमीनजुमला नसल्यानें ते कोठेंहि जाण्यास तयार असत, व त्यामुळें उत्तरेस होळकर शिंदे, गुजराथेंत गायकवाड, यांच्या सैन्यांत या लोकांचा अधिकीचा भरणा असे. परंतु एक गोष्ट मात्र यावरून सिद्ध होते व ती ही कीं आजच्या ब्रिटिशांच्या हिंदी फौजेप्रमाणें त्यावेळी फौजेंत अमुकच लोक घ्यावयाचे असें धोरण नसून प्रायः लढाऊवृत्तीच्या लायक माणसांस जातपात भौगोलिक अभिमान यांचा विचार न करतां सैन्यांत भरती करीत असत. शत्रूची तयारी गुप्तपणें अथवा उघडपणें पाहून त्याबरहुकूम आपली

तयारी ठेवणें, आपल्या सैन्यांत नसलेल्या, परंतु उपयुक्त सुधारणा लष्करांत घडवून आणणें, व संरक्षणक्षमतेंत न्यूनत्व न ठेवणें हें लष्करी मुत्सद्यांचें आद्य कर्तव्य असतें व तसें तें महादजी शिंद्यांनीं ओळखून वाढत्या इंग्रजी सत्तेशीं झुंज देण्यासाठीं म्हणून फ्रेंच सेनानी डिबॉइनच्या मदतीनें कवायती फौज उभारून भाला तरवार सोडून, बंदुकींतून निशाणबाजी करणारे शिपाई तयार केले व आपले सैन्यांत २० हजार पायदळ व १० ह. नजीब ( बंदुकवाले शिपाई), भरभक्कम तोफखाना व ३ ह. तुरुकस्वार तयार केले. ( मराठे व इंग्रज उत्तरार्ध, पान ५२ ).

शिवछत्रपतींनीं ज्याप्रमाणें खुष्कीवरील सैन्य उभारलें त्याचप्रमाणें मुंबई ते खाली रत्नागिरी व कारवार प्रांतापर्यंतच्या समुद्रकिनाऱ्याचें रक्षण करण्यासाठींही आरमाराची स्थापना केली असून इ. स. १६७९ मध्यें इंग्रजांच्या आरमाराचा पराजयहि केला होता. त्याचप्रमाणें विजापूर व मोगल पादशाहीस मदतनीस जो जंजिऱ्याचा शिद्दी त्यासहि अनेक वेळां मागें हटावयास लाविलें होतें व याप्रमाणें आपल्या मराठी आरमाराची जरब इंग्रज व शिद्दी यांस बसविली होती. या आरमारावरील मुख्य सरदार किंवा सेनानायक मुसलमान होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १६६५ मध्यें शिवाजीच्या आरमारांत ८५ तारवें ( फिग्रेट्स ) व तीन जहाजें ( शिप्स ) होतीं. इंग्रजांच्या मुंबई बंदराचा आश्रय करून शिवाजीच्या कुलाँ वगैरे प्रांतावर आक्रमण करण्याचा घाट शिद्दी घाली, परंतु शिवाजीच्या भीतीनें इंग्रजांनीं उघड उघड अशी मदत कधींच फारशी शिद्द्यास केली नाहीं. यानंतर इ. स. १७०७ नंतर मराठ्यांचे आरमाराचा मुख्य सेनानायक कान्होजी आंग्रे यानें इंग्रजांशीं अनेक चकमकी केल्या व आपल्या हयातींत इंग्रजांस दाद दिली नाहीं. मुंबई ते सावंतवाडीपर्यंतचा सर्व किनारा कान्होजीनें आपल्या ताब्यांत आणला व शाहू छत्रपतीनें त्यास खांदेरी, सुवर्णदुर्ग, कुलाबा व विजयदुर्ग हे किल्ले देऊन त्यास "सरखेल" ही पदवी दिली. तो परदेशच्या सर्व सांपडणाऱ्या जहाजांपासून चौथाई वसूल करी. त्याचेजवळ १६ ते २० तोफांचीं दहा मोठीं गलबतें व ४ ते १० तोफा चढविलेलीं सुमारें ५० लहान गलबतें असत. या सुमारास इंग्रजांचे आरमारांत ३२ तोफांचें एक गलबत, २० ते २८ तोफांचीं ४ गलबतें, ५ ते १२ तोफांचीं २० गलबतें असून त्यास सुमारें ५ लक्ष रुपये सालीना

खर्च येत असे. याप्रमाणें मराठ्यांपेक्षां इंग्रजांचें आरमार मोठें असूनहि त्यांना मराठी आरमारावर म्हणण्यासारखा मोठा विजय मिळवितां आला नाहीं, इतकेंच नव्हे तर १७३१ मध्यें कान्होजीचा मृत्यु होईंपर्यंत उलट कान्होजीनें १७१७ मध्यें इंग्रजांचें "सक्सेस" नांवाचें जहाज पकडलें, व त्याबद्दल रागावून इंग्रजांनीं विजयदुर्गास वेढा दिला, पण कांहीं परिणाम न होतां १८ एप्रिल १७१७ रोजीं इंग्रज आरमाराचा मोठा पराजय होऊन त्यांस परत फिरावें लागलें. १७१८ त इंग्रजांनीं खांदेरीवर हल्ला केला, पण येथेंहि मोड होऊन त्यांना माघार घ्यावी लागली. १७२० मध्यें इंग्रजांचें शार्लट नांवाचें जहाज पकडून त्यास विजयदुर्गच्या बंदरांत अडकवून ठेवलें. कोंकण किनाऱ्यावर सर्वत्र तटबंदी करून मोर्च्यांचे तळहि बांधून ठेविले होते. १७२२ मध्यें इंग्रज व पोर्तुगीज यांनी मिळून कुलाब्यावर स्वारी केली, व तींतहि त्यांचा मोड झाला. १७२४ मध्यें डच लोकांच्या आरमारी काफिल्यानें विजयदुर्गावर हल्ला केला पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं. १७२७ मध्यें आंग्र्यांनीं पुनः इंग्रजांचें एक मोठें व्यापारी जहाज पकडलें व १७२९ मध्यें किंग वुइल्यम् नांवाचें कंपनीचें जहाज पकडलें व त्याचा कॅप्टन मॅकनील यास कैद केलें. याप्रमाणें दर्यावर्दी इंग्रज, डच व पोर्तुगीज लोकांचे अनेक हल्ल्यांस तोंड देऊन त्यांना माघार घ्यावयास लावण्याइतकें शौर्य, चिकाटी, धाडस आणि शक्तिहि मराठ्यांच्या आरमारांत होती या गोष्टी प्रत्यक्ष घडलेल्या इतिहासानें सिद्ध केल्या आहेत.

यानंतर कान्होजी आंग्र्याचा दासीपुत्र मानाजी आंग्रे हा पुढें सरसावला व त्यानेंहि हबशी व इंग्रज यांस खडे चारून शत्रूचें आरमार व शिद्दी याचे किल्लेहि घेतले. यानंतर मानाजी व संभाजी या दोन आंग्रे भावांतील भांडणामुळें पुढें पुढें मराठी आरमारावर आपत्ति ओढवली. १७३७ मध्यें मराठ्यांनीं ठाणें हस्तगत केलें व नंतर तारापुर हस्तगत करून १७३९ मध्यें वार्सोवा हें ठिकाण घेऊन वसईस वेढा देऊन पोर्तुगीजांवर हल्ला केला व अखेरीस चिमणाजी आपा पेशवे या सरदारानें वसई पोर्तुगीजांकडून जिंकून तिला मराठी राज्यांत सामील केलें व अखेर पेशवा बाजीराव यांजशीं १४ ऑक्टोबर १७४० रोजीं तह केला, त्यांत असें ठरलें कीं चौल व महाडचे किल्ले पेशव्यांस द्यावे व मराठ्यांनीं साष्टींतून आपल्या फौजा परत न्याव्या. हा तह इंग्रजांच्या मध्यस्थीनें

ठरला. पुढें पेशवे व आंग्रे यांचा आपसांत बेबनाव होऊन पेशव्यांनीं आंग्र्याविरुद्ध इंग्रजांची मदत घेऊन त्याचा १७५५ मध्यें पाडाव केला व यापुढें आंग्र्याच्या सत्तेला आपसांतील कलहानें ओहोटी लागली.

याप्रमाणें मोंगलांस जेरीस आणणारी मराठी सत्ता केवढी प्रबल होती व त्या वेळचे महाराष्ट्रांतील लोक कसे निधड्या छातीचे लढवय्ये होते हें दिसून येईल. यानंतर आपण म्हैसूर प्रांतांतील राजकीय घडामोडींकडे वळूं.

म्हैसूर प्रांतांत १७६५ च्या सुमारास हैदरअल्ली हा राज्य करीत असून तो मोठा धूर्त, राजकारणी व रणधुरंधर समजला जात असे. महाराष्ट्रांत व उत्तर हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें सर्व अधिकारसूत्रें जवळ जवळ मराठमंडळाचे हातीं होतीं तशींच तीं म्हैसूर प्रांतांत हैदरअल्लीकडे होतीं. या प्रांतांतहि आपली भेद-नीति पसरवून हा प्रांत घशांत घालण्यासाठीं इंग्रजांचे यापुढें प्रयत्न सुरू होते. १७६७ मध्यें हैदरअल्ली व इंग्रज यांमधील पहिले युद्धास प्रारंभ झाला. यावेळीं हैदरअल्लीजवळ दोन लक्ष सैन्य होतें व त्यास निजामचें ५० ह. सैन्य मदतनीस म्हणून मिळालें होतें. पहिल्या चकमकींत हैदरचे कांहीं किल्ले व बराचसा प्रांत इंग्रजांनीं जिंकून घेतला, परंतु पुढें हैदरअल्लीनें हे सर्व किल्ले एकामागून एक घेण्याचा सपाटा चालविला व इंग्रजांचा जनरल स्मिथ व त्याची सेना यांस हार खाऊन माघार घ्यावी लागली. याच वेळीं हैदरअल्लीचा मुलगा टिपु सुलतान यानेंहि मद्रासचा सेंट टॉमसचा पहाड व बाकीचा भाग जिंकला व मद्रासचे गव्हर्नरास पळून जावें लागलें ! ( " भारतमें अंगरेजी राज्य, भाग १, पा. ३२२ ) यानंतर निजामवाडी, आंबूर वगैरे किल्ले हैदरनें इंग्रजांपासून जिंकून घेतले. नंतर टिपूनें मंगरूळ जिंकलें. यावेळीं त्यानें ४६ इंग्रज अधिकारी, ६८० इंग्रज शिपाई व ६००० हिंदी शिपाई कैद करून ठेवले ! यानंतर इंग्रज बंगलोरकडे वळले, पण यांतहि इंग्रज हैदरअल्लीपुढें टिकाव धरूं शकले नाहींत. तेव्हां हैदरअल्ली मद्रासवर चाल करून गेला. त्यानें तीन दिवसांत १३० मैल ताब्यांत घेऊन तो मद्रासच्या जवळ दहा मैलांवर जाऊन थडकला. यानंतर हैदरशीं इंग्रजांनीं तह केला. या बाबत कर्नल मॅलेसन आपल्या " Decisive battles " नामक पुस्तकांत म्हणतोः—

" Hyder in fact was master of the situation. The native town and the private houses of Madras were at his mercy.

In the panic which his arrival had caused the fort itself might have fallen. He was in a position to dictate his own terms, and virtually he did dictate them." "वस्तुतः हैदरअल्ली परिस्थितीचा मालक होता. मद्रासचें नेटिव्ह शहर व खाजगी मालकीचीं घरें त्याच्या आधीन होतीं. त्याच्या येण्यानें उडालेल्या गर्दीत खास किल्लासुद्धां पडता. पाहिजे तें त्यास हुकमतीनें सांगतां आलें असतें, व तें त्यानें तसें सांगितलें देखील."

यानंतर १७८० मध्यें अर्काटच्या नबाबानें इंग्रजांच्या बळावर हैदरशीं झगडा करण्यास प्रारंभ केल्यामुळें कर्नाटक सर करण्याचा हैदरअल्लीनें उपक्रम करून कर्नाटकांतील इंग्रज सेनापति कर्नल कॉस्बीच्या हातीं असलेले अनेक किल्ले जिंकण्याकरितां आपल्या फौजांचे विभाग पाडून ते स्वतः टिपु सुलतान, दुसरा मुलगा भाई करीम व इतर हिंदु व मुसलमान सेनानायकांचे आधिपत्याखालीं देऊन वेगळाल्या दिशेनें कर्नाटक जिंकण्यास त्यांची रवानगी केली व यांत अनेक प्रसंगांत कर्नल कॉस्बीस हैदरअल्लीच्या सैन्यापुढें हार खावी लागली. तेव्हां हैदरनें इंग्रजांवर अपूर्व विजय संपादन करून महमूदबंदर त्यांचेपासून जिंकून घेतलें. पूरीमपाकच्या लढाईंत टिपूचा विजय होऊन इंग्रजांची तशीच अर्काटच्या नबाबाच्या सेनेची फार हानि झाली. इंग्रजांचे ७०० सैनिक मारले गेले व कर्नल बेली, सर डेव्हिड बेअर्ड वगैरे मोठाल्या लष्करी अधिकाऱ्यांसमवेत अंदाजें २००० वर इंग्रज लोक हैदरनें गिरफदार केले. जनरल मनरो आपल्या सेनेसहित गंजीला तळ करून राहिला होता व हैदरअल्ली आपणांवर चालून येत आहे असें पाहून त्याचा जीव घाबरून त्यानें मद्रासला आपली पीछेहाट केली. अर्काटची लढाई तीन महिने चालून अखेर अर्काटचा किल्ला व शहर हैदरच्या हातीं आलें. या अपेशानंतर मद्रासच्या बचावासाठीं सर आयर कूटच्या आधिपत्याखालीं एक मोठी सेना देऊन त्यास रवाना केलें (१७८१). तीन वेळ सर आयर कूट व हैदरअल्ली यांच्यामध्यें लढाया झाल्या व प्रत्येकींत हैदरच यशस्वी झाला. अखेरीस १७८५ मध्यें आयर कूट बंगाल्याकडे निघून गेला. हैदरअल्लीची एकूण सेना ३ लक्ष २४ हजार असून त्यांत १९ ह. घोडेस्वार, १० ह. गोलंदाज, १ ल. १५ ह. पायदळ व १ ल. ८० ह. इतर लोक असे विभाग पाडले होते. याशिवाय त्यानें एक आरमारहि तयार केलें होतें. हैदरच्या मृत्यूनंतर

१७९० मध्यें म्हैसूरवर जनरल मीडोजच्या आधिपत्याखालीं मोठी इंग्रजसेना रवाना करण्यांत आली, पण यांतहि जनरल मीडोजचाच पराजय झाला व टिपूला यश आलें. हैदरप्रमाणेंच टिपूनें आपले सैन्यांत युरोपियन अधिकारी व शिपाई ठेविले होते. त्यांनीं बरेच दिवस टिपूस सहाय्य केलें पण ऐन वेळेवर त्याचा विश्वासघात करून ते त्यास सोडून शत्रुपक्षास जाऊन मिळाले ! यासंबंधांत थॉर्नटन आपल्या "History of British India" नांवाच्या पुस्तकांत म्हणतो:—

" Tipu's European servants were now quite as ready to exercise their skill and knowledge for his destruction as they had previously been assiduous in using them for his defence. "

( भारत में अँगरेज़ राज, भाग १ पृ. ३७८. )

" टिपु सुलतानाच्या युरोपिय नोकरांनीं प्रथम आपलें जें ज्ञान व चातुर्य त्याच्या संरक्षणार्थ खर्चीं घातलें तेंच त्यांनीं त्याच्या नाशासाठीं कामीं आणण्याचें ठरविलें. "

याचप्रमाणें बंगाल, बिहार, व ओरिसा या तीन प्रांतांचा सुभेदार अलीवर्दीखान मेल्यावर त्याचा नातू सुराजुद्दौला हा त्या जागीं सुभेदार होता. त्याच्या व इंग्रजांच्या अनेक झटापटी प्रथम झाल्या त्यांत इंग्रजांनाच हार खावी लागली होती. इ. स. १७५७ मध्यें प्रसिद्ध असलेल्या प्लासीच्या लढाईंतहि सुराजुद्दौला याकडेच प्रथम यशाचें पारडें होतें. या वेळींहि नबाबाच्या फौजेंत मुख्य सेनापति मीरजाफर असून त्यास मदतगार म्हणून यारलुत्फखां व राजा दुर्लभराम आणि मीर मुइउद्दीन उर्फ मीर मदन हें असून पहिल्या तीन सेनानायकांचे आधीन ४५ ह. सैन्य व मीर मदनच्या हाताखालीं १२ ह. सेना होती. यांत क्लाइव्हला विजय मिळाला तो त्याच्या शूरत्वामुळें नसून हिंदी सेनानायक मीर जाफर व लुत्फखां वगैरे लोकांचे विश्वासघातामुळें मिळाला असें कर्नल मॅलेसन आपल्या " Decisive battles " नांवाच्या पुस्तकांत लिहितात.

हा ग्रंथकार म्हणतो:—"It was only when treason had done her work, when treason had driven the Nabab from the field, when treason had removed his army from its commanding

position that Clive was able to advance without the certainty of being annihilated."

युद्धास प्रारंभ झाल्यावर मीर जाफर आपल्या ४५ हजार सेनेसहित इंग्रजांस जाऊन मिळाला व फक्त नबाबाच्या बाजूस मीर मदन आपल्या १२ हजार सैन्यासह इंग्रज व त्यांस जाऊन मिळालेला घरभेद्या मीर जाफर यांजशीं लढत राहिला. मीर मदन मारला गेला, व नंतर नबाब लाचार होऊन मुर्शिदाबादकडे पळून गेला. यानंतर मीर जाफर या तीन प्रांतांचा सुभेदार बनला. या प्रांतांत बिहार प्रांताचा अधिकारी राजा रामनारायण, ओरिसाचा राजा समरसिंह, पूर-नियाचा राजा युगुलसिंह व मीर जाफरचा मदतगार राजा दुर्लभराम हे हिंदु नरेश आपापलीं संस्थानें संभाळून मुख्य नबाबास मदत करीत. या सर्वांच्या वेगवेगळ्या तैनाती फौजा असत, व ते सर्व साहसी व शूर योद्धे होते; पैकीं समरसिंहाजवळ २ हजार घोडदळ व ५ हजार पायदळ एवढी सेना असून तो सहसा कोणासहि हार जाणारा नव्हता.

मीर जाफर नंतरचा बंगालचा नबाब मीर कासीम यानेंहि आपली सेना व्यवस्थित ठेविली होती. मुर्शिदाबाद सोडून त्यानें मोंघीरला आपली राजधानी हालविली व तेथें मजबूत किल्ला बांधून जवळ जवळ ४० हजार सेना उभारली व त्यांस युरोपीय पद्धतीचें लष्करी शिक्षण दिलें. याखेरीज त्यानें तोफा ढाळण्याचाहि कारखाना काढला. जून १७६१ मध्यें पाटणा शहरावर एकाएकीं छापा घालून इंग्रजांनीं त्यावर आपला कबजा केला. त्यास तोंड देण्यासाठीं मीर कासीमचें सैन्य चालून गेलें व त्यांत तो यशस्वी झाला. या लढाईत इंग्रजांकडचे ३०० युरोपीय अधिकारी व २५०० हिंदी लोक कामीं आले व त्यांत एलिस व त्याचे साथीदार इंग्रज अधिकारी कैदेंत पकडले गेले. ( भारत में अँगरेज़ी राज, भाग १ पान १८४ ).

हैदरअल्ली व टिपु सुलतानप्रमाणेंच मीर कासीमनेंहि आपल्या सैन्यांत परदेशी आर्मीनियन व इतर युरोपियन लोक सैन्यांत ठेवण्याची घोडचूक केली, व तिचें प्रायश्चित्तहि त्यास तसेंच मिळालें. सुमारें २०० आर्मीनियन, इतर युरोपियन सैनिक व अधिकारी यांच्या हातीं तोफखाना देण्यांत आला होता. हे लोक ऐन वेळीं मीर कासीमला सोडून इंग्रजांस सामील झाले. उदवानालाच्या लढाईत मीर कासीमनें एक महिना किल्ल्यांत बसून इंग्रजांच्या वेढ्यास तोंड दिलें व

इंग्रजांच्या सैन्याचा बराच नाशहि केला, परंतु सैन्यांत सामील असलेला एक इंग्रज व कांहीं आर्मीनियम यांनीं इंग्रज सेनापति मेजर ॲडम्सबरोबर गुप्त पत्रव्यवहार करून ४ सप्टेंबर १७६३ रोजीं एका गुप्त मार्गानें इंग्रज सेनेला किल्ल्यांत अचानक सोडून मीर कासीमचे सैन्यावर हल्ला चढविण्यास लाविलें व सैन्यांतील विश्वासघातामुळेंच इंग्रजांना यश आलें. याबद्दल एक इंग्रज लिहितोः—

"It was the act of a single individual which converted the despair of the English into confidence. It was the consequence of that act which changed the confidence of Mir Kassim's army into despair." "इंग्रजांच्या मनांत निराशेच्या जागीं आत्मविश्वास उत्पन्न करण्याचें कार्य फक्त एकट्याचें हातून घडलें, व या एकट्या कृत्याचा परिणाम म्हणजे मीर कासीमच्या सैन्याचा विश्वास मावळून त्याजागीं निराशेनें ठाणें दिलें हा होय."

आपणाला ऐतिहासिक सत्याचा पुरावा घेऊनच हिंदुस्थान राष्ट्राच्या लष्करी धोरणाचा अंदाज बांधावयाचा आहे. दक्षिण हिंदुस्थानांत महाराष्ट्र, म्हैसूर वगैरे प्रांतांतील हिंदी माणसांच्या लष्करी कामगिरीचा थोडासा परामर्ष घेऊन बंगालचें धांवतें अवलोकन करून नंतर आपण पंजाबच्या शीखांकडे वळूं.

पंजाबचीं लहान लहान संस्थानें एकत्रित होऊन त्यांचें एक संयुक्त मंडळ बनलें असून त्याचा मुख्याधिकार लाहोरचा राजा रणजितसिंग यांजकडे होता. यशवंतराव होळकर हा मराठा संघाचा एक घटक असून तो उत्तरेकडे पंजाबचें सहाय्य घेऊन हिंदुस्थानांत इंग्लिशांचें बसत चाललेलें बस्तान काढून टाकण्याचा प्रयत्न करीत होता. त्यास पंजाबनें मिळूं नये म्हणून इंग्लिश लोकांनीं प्रयत्न केले व त्यांत शीख राजे रणजितसिंह यांनीं यशवंतरावांस मदत देण्याचें कबूल न करितां त्यांचें सहाय्य इंग्रजांसच झालें; असें असूनहि इंग्रजांनीं अनेक युक्तिप्रयुक्ति करून रणजितसिंहाशीं युद्धाचे प्रसंग आणले. सबंध शीखसाम्राज्य एक व्हावें ही इच्छा असेल कीं काय सांगवत नाहीं; परंतु राणा रणजितसिंहानें सतलज नदीच्या दक्षिणेकडील भागांतील कांहीं प्रांत मिळविण्याचा प्रयत्न केला होता. दुआबमधील राजे लोकांत रणजितसिंहाबद्दल असंतोष होता व शीखांचें साम्राज्य वांचावें व त्यांत आपल्या हातीं कारभार रहावा या महत्त्वाकांक्षेनें रण-

जितसिंहानें कंपनीबरोबर १८०९ मध्यें तह केला. परंतु तत्पूर्वीं त्यानें १८०३ मध्यें केलेल्या पत्रव्यवहारावरून ब्रिटिशांनीं रणजितसिंहास मदत देण्याचें स्वीकारल्यास सतलजच्या दक्षिणेकडील हिंदी विभाग इंग्रजांस देण्यास त्याची हरकत नव्हती. रणजितसिंहानें स्वराज्याचे रक्षणासाठीं फ्रेंच व इटालियन अधिकारी नेमून त्यांचे करवीं उत्कृष्ट सेना उभारली होती व १८४५ मध्यें त्याच्याजवळ ८८६६२ सैन्य असून, त्यांत ५३७५६ पायदळ, ४८४ तोफा व ३०८ उंटावरील जेजाला होत्या. रणजितसिंहानें शीख लोकांचें संघटन करून त्यांच्यामध्यें राष्ट्रीयत्व उत्पन्न केलें होतें व त्यायोगें त्याचे मृत्यूनंतर इंग्रजांच्या कुटिल नीतीनें दोन शीख युद्धें झालीं. त्या दोन्ही संग्रामांत शीखांनीं वर्णनीय पराक्रम गाजविला. येनकेन प्रकारेण कोणतें तरी कारण पुढें करून प्रांत जिंकावयाचे व ते कंपनी सरकारच्या राज्यांत सामील करावयाचे, व असें करतांना कोणाला जहागीर दे, तर कोणाला पैसे चार, तर इतरांवर दुसरा कोणता तरी प्रयोग कर–अशी हिंदी लोकांत फूट पाडून परस्परांचा विश्वासघात करावयास एकमेकांना प्रवृत्त करावयाचें, यामुळें कंपनीसंबंधानें हिंदी लोकांत असंतोष वसत असे व महाराज दिलीपसिंह या रणजितसिंहाच्या लहान अभिषिक्त राजाविरुद्ध इंग्रजांनीं १८४५ मध्यें लाहोरला सैन्य पाठविल्यामुळें शीख लोक नाराज झाले व त्यांतून शीखांचें पहिलें युद्ध उद्भवलें. यांत मुडकीच्या संग्रामांत शीखांचा विश्वासघातकी राजा लालसिंह व तेजसिंह यांच्या कारवाईमुळें शिख सैनिकांस पुरविलेल्या गोळ्यांत सरस व बारुदीच्या जागीं रंगविलेली कणिक पाठविल्यानें शीख लोकांच्या बंदुकी चालेनाशा होऊन त्यांस अपयश घ्यावें लागलें! शीखांचा पराक्रम कमी पडला नाहीं, इंग्रजांची भेदनीति त्यांस नडली.

यानंतर फिरोजशहरला एक संग्राम झाला त्यांत शीखांचा विजय झाला. यांत स्वतः गव्हर्नर-जनरल लॉर्ड हार्डिंज हा झालेल्या इंग्रजांच्या हानीमुळें एवढा घाबरला कीं इंग्रज अधिकारी व त्यांचीं मुलेंबाळें यांस तेथून काढून पिच्छेहाट करूं लागला. यानंतर अलीवाल व सुचराव येथेंहि लढाया झाल्या. त्यांत शीख सैन्यांतील शीख लढवय्ये असूनहि त्यांचे सेनानी इंग्रजांस आंतून मिळाले होते म्हणूनच शीखांचा पराजय झाला असें कनिंगहॅमप्रभृति इंग्रज इतिहासज्ञच लिहितात. पतिआला नरेशहि प्रलोभनामुळें इंग्रजांस मदतगार झाले होते व

त्यांनीं इंग्रज सेनेला आपल्या हद्दीतून दिलीपसिंहावर जाण्यास परवानगी दिली होती. १८४६ मध्यें दुसरें शीख युद्ध झालें. त्याचे आधीं मुलतानचे दिवाण मुलराज याजबरोबर संग्राम झाला व त्यांत इंग्रजांस मुलतान सोडून मागें वळावें लागलें ( भा. अं. स. भाग ३ पृ. १३०० ). १८४९ मध्यें चिलियनवाला येथें शीख व इंग्रज यांच्या दरम्यान घनघोर रणकंदन झालें. त्यांत इंग्रजांकडील २३ हजारांवर लोक जखमी झाले, २६ इंग्रज अधिकारी मारले गेले व ६६ जखमी झाले. हा शीखांचा अखेरचा विजय होय.

यशवंतराव होळकरांस पंजाबकडून आश्रय न मिळाल्यामुळें त्यानें भरतपुर-कडे आपला मोर्चा वळविला. त्यास भरतपुरच्या राजानें मिळूं नये म्हणून इंग्रजांनीं जारीचे प्रयत्न केले. १८०४ च्या जुलै महिन्यांत जनरल मॉन-सननें आपली प्रचंड सेना होळकरांच्या मुलखांत उतरवून भानपुऱ्यानजीकचा इंग्लासगड किल्ल्याचा कबजा केला व चंबला नदी पार करीत होळकरांच्या प्रांतांत घुसूं लागला. त्यास तोंड देण्यासाठीं यशवंतराव होळकर चंबलच्या दुसऱ्या किनाऱ्यानें येत होता. शिंद्याच्या ताब्यांतील अलीगडचा किल्ला विश्वास-घातकी लोकांनीं इंग्रजांच्या स्वाधीन केला ! होळकर होस्याकडे वळले व मॉन-सनच्या अपार सेनेचा त्यानें पराभव करून त्यास पळावयास लाविलें. ( ६ जुलै १८०४ ). ११ जुलै रोजीं मॉनसनचा पाठलाग करणाऱ्या यशवंतराव होळकरानें पुनः घनघोर रणसंग्राम करून मॉनसनच्या असंख्य सैन्याचा फडशा उडविला. यानंतर मॉनसनला मदत करण्यास जनरल लेक येऊन पोहोंचला. परंतु २२ ऑगस्ट १९०४ पर्यंत रामपुरा सोडण्यास मॉनसन भीत होता. मॉनसननें राम-पुरा सोडतांच २३ ऑगस्टला होळकरानें पुनः बन्नस नदीवर आपले तंबू ठोकून २४ रोजीं युद्धाला आरंभ केला व त्यांतहि मॉनसनचा पराभव होऊन तो पळत पळत अखेरीस कुशलगडला पोहोंचला. यानंतरहि अनेक लहानसहान लढाया झाल्या व मार खात खात मॉनसन एकदांचा आग्र्यास पोहोंचला !

यानंतर उत्तर हिंदुस्थानांत मथुरा, सहाराणपुर वगैरे भागांत जनरल लेक याला तोंड देत असतां उत्तर हिंदुस्थानांत यशवंतराव होळकरास मदत मिळेना म्हणून तो परत फिरत फिरत भरतपुरास पोहोंचला. तेथील राजाहि इंग्रजांचा मदतगारच होता, परंतु त्यानें होळकरास आसरा दिला. यावेळीं यशवंतरावाचा तीन बाजूंनीं इंग्रजी सेना पाठलाग करीत होती. यशवंतराव पुढें व जनरल लेक

मार्गे असा हा संग्राम चालू असूनहि जनरल लेकला होळकरावर एकदम हल्ला करावयाची भीतिच वाटत होती. होळकराची सेना डीगच्या नजीक होती. तिचा व इंग्रजांचा जनरल फ्रेजर याच्या हाताखालील सैन्याचा मुकाबला १३ नोव्हेंबर १८०४ रोजीं झाला. त्यांत होळकरास अपेश आलें व त्यास भरतपुरकडे वळणें भाग पडलें. भरतपुरास होळकरांस आमचें स्वाधीन करा म्हणून राजे रणजितसिंह यांस इंग्रजांनीं निरोप पाठविला. त्यास राजांनीं नकार दिला. व ७ जाने. १८०५ रोजीं कंपनीच्या सैन्यानें भरतपुरावर गोळीबार करण्यास प्रारंभ केला. ९ जाने., १२ जाने. व २० फेब्रु. १८०५ रोजी असे तीन हल्ले इंग्रजी सेनेनें भरतपुरावर केले, व प्रत्येक वेळीं त्यांस माघार घ्यावी लागली. यावेळीं इंग्रजी सैन्यांतील इंग्लिश पलटणी ७५ व ७६ यांनीं कच खाल्ली असतांहि १२ व १५ नंबरच्या हिंदी पायदळ फौजेनें पराक्रम गाजविला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

" The Europeans however of His Majesty's 75 and 76 who were at the head of the Column, refused to advance. ...The entreaties and expostulations of their officers failing to produce any effect, two regiments of native infantry, the 12th and the 15th were summoned to the front and gallantly advanced to the storm." ( "*Mill*," Vol. VI. p. 426. भा. अ. स. भाग २, पान ७७५ )

येथवर दिलेले अनेक उतारे पाहून हिंदुस्थानांत पश्चिमेपासून पूर्वेपर्यंत व दक्षिणेपासून उत्तरेपर्यंत कोठेंहि सैन्याचे बाबतींत हिंदी लोकांनीं संस्थानिकांस अगर कंपनीस लढत करण्यासाठीं माणसांचा पुरवठा केला नाहीं असें दिसत नाही. शिवाय सर्व देशी राष्ट्रीय फौजांनीं चकमकींत इंग्रजांपुढें शिर नमविण्याचींहि उदाहरणें फारशीं दिसत नाहींत. हिंदुस्थान जिंकला गेला तो परस्परांतील केवळ बेबनावामुळें व इंग्रजांच्या कूटनीतीमुळें, आणि हिंदी संस्थानिकांच्या स्वार्थपरतेमुळें व विश्वासघातामुळें हेंच ऐतिहासिक सत्य स्पष्ट दिसतें. याप्रमाणें हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांतील लोक लढण्यास समर्थ होते ही गोष्ट आपल्या निदर्शनास येते. मग आजच हिंदी लोकांत विशिष्ट प्रांतांतले लोकच तेवढे लढाऊ व इतर बिन लढाऊ असे कां असावेत हा प्रश्न समोर उभा राहतो. कोणत्याहि देशांत पाहिल्यास साधारणतः उद्योगधंदेवाले, उदमी यापारी, व

उपाध्याय वर्ग हा विद्येचा, धर्माचा आणि आचाराचा पुरस्कर्ता, क्षत्रिय हा देशाचा रक्षणकर्ता, वैश्य हा देशाची संपत्ति वाढविणारा व शूद्र हा सेवाधर्म चालविणारा हीच पद्धति रूढ दिसते. परंतु प्रसंग पडल्यास हे वर्ण एकाद्या पोलादी चौकटीप्रमाणें घट्ट नसून त्यांच्या ठेवणींत परिस्थित्यनुरूप फरक घडत असत. नित्य कर्मांची वांटणी एका व्यवस्थेनें केली असली तर नैमित्तिक फरक त्यांत होत असत हें इतिहासांतील सत्य आहे. स्त्रियांना रणांगणांवर पाठवीत नाहींत म्हणून त्या लढूंच शकत नाहींत हा सिद्धान्त जसा खोटा त्याचप्रमाणें अमुक एका कालखंडांत विशिष्ट लोकांचा भरणा सैन्यांत नव्हता म्हणून ते लोक लढण्यास असमर्थ आहेत असा अर्थ करतां येत नाहीं. इतर ज्ञानाप्रमाणेंच लष्करी शिक्षण हें एक प्रकारचें ज्ञान असून तें प्राप्त करतो तो क्षत्रिय गणला जातो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चतुर्वर्णात्मक समाजानें आपल्या देशाच्या संरक्षणार्थ आपलें सर्वस्व खर्ची घातल्याचीं लाखों उदाहरणें हिंदुस्थानच्या इतिहासांत आहेत. ज्याप्रमाणें हिंदुस्थान आम्ही हातचा गमावला त्याचप्रमाणें त्याच हिंदुस्थानचे वेगळाले भागांत रणशौर्य गाजवून आज आम्हांवर जेते म्हणून राज्य करणारे इंग्रज व एक वेळ हिंदुस्थानवर साम्राज्य पसरवून बसलेल्या विदेशी इराणी, तुराणी, मोंगल, तुर्क वगैरे लोकांस आमच्या शौर्यापुढें माना वकावयास लाविल्या होत्या ही हिंदुस्थानच्या लोकांची पूर्वपरंपरा आहे. धर्मबंधनांत गुंतल्यावर शूर पांडवांस वनवासप्रसंगीं अंगावरील उंची वस्त्रें काढून ठेवल्यावर मदोन्मत्त दुःशासनानें "गाय रे गाय!" असे तुच्छतेनें उद्गार काढले त्याचा वचपा कौरवपांडव युद्धांत त्याच कौरवांस मिळाला हें ऐतिहासिक सत्य असून तें हिंदी लोकांच्या मनावर पूर्णतेनें बिंबलेलें आहे. आत्मज्ञानपूर्वक हिंदी लोकांनीं त्याचें स्मरण मात्र करावयास पाहिजे. असो. इंग्लंडच्या इतिहासांत तरी स्कॉटलंडच्या लोकांस शौर्यानें न जिंकतां त्यांच्यांतील विश्वासघातकी लोकांच्या सहाय्यानें स्कॉटलंड जिंकला गेला. त्याच इतिहासाची पुनरावृत्ति हिन्दुस्थानांतील वेगळाल्या भागांतील लहानमोठ्या लढायांत सारखी दिसून येते. परस्परांत चुरशीचीं भांडणें लावून देणें, खोटीं बनावट पत्रें लिहून तीं पाठवून द्वेष वाढविणें व मित्रसंधी फोडणें, नसत्या सबबी पुढें करून संकटांत सांपडलेल्या विधवा राण्यांचीं वतनें जप्त करून तीं आपल्या राज्यांत मिळवून घेणें—या व अशा अनेक गोष्टी

सांगतां येतील. राजकारणांत या गोष्टींचा अवलंब करावाहि लागत असेल व त्यास कदाचित् "चतुरता" हें नांवहि दिलें गेलें असेल, परंतु या गोष्टींस नीतीचे किंवा माणुसकीचे सदरांत खास टाकतां येणार नाहीं. सुराजुद्दौला, मीर-जाफर, मीर कासीम यांच्याबरोबर केलेल्या शब्दमोडी, मराठा मंडळाशीं संक-टांच्या कचाटींत सांपडले असतां तह करून पुनः ते मोडून भांडण उकरून काढून त्यांना जिंकण्याचा प्रयत्न करणें, पुरंदरचा तह, सालबाईचा तह, त्याच-प्रमाणें नागपुरकर भोसल्यांशीं वागणूक, सातारच्या प्रतापसिंह महाराजांशीं केलेली प्रतारणा, अयोध्येचा नबाब, बेगमा, पंजाबचे संस्थानिक, लाहोरच्या दिलीपसिंगांशीं वर्तणूक, रणजितसिंहाचे विधवा राणीशीं केलेली लबाडी, झांशीच्या राणीला दत्तक देऊन नंतर तो नाकारणें–अशा हजारों, नव्हे लाखों गोष्टी हिंदुस्थानचें स्वातंत्र्य नष्ट होण्याच्या मुळाशीं आहेत. यांत शौर्य, धैर्य, साहस यांचा फारसा संबंध येत नाहीं. हिंदी लोकांमधील भांडणें त्यांच्या नाशास कारणीभूत झालीं आहेत. हिंदी लोकांत शौर्य, धैर्य, कल्पकता, साहस, बुद्धिमत्ता, नेतृत्व, व्यवहार–कुशलता, काटकपणा वगैरे गुण इतर कोणत्याहि देशांतील सैनिकापेक्षां अधिक प्रमाणांत–निदान बरोबरीनें तरी खास आहेत. त्याचप्रमाणें पंजाबांतच काय ते शूर लोक असून बंगाल्यांत, मुंबई व मद्रास इलाख्यांत त्यांचा अभाव आहे असें नाहीं; शिवाय हिंदु–मुसलमान, ब्राह्मण–ब्राह्मणेतर यांचेमध्यें कोणी कमी तर कोणी अधिक असाहि हा विषय नाही. फरक असलाच तर तो कोणत्या भागांतील लोकांत लष्करी शिक्षणाचा अभाव आहे हा एकच. गुरखे ठेंगणे म्हणून ते कमी शूर, व पंजाबी उंच व पल्लेदार म्हणून अधिक शूर असेंहि नाहीं. मराठे ठेंगणे व जरा मध्यम बांध्याचे म्हणून त्यांच्यांत लष्करी गुण कमी नाहींत हें इतिहास नीट वाचणारास सहज समजेल. संघटनेचा अभाव व लष्करी शिक्षणाची कमतरता यामुळें, तसेंच शास्त्रसुज्जतेंत घडलेल्या अनेक क्रान्त्यांच्या ज्ञानाभावीं आज हिंदी शिपाई मागें पडलेला दिसत आहे. गेलीं दोन हजार वर्षें बेकी व संघटनेचा अभाव यांचें साम्राज्य माजलेलें दिसतें, त्यामुळें हिंदुस्थानवर विदेशी लोकांनीं आक्रमण चालविलेलें आहे तरी देखील हिंदी लोक त्यांच्याशीं झगडा करीत आलेच आहेत, व अनेकदां विदेशी लोकांस त्यांनीं आपल्या पराक्रमानें व राजकारणपटुत्वानें हार खावयास लाविली आहे. पानपतला १७६१ मध्यें गनिमीकाव्याची लढाई सोडून नवीनच समोरासमोर

ठाणीं मांडून युद्ध करण्याची पद्धति स्वीकारल्यावर सदाशिवराव भाऊ पेशवे व मराठे सरदार यांचा पराभव झाला, त्यायोगें मराठी राज्यविस्तारास मोठा धक्का बसला असें वाटणाऱ्या लोकांस १७६९ च्या सुमारास ह्याच मराठी सैनिकांनीं आपला विजयध्वज अटकेस नेऊन रोंविला व रोहिल्यांचा पाडाव केला या गोष्टीचेंहि स्मरण व्हावयास पाहिजे. उद्गीरच्या लढाईत सदाशिवराव भाऊंनीं प्रचंड विजय मिळविला, परंतु पानिपतानंतर व नानासाहेबांच्या मृत्यूनंतर पेशव्यांचे घरांत श्री. माधवराव व राघोबादादा यांच्यांत भेद पडल्यामुळें निजामानें पुनः पुण्यावर चाल करून महाराष्ट्र जिंकण्याचा यत्न केला त्यास १० ऑगस्ट १७६३ मध्यें माधवराव पेशव्यांनीं राक्षसभुवनचे लढाईत नामोहरम केलें. मराठ्यांच्या वाढत्या सत्तेपुढें रोहिले, अयोध्येचा नबाब व खुद्द दिल्लीचे तक्ताधिपति बादशहा यांस त्यांची भीति वाटे, व १७७२ मध्यें मराठ्यांच्या सैन्यानेंच अखेर शहाअलम बादशहास स्वहस्तें पादशाहितीवर बसविलें व त्यावर खूष होऊन बादशहानें पेशव्यांस वजीरातीचीं वस्त्रें दिलीं. असले अनेक बहारीचे प्रसंग वर्णन करण्यासारखे असून सर्व प्रसंगीं ब्राह्मण, मराठे, जाठ, रोहिले, रजपूत इत्यादि जमातींचीं अचाट शौर्याचीं कृत्यें व लष्करी कामगिरी व शिपाईगिरी जगाच्या नजरेस आली आहे. हिन्दी लोकांच्या अंगच्या क्षत्रियवृत्तीची जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे ! असो.

हें सर्व पाहिल्यावर हिन्दी लोकांत लष्करी बाबतींत कोणत्याही प्रकारें फरक करण्याचें कारण नाहीं हें लक्षांत येईल. परंतु गेलीं पन्नास पाऊणशें वर्षें मात्र कांहीं कारणामुळें हिन्दी लोकांत हा भेद मानला गेला असून विशिष्ट जातींस लष्करांत मज्जाव करण्यांत आल्यानें ते लोक सैनिकांत अगर अधिकाऱ्यांत झळकूं शकत नाहींत, व त्यामुळें त्या त्या जमातीचे लोक लढवय्ये नाहींत असा गैरसमज मुद्दाम पसरविला जातो व तो न्यूनगंड त्या त्या जमातींतील तरुणांच्या अंतःकरणांत उत्पन्न केला जातो. याचीं कारणें शोधून त्यांचें निरसन करण्यास काय केलें पाहिजे या महत्त्वाच्या मुद्यांचें विवेचन प्रसंगानुसार पुढील प्रकरणांत येईलच.



# भाग ६

# लष्कराचें हिंदीकरण

" Self-government without an effective Indian Army is an impossibility and no amount of protests or demonstrations or denunciations of the Imperial Government can avail to alter the fact." ( Prof. Keith's observations quoted in *Statutory, Commission Report*, p. 98 )

" कार्यक्षम अशा हिन्दी फौजेविना स्वायत्तता अशक्यच आहे व साम्राज्य सरकारची निंदा करणें किंवा निषेध करणें अथवा निषेधाचीं दृश्यें उभीं करणें यानें प्रत्यक्ष परिस्थिति बदलूं शकणार नाहीं. "

" We are only concerned here to convey a double warning—a warning on the one hand that Britain cannot indefinitely treat the present Military organisation of India as sacrosanct and un-alterable, but must make an active endeavour to search for such adjustments as might be possible."

( *Indian Commission Report*, Vol. 1, Chapter 10, P. 107 )

" आम्हांला फक्त दोन्ही बाजूंस इजारा द्यावयाचा आहे तो एका पक्षीं असा की, सध्यां अस्तित्वांत असलेली हिन्दुस्थानची लष्करी संघटना अचल व पवित्र आहे असें ब्रिटननें सदैव मानूं नये व शक्य असतील त्या गोष्टी मिळत्या जुळत्या करण्याचा सदोदित प्रयत्न करावा. "

" But Indianisation is a problem which admits of no fascile solution, and least of all one based upon the automatic application of a time table."

( *Joint Committee Report*, Vol. 5, p. 100 )

" परंतु हिन्दीकरणाचा प्रश्न सहज सुटण्यासारखा नाहीं व आधीं ठरवून टाकलेल्या वेळापत्रकानुसार तर तो मुळींच सोडवितां येण्यासारखा नाहीं. "

"The issues involved are too vital and the practical difficulties too great to justify a precipitate embarkation on a wholesale process of substituting Indian for British personnel in the Indian army."

( *Statutory Commission Report.* )

" या हिन्दीकरणाचे प्रश्नांतून उत्पन्न होणारे इतर प्रश्न फार महत्त्वाचे असून व्यावहारिक अडचणीहि मोठ्या असल्यानें घाईघाईनें ब्रिटिश घटकांची जागा पूर्णतः हिन्दी घटकांनीं भरून काढण्याचा प्रयत्न करणें न्याय्य होणार नाहीं. "

वरील तीन चार उतारे पाहिले म्हणजे हिंदुस्थानच्या स्वराज्याचा प्रश्न स्वदेश-रक्षणार्थ अवश्यक असणाऱ्या फौजेच्या हिंदीकरणाच्या अथवा राष्ट्रीय फौजेच्या प्रश्नाच्या महत्त्वाच्या खडकावर आदळून फुटतो कीं काय असा दाट संशय येतो व यासाठीं हिंदीकरणाची ही बाब काय आहे या प्रश्नाकडे वळूं या.

फौजेचें हिंदीकरण याचा अर्थ हाच कीं हिंदुस्थानांतील फौजेंत हिंदुस्थानच्या कायमच्या रहिवाशांशिवाय इतर लोकांचा हल्लीं जो भरणा आहे त्या हिंदेतर लोकांस सैन्यांतून रजा देऊन त्यांचे जागीं हिंदी सैनिक नेमावयाचे. कोणत्याही इतर देशांतील फौजांत जो प्रकार कधींहि दिसत नाहीं तो निसर्ग-विरुद्ध प्रकार हिंदी फौजेंत हल्लीं रूढ आहे व म्हणूनच प्रस्तुतच्या हिंदी फौजेस राष्ट्रीय हिंदी फौज असें यथार्थतेनें म्हणतां येत नाहीं. आजच्या हिंदुस्थानच्या फौजेंत अंदाजें ६० ह. ब्रिटिश सैनिक असून बाकीच्या सुमारें १ लक्ष ४९ ह. फौजेंतून खरे हिंदी लोक वगळले तर सरहद्द प्रांतांतील हिंदेतर लोकांचा भरणा मोठा आहे, आणि याहिपेक्षां मौज अशी कीं हे लोक आपणांस हिंदी म्हणवून घेण्यासही तयार नाहींत ! याचें कारण काय व हिंदी फौजेंतून या देशाचे नसलेले असे इतर लोक कां घेण्यांत आले यासंबंधाचा इतिहास जरासा पाहिला पाहिजे.

हिंदुस्थानांतील लोकांत इतर छोट्या देशांतील लोकांप्रमाणें राष्ट्राभिमान नसून या देशांतील सैनिक आपल्याच भाईबांधवांविरुद्ध खुशाल लढतात व जो पैसे देईल त्याची नोकरी करितात ही गोष्ट फ्रेंच इंग्रजादि लोकांच्या नजरेंत आल्यावर त्यांनीं आपापल्या साम्राज्य संस्थापनेसाठीं हिंदी लोकांचीं सैन्यें उभारण्यास प्रारंभ केला. या फौजा कंपनी सरकारच्या फौजा म्हणविल्या जात.

या फौजांमधून शिपाई व अधिकारी दोघेहि हिंदी लोक असत, त्यामुळें पाश्चात्य पद्धतीचें लष्करी शिक्षण घेऊन तयार झालेले अनेक हिंदी सरदार कंपनी सरकारच्या या फौजांतून मोठमोठ्या हुद्यावर होते, व त्यांच्या हाताखालीं अनेक ब्रिटिश लोक लहान लहान अधिकारावर असत. ब्रिटिश साम्राज्याची हिंदुस्थानांत मूळ स्थापना करणारा क्लाइव्ह याचे मनांत ब्रिटिशांचे वर्चस्वाचा प्रश्न प्रामुख्यानें घोळत असल्यामुळें त्यानें कंपनी सरकारच्या सैन्यांतील हिंदी अधिकारी कमी करून त्यांची जागा युरोपियन अधिकाऱ्यांनीं भरून काढावयाचें तत्त्व पुढें करून या मोठमोठ्या हुद्यांवरील हिंदी अधिकाऱ्यांचें सर्वस्वी उच्चाटन करण्याचा विडा उचलला. मोठी अधिकाराची जागा सैन्यांत हिंदी माणसास देणें म्हणजे त्याचा एक प्रकारचा उच्चपणा कबूल करण्यासारखें आहे, व मग साहाजिकच इंग्रजांचे श्रेष्ठत्वाचा प्रश्न पुढें येणार नाही व इंग्रजांची हुकमत वाटेल तशी चालणार नाहीं. याप्रमाणें प्रथमतः वर्णश्रेष्ठत्वाचा पाया हिंदी फौजेंतील अधिकाराबाबत क्लाइव्हनें घातला. तरीहि बंड-पूर्व कालांत हिंदी फौजांतून अनेक मोठमोठे बंगाली, बिहारीउडिया, दोआब वगैरे प्रांतांतील हिंदी सरदार व राजेरजवाडे सेनानायकांचें काम करीत होते. परंतु १८५७ चें शिपायांचें बंड (हा म्हणजे हिंदी स्वातंत्र्याचा खराखुरा पहिला प्रयत्नच होता) होऊन त्याचा बींमोड होतांच महाराणी व्हिक्टोरियानें हिंदुस्थानचें वर्चस्व कंपनीकडून काढून आपल्या हातीं घेतलें, व हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यांत सामील करून घेतला! नंतर हिंदी फौजांची पुनर्घटना करण्यासाठीं १८५७-५८ मध्यें पील कमिशन नेमून त्यामार्फत ब्रिटिश सरकारच्या हिंदी फौजांतून ब्रिटिश व हिंदी सोल्जरांचें प्रमाण बंड-पूर्व जें एकास पांच ते सात असें असे तें काढून टाकून त्याजागीं साधारणतः एका ब्रिटिश शिपायाबरोबर दोन अगर तीन हिंदी असें ठरविण्यांत येऊन या नवीन धोरणास अनुसरून सैन्याची संघटना करण्यांत आली. बंड-पूर्व हिन्दी फौजेंत असणारी ३५००० ब्रिटिश फौज वाढवून तिचें प्रमाण ७०००० वर नेण्यांत आलें व त्यामानानें हिन्दी शिपाई कमी करण्यांत येऊं लागले. या संबंधांत नाम. गोखले वेल्बी कमिशनपुढील साक्षींत म्हणतातः—लष्करांतील संघटनेकडे पाहतां त्यांत ७००४० इंग्रजी शिपाई व १४५७३५ हिन्दी शिपाई म्हणजे ब्रिटिशांचें प्रमाण जवळजवळ १ ला २ हिन्दी असें पडतें! बंड-पूर्व वीस वर्षे हें

प्रमाण १ ब्रिटिशाबरोबर ५ हिन्दी व कधीं कधीं याहूनहि कमी प्रमाणांत इंग्रज असत.(गोखल्यांचीं भाषणें, पान ११४२) याप्रमाणें हळुहळू हिन्दी लोक सैन्यांतून कमी करून त्यांचे जागीं ब्रिटिश लोकांचा भरणा अधिकीचा होऊं लागला. या नंतर १८७९ मध्यें ईडन कमिशन नांवाचें दुसरें एक कमिशन बसलें. त्यानेंहि वरील धोरणास अनुसरून कांहीं अधिकीच्या बाबी सुचविल्या व याप्रमाणें हिन्दी सैन्यांत ब्रिटिश सत्तेचें मूळ नीट धरण्यासाठीं म्हणून प्रत्यक्ष हिन्दी फौजेंतहि सरहद्द प्रांतांतील हिंदूेतर लोकांची भरती करण्यांत येऊं लागली. हा झाला एक भाग. यानंतर दुसरा भाग म्हणजे सैन्याधिकारासंबंधाचा. अधिकारी म्हटला म्हणजे तो सुशिक्षित, सुसंस्कृत असा असून त्यास राष्ट्राचा कमीअधिक अभिमान असणारच. त्याचे संगतींत राहणाऱ्या फौजी लोकांस तो कदाचित् अधिकीची माहिती देण्याचा संभव. राज्यकर्त्यांस केव्हांही स्वसंरक्षणार्थ स्वतःच्या देशबांधवांची फौज लागणारच व तिजवरील अधिकारीहि स्वदेशबांधवच ठेवणें क्रमप्राप्त होतें. परंतु त्याबरोबरच हिन्दी विभागावरील सर्व अधिकारीहि अनेक कारणें पुढें करून इंग्रज वाढवून हिंदी अधिकारी कमी करण्यांत येऊं लागले व नंतर सबंध हिन्दी अधिकाऱ्यांचें उच्चाटन करून हिन्दी फौजेच्या सर्व विभागावर पूर्णतः ब्रिटिश अधिकारी नेमण्यांत आले. यासंबंधांत फार ओरड झाल्यामुळें लहान लहान अधिकार ( व्हाइसरॉय कामिशन्ड ऑफिसर ) मात्र हिन्दी लोकांकडे ठेवण्यांत आले. याप्रमाणें हा हिन्दीकरणाचा प्रश्न पुढें आला.

हिन्दी लोक व हिन्दी संस्थानिक यांवरील अविश्वासामुळें सैन्यावरील ताबा पूर्णतया स्वतःचे हातीं राहावा म्हणून लष्करी अधिकार सर्वस्वीं इंग्रजांचे हातीं असावे असें ठरविलें गेलें. ईडन कमिशनच्या रिपोर्टांत हिंदुस्थान सरकारच्या फौजेच्या उद्देशांत ( १ ) हिंदुस्थानावर होणाऱ्या आक्रमणाचा प्रतिबंध अथवा आक्रमक फौजांना घालवून लावणें, ( २ ) ब्रिटिश हिंदुस्थानांत होणाऱ्या सशस्त्र बंडांचा बीमोड करणें व ( ३ ) हिंदी संस्थानिकांच्या फौजांस दहशत बसविणें व त्यांजवर पाळत ठेवणें हे तीन हेतु सांगण्यांत आले आहेत. हे हेतु नीटपणें साध्य करतां येण्यासाठीं ज्या कारणानें युद्धेच्छा उत्पन्न होऊं शकते तें कारण म्हणजे अंगीं मुसमुसणारें वीर्य व विजिगीषा. या गुणांचा नाश केला कीं मग वीरश्री उत्पन्न होते कशाला ? व बंड करण्याची छाती होते कोणाला ? म्हणून नागरिकांचें शस्त्रसामर्थ्यच काढून टाकावें असें ठरलें. परवान्याशिवाय

हाती शस्त्र बाळगणें हें कायद्याविरुद्ध वर्तन ठरविण्यांत आलें. यासच शस्त्र-बंदीचा कायदा अथवा आर्म्स ॲक्ट म्हणतात. यानंतर " फोडा व झोडा " याहि नीतीचा अवलंब करण्यांत येऊन सैन्यांतील वेगळाली यूनिट्स वेगळाल्या जातीचीं उभारण्यांत येऊन सर्व जातींचे लोक एकाच यूनिटमध्यें राहण्याची बंदी करण्यांत आली व शिवाय विशिष्ट विभागांतील लोक सैन्यांत अधिक प्रमाणांत घेण्यांत येऊं लागले, व नंतर हिंदी लोकांत लढाऊ व बिनलढाऊ हा भेदहि पुढें करण्यांत आला. याचा परिणाम साहजिकपणें असा झाला कीं ज्या हिंदी भौगोलिक विभागांतील लोकांस हिंदी फौजेंत शिरकाव मिळेनासा झाला ते लोक हळुहळू लष्करी बाण्यापासून पराङ्मुख होऊं लागले, व अखेरीस त्याचें पर्य-वसान विशिष्ट भागांतील लोक लढाऊ असा संकेतच होऊन बसला. यामुळें लढाऊ समजले जाणाऱ्या हिंदी लोकांत लष्करी गुर्मी व चढेलपणा, आणि बिनलढाऊ मानले गेलेल्या लोकांत स्वतःच्या पराक्रमाबद्दल न्यूनगंड उत्पन्न झाला. हे लष्करी न्यूनगंड असणारे लोक फौजी बाण्यापासून परावृत्त झाले आणि मग कांहीं काळ गेल्यानंतर तीन तीन पिढ्या लष्करांत नोकरी करणारांचीं मुलेंबाळें वीर्यवान समजलीं जाऊं लागलीं, व बाकीच्यांचीं मुलें निष्पराक्रमी, व अर्थात्‌च लष्करी नोकरीस अपात्र समजण्यांत येऊं लागलीं. याचा स्वाभाविक परिणाम असा होऊं लागला कीं ते लष्करी गुणांपासून दुरावले. ही झाली गोष्ट मुख्य फौजेची. यानंतर ज्यास स्वयंसैनिक दल म्हणजे व्हालंटीअर कॉर्प्स म्हणतात त्यांतहि फक्त इंग्रज किंवा ॲंग्लो–इंडियन्स यांचीच वर्णी लागे. याप्रमाणें हिंदी नागरिकास साधारणपणें लष्करी बाण्यापासून अलग ठेवण्याचें धोरण मुद्दाम ठेवण्यांत येऊं लागलें. याचे मुळाशीं मुख्यत्वें हेतु असा कीं बुद्धिमान्, कर्तबगार, स्वदेशप्रेमी सुशिक्षित वर्गास विशिष्ट सबबींवर लष्करी पेशापासून दूर ठेविलें कीं मग लष्करांत अशिक्षितांचा भरणा ठरलेलाच; व त्यांच्यावर इंग्रज अधिकारी ठेवला म्हणजे त्याचा बोज राहील व हलक्या सैनिकावर त्याचें वजन राहून "दाम करी काम" या न्यायानें इंग्रज अधिकाऱ्यांची मर्जी राखण्यांत हा कनिष्ठ हिंदी सैनिक एकनिष्ठ राहून ब्रिटिश सत्ता हिंदुस्थानांत अबाधित राहील. हिंदी लोक सर-सकट एकत्र राहूं लागले तर त्यांच्यांत एकी वाढून ते अधिक संघटित होतील या भीतीनें हिंदी लोकांच्या जमातीच्या लोकांचे भेद कायम ठेवण्याची कल्पना उद्भूत होऊन क्लास कंपनीज फौजेंत उभ्या करूं लागले. पील कमिशनच्या शिफारसी-

प्रमाणें हिंदी फौजेंत प्रथमतः सर्व जातींचे लोक भरती करण्यांत येऊन वेगळाल्या प्रांतांत या फौजा ठेवल्या गेल्या व याचा परिणाम सहजच प्रांताभिमान हळुहळू मावळून सर्व हिंदी लोक एक हा भावना पंजाबी, हिंदी, मद्रासी, मराठे, मुसलमान, रजपूत वगैरे शिपायांत जागृत झालेली दिसूं लागतांच प्रांतानिहाय प्रॉव्हिन्शल बॅटेलियन्स ठेवण्यांत येऊन त्यांची बदली प्रांताबाहेर होईनाशी झाली. यानंतर फौजेवर ब्रिटिश अधिकारी ठेवून मोठाल्या कमिशन्ड जागेसाठीं हिंदी लोकांस शिक्षण देण्याचें धोरण मागें टाकण्यांत आलें, व किंग्ज कमिशन नाहीं तर नाहीं पण व्हाइसरॉयचे कमिशनसाठीं तरी हिंदी सुशिक्षितांस डायरेक्ट रिक्रुटमेंट ठेवा-वयाचें तेंहि न ठेवतां अगदीं साध्या अशिक्षित शिपायांतून अक्कल हुषारी व राज-निष्ठा दाखविणाऱ्या व इंग्रज ऑफिसरांना खुष ठेवणाऱ्या लोकांच्या व्हाइस-रायचे कमिशन्ड ऑफिसर म्हणून नेमणुकी होऊं लागल्या. पुढारीपणास लाग-णारे गुण अशिक्षितांस सहजासहजीं येत नसल्यामुळें व हिंदी शिपायांस व ऑफिसरांस शिक्षणाचा फारसा त्रास न ठेवल्यामुळें ते केव्हांहि उच्चपदासाठीं तयार होऊं शकले नाहींत व कोणत्याहि हिंदी अधिकाऱ्यास दीर्घकाल नोकरी करूनहि किंग्ज कमिशन देण्यांत आलें नाहीं. उच्चांतील उच्च हुद्दा म्हणजे सुभेदार मेजर अथवा रिसालदार मेजर ! या पलीकडे हिंदी लोकांची मजल जाणें अशक्य करून सोडण्यांत आलें. लष्करांत दीर्घकाल व इमानदारीनें व कार्यक्षम पद्धतीनें नोकरी केलेल्या हिन्दी व्हाइसराय–कमिशन्ड अधिकाऱ्यास किंग्ज कमिशन मिळालेल्या अगदीं कनिष्ठ दर्ज्याच्या व नूतन अधिकाऱ्याच्या बरोबरीनें कधींहि वागविण्यांत येत नसे. लष्करांतील कर्तबगार वृद्ध रिसालदार मेजर अथवा सुभेदार मेजरलाहि यःकश्चित् लेफ्टनंटच्या हाताखालचा समजण्यांत येई ! याप्रमाणें हिंदी फौजांतून सर्व उच्च अधिकार इंग्रजांकडे ठेवले गेले व हिंदी माणसांस फक्त कनिष्ठ अधिकाराच्या जागांशिवाय कांहीं मिळेनासें झालें. याबद्दल खुद्द सर जॉर्ज चेसनेनें आपल्या इंडियन पॉलिटीमध्यें स्पष्टच म्हटलें आहे कीं "अशी हिंदी लोकांसंबंधीं वर्तणूक म्हणजे त्यांजवरील शुद्ध अविश्वास होय !" ज्यांना वस्तुतः लढाऊवर्ग म्हणून इंग्रज स्वतः मानीत त्या लोकांचे सुशिक्षित व कुलीन मुलांसहि डायरेक्ट रिक्रूट पद्धतीनें हिंदी सैन्यांत किंग्ज कमिशन घेण्यास हरकतीचें कारण नसतां त्यांस ही सवलत दिली गेली नाहीं. याशिवाय ब्रिटिश लष्करी अधिकारी हिंदी

लोकांपेक्षां केव्हांहि सरसच, अतएव हिंदी अधिकारी जबाबदारी स्वीकारण्यास कमदर्ज्याचे असा प्रचार सतत करण्यांत येई. वेगळाल्या लहानमोठ्या युद्धप्रसंगीं हिंदी लोकांनीं गाजविलेल्या पराक्रमाबद्दल लिहितांना हिंदी शिपाई व लहान अधिकाऱ्यांचें शौर्य, चिकाटी, सहनशीलता व राजनिष्ठेचे गुण गात असतां हा सर्व देखावा ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या पुढारीपणानें हिंदी लोकांस दाखवितां येतो हें मत मात्र मांडण्यांत कमतरता मुळींच झाली नाहीं. फ्लँडर्समध्यें गेल्या ( १९१४ ते १९१८ च्या ) महायुद्धांत दोस्त राष्ट्रांवर उद्भवणाऱ्या महत्संकटामुळेंच हिंदी सैन्याची रवानगी फ्रान्सच्या त्या भागांत करण्यांत आली व त्यावेळीं इंग्रज अधिकारी मेले असतां ज्यांस पुढारपणाचें शिक्षण कधींहि दिलें गेलें नव्हतें त्या हिंदी शिपायांनीं अननुभूत शौर्य, धैर्य, कल्पकता, साहस व स्वयंभू नेतृत्व इत्यादि अद्वितीय गुणांची साक्ष जगतास पटवून दिली हें हिंदुस्थानच्या आकांक्षांचा कट्टा दुष्मन् लॉर्ड बर्कनहेड ( युद्धकालीं हा फक्त मेजर सर एफ्. ई. स्मिथ होता ) यानें कर्नल मेरी वेद्र समवेत लिहिलेल्या आपल्या "इंडियन कॉर्प्स इन फ्रान्स" या पुस्तकांत सुंदर रीतीनें ग्रथित केलें आहे !! व त्याचीच री कट्टर ब्रिटिश साम्राज्यवादी लॉर्ड कर्झन यानेंहि वरील पुस्तकाच्या आपल्या प्रस्तावनेंत ओढली आहे। महायुद्धाचे वेळच्या वेगळाल्या हकीकती त्या वेळीं प्रसिद्ध झाल्या होत्या त्या वाचल्या म्हणजे हिंदी लोकांत लष्करी शिक्षण विशेषसें नसतांहि फौजी पुढारीपणाचे गुण स्वयंभू आहेत हें सहज ध्यानीं येईल. परंतु हें सर्व खरें असूनहि हिंदी फौजेंत १९१७ पर्यंत हिंदी कार्यक्षम लोकांनाहि फौजेंतील कमिशन्ड हुद्दा देण्यांत येत नसे. याप्रमाणें १८६० ते १९१७ म्हणजे जवळ जवळ ५७ वर्षें हिंदी लोकांस फौजी मोठेपणापासून व लष्करी महत्त्वाकांक्षेपासून फार दूर ठेवण्यांत आलें होतें हें लक्षांत येईल. गुणांचें संवर्धन व पोषण अभ्यासानेंच होत असतें व हाच प्रकार लष्करी गुण व महत्त्वाकांक्षा यांचा आहे. इंग्लंड, फ्रान्स, इटली, तुर्कस्थान किंवा अरबस्तान अशा देशांतून या गुणांचें संवर्धन अभ्यासपूर्वक करण्यांत येतें, तसेंच तें हिंदुस्थानच्या वातावरणांत होत नाहीं असें थोडेंच आहे. ज्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या पुढारपणाची एवढी महती गायिली जाते त्यांचेबद्दल प्रेसिडेंट लोवेलच्या "गव्हर्नमेंट ऑफ इंग्लंड" या पुस्तकांत म्हटलें आहे कीं, "दक्षिण आफ्रिकेंतील युद्धानंतर प्रसिद्ध झालेल्या टीकांमध्यें लष्करी इंग्रज

अधिकाऱ्यांच्या अंगीं उपक्रम आणि जबाबदारी अंगावर घेऊन कामें करणें या दोन्ही गुणांची वॉर ऑफिस व रणभूमि या दोन्हीं ठिकाणीं वाणच दिसून आली !" यावरून ब्रिटिश लोकच फक्त लष्करी पुढारीपणाचे मक्तेदार आहेत असें म्हणणें केवढें निरर्थक आहे हें सहज लक्षांत येईल.

पील कमिशनच्या शिफारशींप्रमाणें सर्व जातींचे लोक फौजेंतील विभागांतून सररहा विखरून टाकावेत असें धोरण आंखण्यांत आलें होतें. परंतु याचा परिणाम असा झाला कीं दूरवर पसरलेले व स्वांप्रतांपासून दूर गेलेल्या सर्व हिन्दी शिपायांत एकप्रकारचें बंधुप्रेम व परंपराधर्मरीत्या मनांतील असणाऱ्या साहजिक अढी दुरावत गेल्या व सर्व शिपायांत एक प्रकारची आत्मीयता पसरत चालली. या नवीन परिस्थितीनें सर्व हिन्दी सैनिकांत एकीची भावना उत्पन्न होऊन ब्रिटिश सत्तेवर आज ना उद्यां संकट ओढवेल असें कांहीं इंग्रज लोकांस वाटून त्यांनी सर्व जमातींस एकत्र भरती होण्याची बंदी केली आणि प्रांतवार बॅटेलियन्सची पद्धति अंमलांत आणण्याची प्रथा पाडून, वेगळाल्या प्रांतांतील लोकांचे धार्मिक व आनुवंशिकरीत्या चालत आलेले भेद कायम राखण्याचा प्रयत्न केला. तोफखाना व ज्यांत शास्त्रीय व यांत्रिक पद्धतींचें शिक्षण अवश्य असतें अशा सर्व फौजी विभागांतून हिंदी सैनिक व हिंदी अधिकारी यांस दूर ठेवण्यांत आलें व हिन्दी सैनिकांस जीं निशाणबाजीचीं शस्त्रें पुरविलीं जात तीं ब्रिटिश सैनिकांस पुरविल्या जाणाऱ्या बंदुकींहून कमी दर्ज्याचीं असत व ही स्थिति अगदीं अलीकडील काळापर्यंत चालू होती. याशिवाय संस्थानिकांना आपापल्या फौजा हळुहळू कमी करावयास लाविल्या व ज्या फौजा ठेविल्या त्यांतील शस्त्रसामग्री ब्रिटिश फौजांच्या मानानें जुनी व कमदर्जाची पुरविण्यांत येई. पैसा हिंदुस्थानच्या लोकांचा खर्च व्हावयाचा, पण लष्करी बाबतींत ब्रिटिश वॉर ऑफिस जें ठरवील तें धोरण हिंदुस्थान सरकारला निमुटपणें मान्य करावें लागे. इ. स. १९१९ मध्यें ईशर कमिटीकडे लष्करी खर्च कमी करण्याचें काम सोंपविण्यांत आलें होतें. त्यांनीं रिपोर्ट करून त्यांत शिफारसी केल्या कीं (१) हिंदी लष्करी बाबतींवर हिंदुस्थान सरकारचा हक्क असावा, (२) साम्राज्यसंरक्षणाचे बाबतींत हिंदुस्थान सरकारला कांहीं बोलण्याचा अधिकार देण्यांत यावा, (३) इंपीरियल जनरल स्टाफ (इंग्लंड) ला त्याचे चीफचे मार्फतीनें हिंदुस्थान सरकारचे लष्करी धोरणावर व्यवस्थित खर्च ठेवण्याचा अधिकार द्यावा, इत्यादि

शिफारसींचें तात्पर्य एवढेंच कीं बव्हंशीं साम्राज्य सरकारच्या लष्करी धोरणांत केवळ सल्ला देण्यापलीकडे हिंदुस्थान सरकारला ज्यास्त अधिकार कांहीं नाहीं! पैसा हिंदुस्थान सरकारनें हिन्दी जनतेपासून करादिरूपानें घेतलेला, पण त्याची विल्हेवाट लावण्याची पूर्ण मालकी इंग्लंडच्या साम्राज्य सरकारची! वरील धोरणानुसार खर्च कमी करण्याचे बाबतींत हिंदुस्थान सरकारचे सर सेनापति लॉर्ड रॉलिन्सन यांनीं लॉर्ड चेम्सफर्डच्या कारकीर्दींत त्यावेळचे साम्राज्य सरकारचे चीफ ऑफ जनरल स्टाफकडे चार ब्रिटिश बॅटेलियन्स व दोन कॅव्हलरी रेजिमेंट्स हिंदी फौजेंतून कमी करण्याबद्दल केलेल्या तारेस सर हेनरी वुइलसन यांनीं दिलेलें उत्तर व पत्रव्यवहार वाचून पहावा म्हणजे साधारणतः इंग्रजी सैन्य कमी करण्याचे बाबतींत इंग्रज मुत्सद्यांची दृष्टि केवढी स्वार्थैकपरायण असते हें सहज दिसून येतें. सर हेनरी हे आपल्या "लाइफ अँड डायरीज्" या पुस्तकांत लिहितातः—"फिलिप चेटवुड यांनीं रॉलीकडून (म्ह. लॉर्ड रॉलिन्सन यांचेकडून) माझे नांवें आलेल्या तारेबद्दल मला एस्. ओ. एस्. नें सांगितलें त्यांत म्हटलें कीं, वाटेल तितक्या विरोधाला न जुमानतां व्हाइसरॉय-इन-कौन्सिल यांनीं चार बॅटेलियन्स आणि दोन कॅव्हलरी रेजिमेंट्स हिंदी फौजेच्या ब्रिटिश विभागांतून कमी करावयाचा हुकूम दिला. रॉली म्हणतो कीं, हा वेडेपणा असून याविरुद्ध माझी मदत त्यास हवी; मा फिलिपला तार देऊन मॉंटेग्यूकडे जाऊन मी त्याचा लष्करी सल्लागार आहें कीं नाहीं याची छाननी करण्यास सांगितलें आहे. हा प्रश्न काटकसरीचा असून तो व्हाइसरॉय इन्-कौन्सिलचाच हक्क आहे वगैरे सबबींवर मागें घेऊं नकोस असें मीं फिलिपला सांगितलें आहे. कारण हिंदुस्थानचें अन्तःस्वास्थ्य, सरहद्द संरक्षण, मेसापोटेमिया, ब्रह्मदेश, सिंगापूर, हॉंगकॉंगकडे फौजा पाठविणें व अखेरीस तसा प्रसंग पडलाच तर हिंदुस्थानास अधिकीचें सैन्य पुरविणें वगैरे प्रश्न साम्राज्याच्या धोरणावर अवलंबून असल्यामुळें हे सर्व माझ्या हातीं आहेत...फिलिपकडून काय उत्तर येईल याची मला शंकाच आहे. रॉलीला एक आठवड्यापूर्वी लिहितांना मीं म्हटलेंच आहे कीं, मॉंटेग्यु व चेम्सफर्ड यांनीं अनेक नेटिव्ह असलेलें कौन्सिल बसवून आपला ताबा गमाविला व आतां अवश्य असणारा अधिकीचा कर त्यांस बसवितां येणार नाहीं. हें कौन्सिल थोड्याच काळांत हिंदी फौजांना हिंदुस्थानाबाहेर जाऊं देण्यास इनकार करील, आणि मग!!"

यावरून ब्रिटिश लष्करी अधिकारी फौजेच्या हिंदीकरणाच्या बाबतींत कशा आडकाठ्या आणीत असतात हें समजेल. हिंदीकरणाच्या बाबतींत आजपर्यंत अनेकांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत अनेकदां प्रश्न केले व त्यांस नानाप्रकारचीं लपंडावीचीं उत्तरें देऊन हिन्दुस्थान सरकारनें त्यांस बगल दिली. १९१७ मध्यें इंग्लंडला जरूर पडल्यामुळें हिन्दुस्थानला पंचम जॉर्ज बादशहांनीं "इंग्लंडचें संकट म्हणजे हिन्दुस्थानची संधि" असें म्हणून महायुद्धार्थ माणसें व पैसा यांची मदत केली तर हिंदुस्थानास काय मिळणार नाहीं म्हणून संदेश पाठविला होता. हिंदुस्थाननें ती शर्थ पुरी केली, पण महायुद्ध संपतांच मॉंट–फर्ड कायदा पुढें करून हिंदी आकांक्षांस ब्रिटिश मुत्सद्यांनीं वाटाण्याच्या अक्षता लाविल्याच कीं नाहीं ! त्यानंतर १९२१ व १९२२ मध्यें मिलिटरी ऑर्गनायझेशन कमिटी व शिया कमिटी अशा दोन कमिट्या बसवून हिंदी आकांक्षा पुऱ्या करण्याच्या प्रयत्नांत फौजेंत कांहीं थोडी कमिशन्स हिंदी लोकांस देऊं करण्यांत आलीं. शिया कमिटीनें प्रथमतः सबंध हिंदी फौजेचें हिंदीकरण ४५ वर्षांत करण्याची शिफारस केली व नंतर ही मुदत ३० वर्षांवर आणली. यानंतर १९२४ मध्यें रॉलिन्सनमॅक्युन कमिटीनें २८ वर्षांत सबंध फौजेचें हिंदीकरण कसें करावें या-संबंधींचें धोरण आंखून तशी शिफारस केली. पण हा बदल घडवून आणणें ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांस संमत नसल्यानें तो रिपोर्ट कोठेंतरी गुप्त झाला ! यानंतर १९२६-२७ मध्यें स्कीन कमिटीनें २५ वर्षांत अर्धहिंदीकरणाची शिफा-रस केली. यासंबंधांत पुढील वाक्यें महत्त्वाचीं आहेत.

" १९५२ च्या सुमारास हिंदी फौजेंतील अधिकारी सर्वचे सर्व हिंदी होऊं शकतील व यासाठीं हिंदुस्थानांत फौजी कॉलेज उघडावें व त्यांत दरवर्षी पुरेसे विद्यार्थी घेतले जावेत." इ०

पण हिंदी जनतेच्या दुर्दैवानें हेंहि धोरण अंमलांत आणलें गेलें नाहीं. यानंतर १९३०–३१ मध्यें चेटवूड कमिटी नेमण्यांत आली व तिला यासंबंधीं शिफारस करण्याबद्दल सांगण्यांत आलें. या कमिटीनें हिंदुस्थानांतील आर्मी कॉलेजमध्यें दरवर्षी ६० विद्यार्थ्यांस भरती करून त्यांस तीन वर्षें शिक्षण द्यावें असें घाई-घाईनें ठरवून टाकलें. हेंच शिक्षण इंग्लंडमधील आर्मी कॉलेजमध्यें फक्त अठरा महिन्यांत होतें. या धोरणानुसार हिंदी संस्थानांतून २० विद्यार्थी व हिंदी फौजें-

तून ३० सैनिक घ्यावेत व बाकीचे १० परीक्षा पास होणाऱ्या सर्वांत वरिष्ठ विद्यार्थ्यांतून घ्यावेत असा या शिफारसींचा निष्कर्ष होता. या धोरणानुसार हिंदी फौजेच्या अष्टमांश भागावरील अधिकाऱ्यांचें हिंदीकरण होणार.

याप्रमाणें अनेक कमिट्या नेमल्या, शिफारसी झाल्या, हिंदुस्थानच्या तिजोरींतून लाखों रुपये खर्च झाले, पण या सर्वांचें फळ एकच व तें म्हणजे हिंदुस्थाननें लष्कराच्या हिंदीकरणाबाबत उगीच घाई न करतां "आस्ते कदम" प्रगति करावी, व हिंदुस्थानला सुरक्षित राहूं द्यावें एवढेंच ! हिंदीकरणाबाबत "आस्ते कदम मुलाहिजा" हें धोरण कां असावें याचीं पुढें करण्यांत येत असलेलीं मुख्य कारणें अशीं:--

(१) हिंदुस्थानांत लढवय्ये लोक असंख्य आहेत असें गृहीत धरलें तरी त्यांच्यांत पुढारीपणाच्या गुणांची वाण असते;

(२) हिंदुस्थानांतील लोकांत लढाऊ व बिगरलढाऊ लोकांची सरमिसळ झाली असून लढाऊ लोकांस अक्कलहुषारी कमी, तर सुशिक्षित व हुषार लोकांत वीरवृत्तीचा अभाव आहे;

(३) किंग्ज कमिशन्स मिळविण्यासाठीं योग्य व पुरेशा विद्यार्थ्यांचा पुरवठा सतत हिंदुस्थानांतून होईल कीं नाहीं याची खात्री नाहीं; व

(४) बिनलढाऊ लोकांपैकीं विद्यार्थी पास होऊन त्यांस अधिकारपदें दिली तर ते लढाऊ लोकांचा विश्वास संपादन करतील कीं नाहीं ही शंका आहे.

याकरितां उगीच एकदम पूर्ण हिंदीकिरणाचा प्रश्न धडाडीनें हातांत घेऊन एकदम खाईत उडी न टाकतां व्यवस्थितपणें व खात्रीलायक हळुहळू सुधारणा करणेंच श्रेयस्कर आहे ! शिवाय हिंदी विद्यार्थी पास झाला व कमिशन मिळवून अधिकारारूढ झाला तरी मेजर अगर कर्नल होण्यास त्यास चौदा वर्षें लागणार, व मोठ्या अधिकारावर जाऊन एकाददुसऱ्या लढाईत त्याची कर्तबगारी दिसेल तेव्हां कोठें तो सेनानायक होण्यास योग्य समजला जाणार. याचा अर्थ एकच व तो हा कीं, हिंदी लोकांत लष्करी पुढारीपण घेण्याची कुवत नाहीं ! मागील भागांत हिंदुस्थानच्या सेनानायकांनीं मोठमोठ्या इंग्रज, पोर्तुगीज, फ्रेंच रणधुरंधरांस माघार घ्यावयास लाविली हें थोडेंसें विशद करून

दाखविलेंच आहे. हिंदु, शीख, तामीळ व तेलगू, मुसलमान, दक्षिणेंतील मराठे, ब्राह्मण, रजपुत या लोकांत पूर्वी मोठमोठाले योद्धे व मुत्सद्दी होऊन गेले व त्यांच्यामध्यें अनेक सेनानायक आपल्या संग्रामकौशल्यानें रणांगणावर झळकले यावरून हिंदी लोकांत वीरवृत्तीचा आनुवंशिक गुण पूर्णत्वानें वसत आहे यांत शंकाच घ्यावयास जागा नाहीं, पण पुढारीपणा, कल्पकता व जबाबदारी हीं सतत अंगीं राहण्यासाठीं व टिकण्यासाठीं या गुणांचा परिपोष अभ्यासानें करावयास पाहिजे, व त्याकरितां हिंदी लोकांस लष्करी अधिकारपदाच्या मोठ्या जागा द्यावयास पाहिजेत.

१९२१ मध्यें मध्यवर्ती असेंब्लीच्या मार्चच्या अधिवेशनांत बादशहांच्या हिंदी प्रजाजनांना दरवर्षी शेंकडा २५ किंग्ज कमिशन्स देण्यांत यावींत असा ठराव मांडला जाऊन तो हिंदुस्थान सरकारनें मंजूरहि केला होता. त्या ठरावाप्रमाणें आचरण झालें असतें तर आज कितीतरी किंग्ज कमिशन्स मिळविलेले हिन्दी अधिकारी फौजेंत तयार झाले असते. या संबंधांत मधून मधून असेंब्लींत झालेलीं भाषणें व सरकारी प्रत्युत्तरें वाचणें हितावह होईल म्हणून नमुन्यादाखल थोडींशीं भाषणें पुढें दिलीं आहेत.

## ( असेंब्ली डीबेटस्, मार्च १४, १९२९ )

सरदार संतसिंगः—"यापुढें हिंदी फौजेमध्यें अधिक इंग्रज अधिकारी ठेवण्यांत येऊं नयेत अशी आमची स्पष्ट मागणी आहे. हिंदी फौजेवर हिंदी लोकच अधिकारी असावेत हें आम्हांस हवें आहे, व त्याकरितां अशा मार्गाचा अवलंब केला पाहिजे कीं, जेणेंकरून हिंदी फौजेंतून अगदीं अल्पकाळांत ब्रिटिश ऑफिसरांची गरज मुळींच न भासावी. यासाठीं आम्हांला एक कमिटी हवी व तिच्यापुढें विचाराकरितां हा हेतु ठेवला जावा की, जेणेंकरून अत्यल्प काळांत हिंदी फौजेमधील ब्रिटिश ऑफिसर्स पार नाहींसें होऊन सर्व अधिकारपदांचें पूर्ण हिंदीकरण अल्पकाळांत होईल. यामध्यें मुदतबंदी करण्यांत येऊं नये. यांबद्दल विरोधीपक्षाच्या पुढाऱ्यांनीं स्पष्टपणें सांगितलें आहे कीं, प्रथम हिंदी फौजेंतील सर्व अधिकाऱ्यांच्या जागांवर हिंदी लोक १५ वर्षांत पूर्णपणें अधिष्ठित होतील. दुसरा मुद्दा असा कीं, या अधिकाऱ्यांत भेदाभेद ठेवला न जावा. आमचे देशभक्त हिंदी अधिकारी आमच्या परिस्थितीस अनुसरून अशी आपली रहाणी ठेवतील व मातृभूमीची सेवा करतील."

लेफ्टनंट–कर्नल सर हे. गिडनेः––“मला स्वतःला असें वाटतें कीं, सरकारनें फौजेंतील अधिकाऱ्यांचें हिन्दीकरण अत्यंत मंद गतीनें चालविलें आहे. सध्यां भरती होत असलेल्या संख्येच्या दुपटीनें तरी आंकडा वाढवावयास पाहिजे असें मला वाटतें. नाहीं तर असफअल्ली व माझे इतर स्नेही म्हणतात कीं फौजेच्या हिंदीकरणाला आणखी शंभर वर्षें लागतील हेंच म्हणणें खरें ठरेल. ”

एम्. झियासुद्दीनः––“लॉर्ड रॉबर्टसनीं आपल्या डिसपॅचमध्यें म्हटलें होतें कीं, आपण फौजेचें हिंदीकरण करूं नये, व हिंदी माणसाला फौजी खात्यांत इंग्रजाच्या बरोबरीनें ठेवूं नये, व या प्रकारचा अल्पसा प्रारंभहि जोरदारपणें बंद पाडावा. या प्रकारचें धोरण फौजीखात्याच्या मुखत्यारांचें होतें. त्यानंतर लॉर्ड किचनेर आले, परंतु त्यांचा दृष्टिकोण वेगळा होता. त्यांच्या मतें फौजेचें हिन्दीकरण करावयास पाहिजे, परंतु त्यांस वाटे कीं फौजेंतील मुख्याधिकारी त्यांचेशीं या बाबतींत सहकार्य करीत नसत. ”

मि. सी. एम् जी. ऑगिल्व्ही, मिलिटरी सेक्रेटरीः––“चांगले विद्यार्थी पुरेशा संख्येनें पुढें आल्याशिवाय–व पुरेसे विद्यार्थी असणें ही तर मुख्य बाब आहे–कमिशन्स देण्याची संख्या उगाच वाढविणें न्याय्य होणार नाहीं. प्रस्तुत असलेले विद्यार्थी चांगले आहेत एवढ्याच सबबीवर संख्या वाढविण्याची मागणी करणें बरोबर नाहीं. चढाओढींत भाग घेणारांची, किंवा निदान अधिकारासाठीं पुरेसे उमेदवार येतील याची खात्री असल्याशिवाय उगाच घाई करूं नये. १९३३मध्यें जास्तींत ज्यास्त ३२६ उमेदवार आले व त्यानंतर ही संख्या घटत घटत १९३८ मध्यें फक्त १२८ उमेदवार फौजेंतील ३० कमिशन्सच्या जागांसाठीं आले.”

श्री. मा. श्री. अणे––“तुम्ही हिंदी लोकांना फौजेपासून दूर ठेवतां व म्हणतां कीं, त्यांना लष्करची कांहीं माहिती नसते... लष्करी ज्ञान ही गोष्ट हिंदी लोकांना न मिळणारी गोष्ट, व तुम्ही म्हणतां की, फौजेची माहिती असणें हीच खरी परीक्षा. मि. सेक्रेटरीचें म्हणणें कीं, १९३३ मध्यें ३२५ कीं ३२८ उमेदवार होते व १९३८ मध्यें फक्त १२७ किंवा १२८ च आले. माझी खात्री आहे कीं १९३३ च्या व १९३८ च्या हिंदी विद्यार्थ्यांत मुळींच फरक झाला नसून मुलें पसंत करणारांतच कांहीं फरक झाला आहे. विद्यार्थ्यांचे अर्ज ज्या पद्धतीनें नाकारले गेले त्यामुळें त्यांच्या मनांत निराशा व निरुत्साह उत्पन्न झाला व भोंवताली सर्वत्र निरुत्साही वातावरण उत्पन्न झाल्यानें कोणीहि तरुण

लष्करभरतीच्या उमेदवारीकरितां अर्ज पुढें ठेवूं इच्छित नाहीं. इतर देशाप्रमाणेंच हिंदुस्थानांत टेरिटोरियल आर्मी असली म्हणजे लष्करी खर्च कमी होऊन वेळप्रसंगीं या विभागाचा उपयोग संरक्षण कार्यांतील पहिल्या तटबंदीप्रमाणें ( first line of defence ) व्हावा म्हणून हिंदुस्थानांतील ऑक्झिलियरी व टेरिटोरियल फोर्सेसची सुधारणा करून ती विशेष कार्यक्षम कशी करतां येईल यासाठीं नेमलेली जी " ऑक्झिलियरी अँड टेरिटोरियल फोर्सेस कमिटी " इनें आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला ( २३ जानेवारी १९२५ ) त्यांत दर्शविल्याप्रमाणें विश्वविद्यालयांतून उघडण्यांत आलेल्या युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कॉर्प्समध्यें दिलें जाणारें शिक्षण इंग्लंडच्या विश्वविद्यालयांतील ऑफिसर्स ट्रेनिंग कॉर्प्सच्या शिक्षणापेक्षां कनिष्ठ दर्ज्याचें असतें, सबब तें उच्च प्रकारचें असावें व हें घेऊन विश्वविद्यालयांतून बाहेर पडणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांस ब्रिटिश विद्यार्थ्यांप्रमाणेंच हिंदी फौजांतून अगर पोलिस विभागांतून अधिकाराच्या जागा देण्यांत याव्यात, ही मागणी आज अनेक वर्षें असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेटमधून मांडण्यांत येते, पण तीस " नाहीं " हेंच ठरीव साच्याचें उत्तर सरकारकडून मिळतें ! याचा अर्थ हाच कीं, हिंदी सुशिक्षित वर्गाचा लष्करांत शिरकाव होऊं नये ! याबद्दल नागपूरचे बॅरिस्टर गोविंदराव देशमुख यांनीं ८ मार्च १९३९ मध्यें मध्यवर्ती असेंब्लींत भाषण केलें होतें. त्यांत ते म्हणतात कीं, मीं ९ डिसेंबर १९३८ रोजीं एक प्रश्न विचारला होता कीं, विश्वविद्यालय ट्रेनिंग कॉर्प्समध्यें दिलें जाणारें लष्करी शिक्षण अधिक कार्यक्षम करण्यांत येणार आहे काय ? व नसेल तर तें कां नाहीं ? याचें उत्तर मला " नाही " म्हणून देण्यांत आलें व याचें कारण असें सांगण्यांत आलें कीं, "अभ्यास व इतर चळवळी विद्यार्थ्यांस विश्वविद्यालयांत असल्यामुळें अधिक शिक्षण देणें अशक्य आहे ! " यावर विश्वविद्यालयीन शिक्षणतज्ज्ञांचें म्हणणेंच वस्तुतः खरें मानावयास पाहिजे. मुंबईत भरलेल्या विश्वविद्यालयीन चतुर्वार्षिक कॉन्फरन्समध्यें पुढीलप्रमाणें ठराव पास करण्यांत आला होता "हिंदुस्थान सरकारनें अशा प्रकारचें लष्करी शिक्षण देण्याची सोय करण्यासाठीं यू. टी. सी. करितां लष्करी अधिकारी शिक्षक म्हणून पुरवावे अशी या कॉन्फरन्सची विनंति आहे व हें शिक्षण सर्व कॉलेजमधून दिलें जावें." याचप्रमाणें अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे यू. टी. सी. च्या कंपनीच्या बक्षिससमारंभप्रसंगीं पंडित अमरनाथ झा यांनीं काढलेले उद्गारहि अर्थपूर्ण आहेत. त्यांचें म्हणणें असें कीं, युनिव्ह-

सिटींत जाणाऱ्या विद्यार्थ्यांस, शाळांतून ज्यूनिअर ट्रेनिंग कॉर्प्समधून शिक्षण दिलें असतां, पुढील लष्करी शिक्षण देणें सुलभ जाईल. परंतु याहि विनंतीला वाटाण्याच्या अक्षता लावण्यांत आल्या. इंग्लंडमधील ऑक्सफर्ड ट्रेनिंग कॉर्प्समधील पास होणाऱ्या विद्यार्थ्यास लष्करी अधिकारी होतां येतें, परंतु हिंदी युनिव्हर्सिटीच्या यू. टी. सी. मधील विद्यार्थ्यांस त्या सोयी नसल्यामुळें यू. टी. सी. त पुरती रिक्रूट-भरती होऊं शकली नाहीं. कोणत्याहि शिक्षणाचा व्यवहारांत थोडा तरी उपयोग झाला तर तें शिक्षण घेण्यास लोक धजावतात. परंतु यू. टी. सी. मध्यें नॉन-कमिशन्ड ऑफिसर्सच्या जागा मिळविणाऱ्या अगर त्या शिक्षणांतून गेलेल्या विद्यार्थ्यांत लष्करांत पुढेंमागें केव्हांहि अधिकाराची संधीच नाहीं तर त्या शिक्षणांत अर्थ तरी काय ?

संरक्षण म्हणजे फौज व फौजेंतहि अनेक विभाग. हिन्दी लोकांस या सर्व विभागांतून अधिकाराच्या जागा मिळाल्याशिवाय त्यांस या सर्वांचा अनुभव कसा यावा? १९३७-३८ मधें एकूण ७५६३ अधिकाऱ्यांत हिन्दी लोकांस फक्त ३२३ अधिकाराच्या जागा दिल्या होत्या व त्याहि लष्करी विभागांतील फार थोड्या जागीं. यावरून हिंदी लोकांना लष्करचें ज्ञान घेऊं द्यावयाचें नाहीं किंवा त्यास संधिच द्यावयाची नाहीं हाच अ होतो. याबद्दल के. सनातनम् दिल्ली असेंब्लींतील भाषणांत म्हणतातः—“ कांहीं पायदळ रेजिमेंट्समध्यें हिन्दीकरणास प्रारंभ झाला असें सांगण्यांत येतें व यांतून सर्व हिन्दी कमिशन्ड अधिकारी ठेवण्यांत आले असें म्हणतात. पण पायदळ रेजिमेंट्स म्हणजे कांहीं हुन्नरी काम असें म्हणतां येत नाहीं. लेफ्टनंट किंवा कॅप्टन होण्यास किती वेळ लागेल असें विचारलें तर लष्करांत कार्यक्षम अधिकारी होण्यास पुष्कळ वर्षें लागतील असें सांगण्यांत येतें, पण मागील महायुद्धांत तर फक्त दोन महिने शिक्षण दिलेल्या लोकांस लेफ्टनंटचा हुद्दा बहाल करण्यांत आला ! मागील युद्धांत युनिव्हर्सिटीचे विद्यार्थ्यांस कांहीं आठवडे फक्त शिक्षण देऊन ब्रिटिश गव्हर्नमेंटनें अधिकारी करून पाठविले. वरिष्ठ अधिकारी होण्यास १० ते १५ वर्षें लागतील असें म्हणतात, पण जरूर पडली म्हणजे मात्र कॅप्टन व मेजर तयार करण्यांत येतात. परंतु एंजिनीअर, शास्त्रज्ञ, रसायनशास्त्रज्ञ ज्यांस कारखान्यांत शस्त्रोत्पादन करतां येईल असे लोक कांहीं थोड्या आठवड्यांत तयार करतां येत नाहींत. हे सर्व विभाग पाहूं गेले तर त्यांतून एकहि हिंदी माणूस दिसणार नाहीं.

याचा अर्थ काय ? हाच कीं, तूर्त शिक्षण द्यायचें नाहीं, इतकेंच नव्हे तर पुढें वीस वर्षें तरी आम्ही या बाबतींत तयार होणार नाहीं असें हें धोरण आहे. "

मि. सत्यमूर्तिः—" आमचा सबंध हिंदी किनारा म्हणजे शत्रूला माऱ्याच्या अनंत जागा; पण त्यावर सांगण्यांत येतें कीं, हिंदी किनाऱ्याचें संरक्षण हा विषय मुख्यत्वें ब्रिटिश आरमाराच्या कक्षेंतील प्रश्न आहे. परंतु भावी युद्धांत ज्यावर विशेष जोर दिला जाईल तो विभाग म्हणजे वैमानिक दल; या बाबतींत तरी आम्ही कमकुवत आहोंत. हिंदुस्थान सरकारची खरी इच्छा असल्यास या बाबतींत सबंध हिंदीकरण करतां येण्यासारखें आहे, पण या बाबतींत संरक्षणाचें हिंदीकरण करण्याबाबत हिंदुस्थान सरकारला खरी इच्छा पाहिजे. उत्कृष्ट संरक्षण धोरण म्हणजे उच्च दर्ज्याचें थोडें खुष्की सैन्य व त्यास जोड म्हणजे हिंदी नागरिक सैन्य. परंतु संरक्षणखात्याचा हिंदी लोकांवर विश्वास नाहीं. आम्हांला ज्ञान मिळविण्याची संधि प्रथम देत नाहींत, व मग आमचे या बाबतींतील अज्ञानाचा आमच्या विरुद्ध उपयोग करण्यांत येतो ! ... खरी गोष्ट अशी आहे कीं, हिंदुस्थान सरकारला हिंदीकरण करावयाचें नाहीं. त्यांना खरोखर सर्व अधिकारी आपल्या हातचे पाहिजेत. लष्करांत भरती होणाऱ्या ब्रिटिश तरुणांना आश्वासन दिलें आहे कीं, तुम्हांस हिंदी अधिकाऱ्यांच्या हाताखालीं काम करावें लागणार नाहीं. ( स्कीन कमिटीचें अपेंडिक्स ). सँढर्स्टमध्यें जाणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांची संख्या घटली यास फार महत्त्व दिलें जातें, पण त्यास खरें उत्तर हें आहे कीं, आमच्या हिंदी अधिकाऱ्यांस तुम्ही उत्तेजनच देत नाहीं, व त्यांना हलके म्हणून वागवितां. " ( १५ मार्च १९३९ असेंब्ली डीबेट्स )

एफ्. ई. जेम्स, मद्रासः—" संरक्षणांत दुसरी संरक्षण रेषा म्हणून टेरिटोरियल व ऑक्झिलियरी फोर्सच्या तयारीकडे जितकें लक्ष दिलें जावें तितकें दिलें जात नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांतील टेरिटोरियल व ऑक्झिलियरी फोर्सशीं माझा संबंध आहे, व मला माहीत आहे की, संरक्षणखात्याकडून या बाबतींत पुरेसा खर्च मिळविणें अति कठिण जातें. दक्षिण हिंदुस्थानांत या विभागांची वाढ करण्यास लागणारीं साधनें म्ह. लढाऊ माणसें मुबलक आहेत, परंतु दक्षिण हिंदुस्थानांत लढाऊ लोक नाहींत असें सांगण्यांत येतें. "

सर जेम्स ग्रिगः—"सत्यमूर्तींच्या म्हणण्याचा अर्थ हा कीं, हिंदीकरणानें १२ ते १५ कोटी रु. खर्च कमी करतां येईल, परंतु हें नुसतें मृगजल आहे. ब्रिटिश

ट्रूप्स कमी करून त्यांची जागा हिंदी सैनिकांनीं भरावयाची व भरती करून शिक्षण देऊन सर्वचे सर्व अधिकारी हिंदी ठेवण्यास पुष्कळ वर्षे लागतील हें एक निश्चित मत आहे. शिवाय बचतीचा प्रश्न म्हटला तरी दाखविलेला आंकडा फार मोठा आहे. आधुनिक संरक्षणकार्यांत द्रुतगती, अधिक आक्रमक शक्ति, व ज्यास्त संरक्षणक्षमता हे गुण पाहिजेत. रणगाडे, मोठीं व उच्च दर्ज्याचीं विमानें, यंत्रपूर्ण वाहतूक व ज्यास्तींत ज्यास्त बदुका, व हें म्हटलें कीं, पूर्वप्रिमाणेंच अधिकीचा खर्च पाहिजे. आज कायदेकौन्सिलांतून आमचें मताधिक्य नसूनहि आमच्यावर संरक्षणाची जबाबदारी न टाळतां येण्यासारखी जबाबदारी आहे. आणि म्हणून प्रस्तुतच्या कायाद्यान्वयें अखेरचा शब्द आमचाच राहणार!" (१३ सप्टें. १९३८)

या सर्व वरील भाषणांचा मथितार्थ एकच व तो हा कीं, संरक्षणाचे बाबतींत ब्रिटिश सरकार धोरण ठरवील तें हिंदुस्थानला निमुटपणें ऐकावें लागतें! यासंबंधांत कॉंग्रेसचे ॲसेंब्लीपक्षांतील नेते श्री. भुलाभाई देसाई यांनीं खडखडितपणें सांगितलें कीं, " एक गोष्ट खरी आहे कीं, इतःपर आम्ही रोमन किंवा ब्रिटिश रथाबरोबर खेंचले जाणार नाहीं, व तें साम्राज्यासाठीं सुद्धां ! या साम्राज्याचें संरक्षण म्हणजे प्रथमतः व मुख्यत्वें हिंदुस्थानला खितपत दास्यांत ठेवावयाचें व मग आपल्या स्वतःला साम्राज्य मानावयाचें. या साम्राज्याचें संरक्षण किंवा युद्धांत लढणें म्हणजे हिंदुस्थान ही ब्रिटिशांची मालमत्ता असून तिचें परचक्रापासून रक्षण करणें असा असेल तर आम्ही अशा कोणत्याही युद्धांत भाग घेणार नाहीं." (१३ सप्टें. १९३८)

यापूर्वीहि सन १९३० मध्यें पुरेसे व पाहिजे त्या प्रतीचे हिंदी विद्यार्थी लष्करांत भरती होण्यासाठीं सरकारला मिळत नाहींत या लंगड्या सबबीस आळा घालण्याकरितां नागपूरचे डॉ. मुंजे यांनीं एक ठराव मांडला तो असा:—"सँढर्स्ट कमिटीनें लोकांपुढें मांडलेल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या कॅरेक्टर ट्रेनिंगमधील उणीवा भरून काढतां याव्या म्हणून हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या शिक्षणक्रमांत यासंबंधीं असणारा कमीपणा कसा व कोठें आहे तो शोधून त्यावर उपाययोजना करण्यासंबंधांत एक कमिटी नेमण्यांत यावी, व तिनें अशा शिफारसी कराव्या कीं, जेणेंकरून शिक्षणक्रमांतून निघालेले हिंदी विद्यार्थी फौजेंत भरती होण्यासाठीं उत्तम सामग्री म्हणून समजले जातील."

या ठरावावर झालेलीं भाषणेंहि मनोरंजक आहेत. यासंबंधांत रेव्हरन्ड चॅटर्जी म्हणतात, " अधिकारी म्हणून भरती होण्यासाठीं पुरेशी सामग्री न मिळण्याचें कारण म्हणजे फौजेंत अशा लोकांस भरती नव्हती हें होय. आतां मागणी वाढतांच ज्यास्त लोक पुढें येऊं लागले आहेत. "

के. सी. रॉयः—फौजी अधिकारी, हिंदी तरुणांस लष्करचीं द्वारें खुलीं करतील तर हिंदी युनिव्हर्सिटींतून १०० योग्य मुलें सहज मिळतील. वरील ठरावाचा अर्थ म्हणजे आमच्या विद्यार्थ्यांशीं अयोग्य वागणूक होय.

न. चिं. केळकरः—फौजेमध्यें अधिकारी होण्यासाठीं योग्य विद्यार्थ्यांची पुरेशी भरती होऊं शकत नाहीं यावर माझा भरंवसा नाहीं. असें म्हणणें म्हणजे हिंदी विद्यार्थ्यांचा उपमर्द होय. हिंदी विद्यार्थ्यांनीं शिक्षणांत आपला दर्जा सिद्ध केला आहे. त्यांना संधिच दिली गेली नाहीं.

महमदअल्ली जीनाः—योग्य उमेदवार मिळण्यासारखे आहेत. पण माझी खात्री झाली आहे कीं, तुम्हांला ( ब्रिटिश अधिकाऱ्यांना ) ते नको आहेत !

मदनमोहन मालवीयः—हिंदी लोकांनीं जीवनाच्या सर्व बाजूंनीं आपली प्रगति केली आहे व यापुढें आतां असा काळ आला आहे कीं, त्यांना छावणींत राहण्याची मोकळीक होणें अवश्य आहे. परीक्षा पाहण्याची मी एक सुरेखशी कसोटी सुचवितों कीं पक्षातीत परीक्षकांपुढें १०० हिंदी विद्यार्थी व १०० इंग्रज मुलें उभीं करावीं व त्यांची पाहणी करावी, म्हणजे असें दिसून येईल कीं, या परीक्षेंत हिंदी विद्यार्थी इंग्रज विद्यार्थ्यांच्या मागें मुळींच नाहींत. स्कीन कमिटीनें सुचविलेल्या शिफारसीबरहुकूम विश्वविद्यालयांतून फौजी शिक्षणास प्रारंभ करणें सरकार व देश या दोघांसहि हितावह होईल.

डॉ. मुंजेः—महायुद्धापासून परस्पर विश्वासास प्रारंभ झाला असल्यानें सरकारनें ब्रिटिश ट्रुप्स कमी करावयास हरकत नाहीं. १०–२० वर्षांतील मुलांस रायफल ड्रिल व सक्तीचें लष्करी शिक्षण दिलें जावें हें मी मुद्दाम सरकारला आग्रहानें सांगतों. त्याचप्रमाणें वैमानिक दलासंबंधीं माझी अशी सूचना आहे कीं, मुलकी वैमानिक वाहतुकी व वैमानिक दल यांचा परस्पर हितसंबंध रहावा कीं, त्यायोगें सरकारला वाटेल तितके हिंदी वैमानिक अधिकाऱ्यांची जोड होईल.

फौजेंतील अधिकारांच्या जागेसाठीं हिंदी व ब्रिटिश विद्यार्थ्यांचें प्रमाण काय असावें यावर सरकारतर्फेचें पुढील उत्तर पाहण्यासारखें आहे.

सर फिलिप चेटवुड ( कमँडर-इन-चीफ ):--" प्रतिवर्षी हिंदी फौजेंत भरल्या जाणाऱ्या अधिकाऱ्यांची संख्या वेगवेगळी आहे. तूर्त ब्रिटिशांना अधिकांत अधिक ८२ जागा देण्यांत आल्या. यांपैकीं ७० सँढर्स्टमध्यें अभ्यास करणारांस दिल्या गेल्या व १२ विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांच्याकडे गेल्या. १९२८ पर्यंत हिंदी लोकांस ज्यास्तींत ज्यास्त जागा १० दिल्या गेल्या, पण यानंतर ही संख्या २५ करण्यांत आली व यांपैकीं २० सँढर्स्टमधून निघणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांस व बाकीच्या पांच व्हाइसरॉयचे कमिशन्ड ऑफिसर्समधून पसंत झालेल्या सँढर्स्टमध्यें शिक्षण घेणाऱ्या लोकांस दिल्या, १९२५-३० या सालांत हिंदी व ब्रिटिश लोकांस मिळून हिंदी फौजेंत दिलेल्या एकंदर जागांतून ५७ हिंदी लोकांस व ४९१ युरोपियनांस दिल्या व याचें प्रमाण म्हणजे १ हिंदीबरोबर ९ युरोपियन्स असें पडतें. याशिवाय वुलविच व क्रॅनवेल येथें ठेवण्यांत आलेल्या जागा वेगळ्या आहेत. कार्यक्षमता कायम ठेवून अधिकाच्या जागा हिंदी लोकांस द्यावयाची सरकारची इच्छा आहे, परंतु यासाठीं योग्य व पुरेसे विद्यार्थी भरतीकरितां पुढें यावयास पाहिजेत. पूर्वी राखून ठेवलेल्या जागांपेक्षां १९२८ मध्यें दुप्पट जागा वाढविल्या आहेत."

सायमन कमिशननें या बाबतींत पुढील उद्गार काढले आहेतः--

" हिंदी फौजेंत कायमचा असणारा ब्रिटिश भाग ही एक अनुल्लंघनीय अडचण आहे. लोकनियुक्त कायदेमंडळांनीं निवडून दिलेल्या कारभाऱ्यांच्या हातांत फौजेची सत्ता देणें अशक्य आहे. साम्राज्य सरकारनें उभे केलेले ब्रिटिश अधिकारी व सैनिक हिंदी फौजेंत ज्यावेळीं एकहि दिसणार नाहीं त्याचवेळीं वरील गोष्ट शक्य आहे. हें केव्हां होऊं शकेल हें सांगतां येणें शक्य नाहीं, परंतु यापुढें अनेक वर्षे तरी हें व्यवहार्य होण्याचीं चिन्हें दिसत नाहींत. सध्यां असलेल्या अधिकाऱ्यांतून सांगाल त्या अवधींत सेनानायक उत्पन्न करणें शक्य नाहीं. सध्यां भरतीसाठीं योग्य लोकांचा म्हणून येणारा बारीक हिंदी प्रवाह मोठा झाल्याशिवाय सर्वच्या सर्व फौजेंत निदान कांहीं हिंदी रेजिमेंट्समध्यें तरी पूर्णतः अधिकारी योग्य हिंदी झाल्याशिवाय, व त्याचप्रमाणें सेनापतीचा अधिकार मिळविण्यास लागणारी योग्यता फौजेंतील कार्यकुशल कामें करून अंगीं आल्याशिवाय हिंदीकरणाचें धोरण स्वीकारून सबंध फौज हिंदी होईल हें दृष्टीच्या टप्प्यांत येऊं शकत नाहीं."

या सर्व गोष्टींवरून एकच गोष्ट स्पष्टपणें दिसून येते व ती ही कीं, " बाप भीक मागूं देत नाहीं, व आई जेवूं घालत नाहीं " ! व यामुळें आमची मात्र उपासमार होत आहे. हिंदी सैन्यांत भरती होणें म्हणावें तर त्यास अनेक अडचणी व त्यामुळें पुरेसें हिंदी सैन्य तयार होत नाहीं. टेरिटोरियल फोर्स वाढवावयाचा नाहीं व भरतीसाठी येणारे हिंदी विद्यार्थी अयोग्य म्हणून पुरेसे घेतले जात नाहींत. ही कारणें खरीं व त्यामुळें हिंदीकरणाची चांगली वाढ होत नाहीं व ती होत नाहीं याचें प्रायश्चित्त कोणतें ? तर या खात्यावरील ताबा जबाबदार मंत्र्याकडे सोंपवावयाचा नाहीं ! अर्थात् हिंदीकरण नाहीं म्हणून पूर्ण स्वराज्य नाहीं, व हिंदी लोक त्यास अपात्र आहेत ! शिवाय, अल्पसंख्याकांचा प्रश्न, हिंदुमुस्लीम ऐक्य, संस्थानिकांचे हक्क, परदेशी राजकारण हे प्रश्न नीटपणें सोडवितां येत नाहींत म्हणून स्वराज्याची प्रगति कुंठित झालेली ! याचा खरा अर्थ म्हणजे हल्लींच्या ब्रिटिश साम्राज्याचीं सूत्रें हालविणाऱ्या अदूरदर्शी मुत्सद्यांस हिंदुस्थान आपल्या मगरमिठींतून सोडवावयाचा नाहीं एवढाच ! असो.

फौजेंतील कार्यक्षमतेचे विभाग साधारणपणें पुढील सांगतां येतील. ( १ ) फायटिंग युनिट्स, ( २ ) स्टाफ, ( ३ ) मिलिटरी ट्रेनिंग, ( ४ ) एज्युकेशनल एस्टॅब्लिशमेंट, ( ५ ) आर्. आय्. आर्मी सर्व्हिस, ( ६ ) आय्. ए. ऑर्डिनन्स, ( ७ ) मेडिकल सर्व्हिसेस, ( ८ ) व्हेटेरिनरी, ( ९ ) रीमाउंट, ( १० ) मिसेलेनियस, ( ११ ) ऑक्झिलियरी अँड टेरिटोरियल्स, ( १२ ) एअर फोर्स, ( १३ ) रॉयल इंडियन नेव्ही, ( १४ ) मिलिटरी एंजिनीअर्स. या चौदा शाखांत ७००० वर अधिक अधिकारी असतात व यांत आजघटकेस ६९१३ इंग्रज अधिकारी असून ३१६ हिंदी अधिकारी आहेत ! शिवाय हे ३१६ सर्व विभागांत नसून ते फक्त ( १ ) फायटिंग यूनिट्समध्यें १६६, ( ७ ) मेडिकल सर्व्हिसेसमध्यें ५३ ( ८ ) व्हेटेरिनरीमध्यें १७ ( १० ) मिसेलेनियसमध्यें ६१ व ( १२ ) एअरफोर्समध्यें १९ याप्रमाणें वेगळाल्या फक्त पांच शाखांतून वांटून दिले असून बाकीचे नऊ शाखांत एकहि हिंदी अधिकारी नाहीं हें १९३९-४० च्या अंदाजपत्रकावरून दिसून येतें.

१९१७ मध्यें इंग्लंडला हिंदी माणसांची व पैशाची गरज लागली तेव्हां त्यांना हिंदुस्थानच्या सरकारी व फौजी धोरणाची आठवण येऊन त्यांत बदल कर-

ण्याचें आश्वासन देण्यांत आलें व त्यानंतर फौजी खात्यांतील किंग्ज कमिशनच्या जागा हिंदी लोकांस अगदीं अल्प प्रमाणांत देण्यास प्रारंभ झाला. १९१९ च्या मॉंट-फर्ड सुधारणाअन्वयें जबाबदारीचें प्रातिनिधिक सरकार प्रथमतः सुरू करण्याचें घाटून पुढेंमागें लौकरच हिंदुस्थानला म्ह. हिंदी लोकांच्या हातीं राज्यकारभार सोंपविण्याचें अभिवचन देण्यांत आलें. जबाबदारी म्हटली म्हणजे ती सर्व प्रकारची असावयास पाहिजे, परंतु या ठिकाणींहि कंजुषीच दिसून आली ! जबाबदारीचें राज्य म्हटलें म्हणजे त्यांत स्वदेशरक्षणाच्याहि जबाबदारीचा समावेश झाला पाहिजे, पण १९१९-२० मध्यें बसविलेल्या आर्मी-इन-इंडिया कमिटीच्या ईशररिपोटात हिंदीकरणाबाबत एकहि गोष्ट सुचविण्यांत आली नाहीं ! यानंतर ऑक्झिलियरी व टेरिटोरियल फोर्सेस कमिटी नांवाची एक कमिटी सर जॉन शिया यांच्या अध्यक्षतेखालीं नेमण्यांत आली, परंतु या कमिटीपुढें फक्त नॉन-रेग्युलर फोर्सेसचें काम दिल्यानें त्यांनीं फक्त या बाबीपुरत्या शिफारसी केल्या व या शिफारसींकडे फौजी खात्यांतील अधिकाऱ्यांनीं दुर्लक्षच केलें. वस्तुतः हिंदुस्थानला जबाबदारीची राज्यपद्धति द्यावयाची असें ठरतांच कायदेकौन्सिलांप्रमाणेंच फौजी खात्यांतहि सुधारणा करून हिंदुस्थानांत पुढेंमागें राष्ट्रीय सैन्य निर्माण करण्याची व्यवस्था करण्याची योजना आंखणें अवश्य व क्रमप्राप्तच होतें, व त्याबरोबरच ज्या वर्गास फौजेमध्यें भरती बंद करण्यांत आली होती, किंवा ज्या प्रांतांतील लोकांचे रिक्रुटभरतीचें प्रमाण कमी झालें होतें, व त्यामुळें त्यांस "बिनलढाऊ" असें अपमानास्पद व हीनतादर्शक विशेषण लावण्यांत येई त्या सर्वांस फौजेंत भरती होण्याची सोय करून हिंदुस्थानांतील यच्चयावत् लोकांस जात-पात, पंथ, धर्म, भाषा, भौगोलिक मर्यादा वगैरे गोष्टी हिशेबांत न घेतां फौजी शिक्षण देऊन तयार करावयाचें म्हटलें असतें तर ! पण असें केलें असतें तर त्यांत गोडी राहती, सर्व लोक खुष होते, पण मग ज्या भेदनीतीवर साम्राज्याची इमारत रचली तिची वाट काय ! याप्रमाणें हिंदी लोकांबद्दल वाटणारा अविश्वास व इंग्लंडचें प्रत्यक्ष हित या दोन गोष्टी जरूर आड आल्या असाव्यात. याचे दुष्परिणाम आजच दिसत आहेत. हिंदुस्थानांतील सैन्यांत पंजाबकडील लोकांचें शेंकडा प्रमाण अधिक असल्यानें त्या लोकांस खुष ठेवणें अवश्य व याचा अर्थ त्यांस सवलती अधिक; पण हेंच प्रमाण सर्वत्र सारखें ठेवण्यांत येतें

तर कोणताहि एक प्रांत संरक्षणाचे बाबतींत दुसऱ्यावर मात करूं न शकता. हें जाणूनच महात्मा गांधींनीं मेजॉरिटी–मायनॉरिटी या प्रश्नावर " हरि-जन " मध्यें लिहितांना एक भयंकर चित्र रेखाटलें होतें तें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. हिंदीकरणासंबंधीं प्रश्न काढले कीं त्याविरुद्ध जी ओरड इंग्रज अधिकाऱ्यांकडून करण्यांत येते त्यांतील मुख्य मुद्दे असे:–( १ ) योग्य व पुरेसे हिंदी विद्यार्थी फौजेसाठीं मिळत नाहींत; ( २ ) ज्यांस नॉन–लिस्टेड क्लास ( पूर्वींचे बिनलढाऊ ) संबोधतात त्यांतील लोक अधिकारावर आल्यास लढाऊ समजल्या जाणाऱ्या फौजी लोकांवर दाब राहणार नाहीं; ( ३ ) मोठा प्रयत्न करून पाहण्यांत धोका–वगैरे मुद्दे आहेत यांचा विचार करणें जरूर आहे.

मागें दिलेल्या मध्यवर्ती असेंब्लीमधील कांहीं भाषणांच्या गोषवाऱ्यांत या गोष्टी आल्याच आहेत. सुशिक्षित ब्राह्मणास विशेषतः महाराष्ट्रीय ब्राह्मणास फौजेंत बंदी आहे म्हणजे त्यांस या ना त्या सबबीवर भरतीचे वेळीं नाकारण्यांत येतें हें पुण्याचे कॉंग्रेसचे महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेसचे अध्यक्ष व ॲसेंब्लीचे एक कॉंग्रेस प्रतोद श्री. न. वि. गाडगीळ यांनीं आपल्या भाषणांत स्पष्टच केलें आहे. ते म्हणतात:–" १९१४ च्या महायुद्धाला प्रारंभ झाला तेव्हां मी फौजेंतील भरतीसाठीं नांव दिलें असतां मी ब्राह्मण असल्यानें मला नाकारण्यांत आलें......परंतु दोन वर्षांनंतर १९१७ मध्यें मी पुनः अर्ज केला असतां मला गुप्तपणें घेण्यांत आलें व मला ११७ मराठा नांवाच्या कंपनींत घेतलें व नंतर इंडियन डिफेन्स फोर्सच्या युनिव्हर्सिटी बॅटेलियनवर नॉन-कमिशन्ड अधिकारी म्हणून बदली झाली.......याप्रमाणें यांना भेद उत्पन्न करावयाचे आहेत व त्यामुळें कांहीं विशिष्ट लोकांचे फौजेंत भरती हें वतन व्हावें इतकेंच नव्हे परंतु यांनीं असेंहि साधलें आहे कीं, हिंदुस्थानांतील एका विशिष्ट प्रांताचें वर्चस्व या बाबतींत रहावें....१ लक्ष ७० हजार फौजेपैकीं जे या देशाचे नागरिक नाहींत असे गुरखे लोक २० हजार असून व ज्यांचा प्रस्तुतच्या कल्पनांप्रमाणें या देशाशीं संबंध नाहीं असे ४–५ हजार लोकहि यांत आहेतच...आपण म्हणतां कीं यांत पूर्वपरंपरा पाहिजे. प्रो. हाल्डेनच्या मतें प्राणघाताचें प्रमाण शेंकडा दहा हजार टक्के वाढलें आहे. मग यावर शहाणपणाचें काम म्हणजे नुस्तें खुष्की सैन्य न वाढवतां संरक्षणाचें नूतन साधन जें वैमानिक दल त्याचीहि वाढ केली पाहिजे. या बाबतींत तरी इंग्रजांनाच खास

परंपरा नाही. वैमानिक दलाची उभारणी या गेल्या पंचवीस वर्षांतली आहे. चांगला पायलट किंवा चांगला वैमानिक अधिकारी होण्यासाठीं लागणाऱ्या गुणांची या बाबतींत काय परंपरा होती? परंपरा नसतां इंग्रजांस जर या खात्यांत काम करतां येतें तर मग हिंदी लोकांसच तें कां येऊं नये?"

विश्वविद्यालयीन फौजी संस्था म्हणजे यू. टी. सी. या संस्थांतून हिंदी लोकांस दिलें जाणारें शिक्षण अधिकारी होण्यास पुरेसें नसतें म्हणून त्यांस अधिकारी नेमण्यांत येत नाहीं, व हिंदी विद्यार्थ्यांस अधिकारी होतां येण्याची सोय करण्यास्तव यू. टी. सी. शिक्षण इंग्लंडच्या विश्वविद्यालयीन ओ. टी. सी. च्या बरोबरीचें करा म्हटलें कीं त्यांत खर्चाची अडचण, अभ्यासाची अडचण अशा अनेक अडचणी पुढें उभ्या करण्यांत येतात. हिंदी विद्यार्थ्यांस फौजेंतील सर्व विभागांचें शिक्षण आवडीप्रमाणें व ऐच्छिक पद्धतीचें देण्यांत यावें याबद्दल सर शिवस्वामी अय्यर, पं. हृदयनाथ कुंझरू, पी. एन. सप्रु, डॉ. मुंजे आदि अनेक हिंदी पुढाऱ्यांनीं ॲसेंब्लींत व कौन्सिल ऑफ स्टेटमधून कसून प्रयत्न केले, पण त्यांस पाहिजे तशी प्रगति करतां आली नाहीं. हिंदीकरणांत अधिकारी व सैनिक हे सर्वच हिंदी असावयास पाहिजेत. सैनिकांबाबत हिंदी फौजेंतील इंग्रज सोल्जर्स कमी करण्याबाबत पं. कुंझरूंनी २२ सप्टेंबर १९३७ रोजीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें पुढील ठराव मांडला होताः—ही सभा गव्हर्नर जनरलला शिफारस करते कीं त्यांनीं वरिष्ठ अधिकाऱ्यांस वळवून ब्रिटिश ट्रुप्सच्या जागीं हिंदी ट्रुप्सची सतत भरती हिंदी फौजेंत करण्याची व्यवस्था करावी, माजी कमँडर-इन्-चीफ लॉर्ड रॉलिन्सन यांनीं असा ठराव मागें मंजूर केला होता, परंतु त्यास चालना दिली गेली नाही... वसाहतींत असा प्रश्न उपस्थित झाला होता व त्यावेळीं हिज मॅजेस्टीच्या सरकारनें ब्रिटिश ट्रुप काढून त्या जागीं स्थानिक (वसाहती) फौज उभारण्यांत आली होती. यासाठीं दूर दृष्टि ठेवून हिंदुस्थानच्या हिताची योजना अमलांत आणणें सरकारास इष्ट होईल."

पी. एन्. सप्रुः—"१९२३ पासून ब्रिटिश ट्रुप्सच्या संख्येंत मुळींच काट केला नाहीं हें म्हणणें बरोबर आहे. हिंदुस्थानला वसाहतीसारखें स्वराज्य असेल तर फौजेचें हिंदीकरणहि झालें पाहिजे."

कमँडर-इन्-चीफः—"ब्रिटिश सोल्जर महाग पडतो हें जरी मीं कबूल केलें तरी मला ते अवश्य वाटतात ही गोष्ट बदलूं शकत नाहीं... हिंदुस्थान सरकार

व मी अशा दोघांसहि हिंदी लोकांना आपल्या देशाचें संरक्षण करण्याची सहाजिक हौस वाटावी याची जाणीव आहे, व या जाणिवेची खूण म्हणून आम्ही शक्य होईल तितकें हिंदीकरण करण्याची योजनाहि हातीं घेतली आहे. या योजनेंत बरेचसे ब्रिटिश अधिकारी व सैनिक यांच्या जागीं हिंदी लोक ठेवावयाचे ते हळुहळू पण व्यवस्थित करावे, व हें हिंदीकरण तोफखाना, सिग्नल्स व अमलदारांच्या नोकरींतून ( administrative services ) करावयाचें आहे. मी व माझे पूर्वींचे हुद्देदार यांनीं आपली भिस्त ब्रिटिश अधिकारी व त्यांच्या हाताखालचे ब्रिटिश सैनिक व ब्रिटिश अधिकारी व त्यांच्या हाताखालील हिंदी फौज यांवर ठेविली आहे. मी आपलें सबंध आयुष्य हिंदी फौजेंत घालविलें असून ज्यावर हिंदी फौजेची मदार आहे ते हिंदी अधिकारी व हिंदी शिपाई या हिंदी फौजेंबद्दल वाटणाऱ्या अभिमानांत मी कोणास हार जाणार नाहीं. पण एक गोष्ट मात्र दृष्टीआड करतां येत नाहीं व ती ही कीं, या हिंदी फौजेस शिक्षण देऊन तिच्या करवीं कार्य करवून घेणें या गोष्टी कितीतरी वर्षें ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं केल्या आहेत व हिंदी अधिकाऱ्यांनींच शिकवून तयार केलेल्या फौजेस जातिनिशीं युद्धांत कार्यक्षम ठेवण्याचें काम हिंदी लोकांनीं केलेलें अजून पहावयाचें आहे; याचा अर्थ हिंदी अधिकारी फौजेचें शिक्षण व पुढाकार घेऊं शकणार नाहींत असें माझें म्हणणें नाहीं. एकादे दिवशीं तसें घडून येईल अशी मी आशा करतों. ही आशा नसती तर आज चालू असलेल्या हिंदीकरणाच्या योजनेला मीं कधीं मान्यताच दिली नसती. परंतु या गोष्टीला वेळ लागणार आहे. जगांत फौजेंतील संघटनेंत एकदम पूर्णपणें बदल करणें कधींच शक्य नसतें."

लॉर्ड हाल्डेनच्या मतें विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांस फौजेंत घ्यावयाचें तें त्यांचें व्यक्तिशः पोट भरण्यासाठीं नसून राष्ट्रहितसंरक्षणांत त्यांचा उपयोग व्हावा हें मुख्य कारण आहे. परंतु जी गोष्ट इंग्लंडच्या विद्यार्थ्यांसाठीं करण्यांत येते ती हिंदी विद्यार्थ्यांना मात्र देण्यांत येत नाहीं. समुद्रकिनाऱ्यावरील रक्षण करावयाचें तर वस्तुतः हिंदी विद्यार्थ्यांस नाविकदलांत शिक्षण देण्याच्या मुबलक सोयी पाहिजेत. यासंबंधीं प्रश्न केला असतां ६ सप्टेंबर १९३७ रोजीं कॉमर्स सेक्रेटरी मि. डो पुढील उत्तर देतातः—" हिंदुस्थान सरकारनें हिंदी जहाजांची वाढ होण्यासाठीं हातीं घेतलेल्या साधनांत डफरिन ट्रेनिंग शिप् संस्था निर्माण

केली हें होय, व त्याशिवाय इंडियन एंजीनिअरिंग उमेदवारहि तयार केले जातात. पूर्वी युरोपियन नोकरांसाठीं असणाऱ्या बंगाल पायलट सर्व्हिसचें पूर्ण हिंदीकरण केलें आहे."

आमदार पंतलूः--"डफरिन ट्रेनिंग शिप् संस्थेनें हिंदी लोकांचें समाधान होऊं शकत नाहीं."

हिंदीकरण जलद करावयाचें म्हटलें, कीं त्यासाठीं तीन गोष्टींची जरूरी आहे. (१) शिक्षण कॉलेज, (२) मुलें व (३) प्रतिवर्षी रिकाम्या होणाऱ्या अधिकाऱ्यांच्या जागा. यासंबंधांत प्रश्न विचारले असतां पुरेशी माहिती देण्यांत येत नाहीं. १९३१ च्या इंडियन मिलिटरी कॉलेजकमिटीच्या रिपोर्टांत म्हटल्याप्रमाणें हिंदी फौजेंत एकंदर अधिकारी सातआठ हजार असून पैकीं दोनतृतीयांश म्हणजे सुमारें साडेचार हजार व्हाइसरॉय–कमिशन्ड अधिकारी आहेत व बाकीचे एकतृतीयांश म्हणजे अडीच हजार किंग्ज कमिशन असलेले अधिकारी आहेत. पहिल्या राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या डिफेन्स सब् कमिटीतला कमिशन्ड ऑफिसरींचा आंकडा ३१४१ आहे, तर स्कीन कमिटी रिपोर्टांत तो ३००० आहे व शिया कमिटीच्या रिपोर्टांत सुमारें ६००० आहे. १९३९–४० बजेट एस्टिमेटमध्यें ब्रिटिश अधिकारी ६१९३, हिंदी कमिशन्ड अधिकारी ३१६, व व्हॉइसराय यांचे कमिशन्ड अधिकारी ३९७७ असे आंकडे दाखविले आहेत व हे खरे धरण्यास हरकत नाहीं. आपण साधारण व्यवहारासाठीं ६ हजार हा आंकडा धरा, व याचें हिंदीकरण करावयास किती वेळ लागेल याचा विचार करूं या. किंग्ज कमिशन घेणाऱ्या अगदीं नवीन सब-आल्टर्नला कर्नल ही पदवी प्राप्त करून घेण्यास साधारण २८ वर्षें लागतात. कर्नल झाल्यावर त्यास बॅटेलियन कमँड देण्यांत येते व यानंतरची बढती प्रायः हुषारी पाहून करण्यांत येते ( by selection ). ६००० संख्येला २८ वर्षसंख्येनें भागल्यास येणारी संख्या म्हणजे इंग्रज ६००० अधिकारी २८ वर्षांनंतर सगळे जाऊन त्यांची जागा हिंदी लोकांनीं भरावयाची म्हटल्यास आपणांस दरवर्षी कमींत कमी २१५ हिंदी अधिकाऱ्यांस किंग्ज कमिशन मिळण्याच्या शिक्षणाची सोय करावयास पाहिजे. याशिवाय दरवर्षी आजारी पडून नोकरी सोडणारे, मृत्यूनें कमी होणारे व काढून टाकण्यांत येणारे कांहीं अधिकारी असणारच. यास "वेस्टेज" म्हणतात. हें सर्व विचारांत घेऊन स्कीन कमिटीनें दिलेले आंकडे बरोबर

आहेत असें धरून चालल्यास हिंदी फौजी बिभागांत दरवर्षी १८० जागा रिकाम्या होतात असें दिसतें. या दरवर्षी रिकाम्या होणाऱ्या जागांसाठीं व शिवाय सिव्हिलखात्यांत कांहीं मिलिटरी अधिकारी नेमले जातात त्या जागा धरून दरवर्षी आपणांस निदान २०० रिकाम्या जागा भरून काढल्या पाहिजेत, व यासाठीं कांहीं नापास होणारे व कांहीं आजारी पडणारे असे विद्यार्थी धरून २०० विद्यार्थी पास होण्यासाठीं यापेक्षां बरेच अधिकीचे विद्यार्थी परीक्षेस बसावयास पाहिजेत. यासाठींच हिंदुस्थानच्या फौजी कॉलेजांत दरवर्षी सध्यां फक्त ६० जागांसाठीं उमेदवार घेतले जातात. या ६० पैकीं सगळेच कांहीं पास होत नाहींत. तेव्हां यांपैकीं दरवर्षी खरोखरी किती उमेदवार पास होतात हें पाहिलें पाहिजे. सायमन कमिशनच्या रिपोर्टांत १० वर्षांचा आढावा घेऊन असें म्हटलें आहे कीं, सँढर्स्टमध्यें पाठविलेल्या एकूण १३४ विद्यार्थ्यांपैकीं फक्त ७७ पास होऊन त्यांस कमिशनें दिलीं गेलीं. याचें शेंकडावारीनें प्रमाण काढल्यास १०० पैकीं ६० टक्के विद्यार्थी पास होऊन त्यांस कमिशन्स मिळालीं. स्कीन कमिशनच्या शिफारसींप्रमाणें १८० जागा दरवर्षी भरून काढण्यास निदान ३०० विद्यार्थ्यांस कॉलेजांत घेणें अवश्य आहे. डेहराडून कॉलेजमध्यें दरवर्षी घेतल्या जाणाऱ्या ६० विद्यार्थ्यांचें तीन वर्षांचे अखेर पास होण्याचें प्रमाण पाहिलें तर प्रतिवर्षी ३० कमिशन्स मिळूं शकतील असें म्हणतां येईल. कांहीं विभागांतील हिंदी रेजिमेंट्समध्यें १२–१४ किंग्ज कमिशन्ड अधिकारी असतात व एका डिव्हिजनमध्यें किती रेजिमेन्ट्स असतात याचें प्रमाण काढल्यास सर्व ऑफिसर हिंदी होण्यास दरवर्षी ३० कमिशन्स मिळविणाऱ्या लोकांनीं मुळीच पुरें पडावयाचें नाहीं. याशिवाय सध्यां असणारा ब्रिटिश विभाग काढून टाकला तर एकेका रेजिमेंटमध्यें २८ अधिकारी लागतील व हें सर्व हिशेबांत घेतलें तर प्रस्तुन अस्तित्वांत असणाऱ्या फौजीशिक्षणपद्धतीनें सबंध अधिकाऱ्यांचे हिंदीकरणास वर्षांनुवर्षें लागतील व तोंपर्यंत हिन्दुस्थानला इंग्लंडच्या तोंडाकडे पहावें लागणार! ही स्थिति स्वातंत्र्याच्या दृष्टीनें अधिकच बाधक आहे. सँढर्स्ट उर्फ स्कीन कमिटीच्या शिफारसी पुढीलप्रमाणें होत्याः—

( १ ) प्रथमतः प्रतिवर्षी हिंदी विद्यार्थ्यांकरितां राखून ठेविलेल्या १० उमेदवारी जागा वाढवून त्या १९२८ पासून २० केल्या जाव्या;

( २ ) दरवर्षी सँढर्स्टच्या राखीव जागांत ४ ची अधिक भरती वाढवून १९३३ मध्यें एकूण त्या जागा ३८ कराव्या;

( ३ ) १९३३ मध्यें १०० विद्यार्थ्यांस पुरेसें इंडियन सँढर्स्ट नांवाचें फौजी कॉलेज हिंदुस्थानांत उघडावें;

( ४ ) प्रतिवर्षी इंडियन सँढर्स्टमध्यें प्रवेश करणारांच्या संख्येंत दर तीन वर्षांनीं १२ ची वाढ करावी, व हे सर्व पास होतील असें धरलें तर १९३८ मध्यें हिंदी विभागांत नेमण्यासाठीं म्हणून होणाऱ्या भरतीं-तील अर्धे विद्यार्थी हिंदी होतील.

( ५ ) १९५२ मध्यें हिंदी फौजेंतील एकंदर अधिकाऱ्यांपैकीं अर्धी संख्या पूर्णतः हिंदी होईल.

या पांच मुद्यांपैकीं सरकारनें पूर्वीपेक्षां विद्यार्थी उमेदवारांची संख्या दुप्पट करण्याच्या कलमासच फक्त मान्यता दिली. स्कीन कमिटीच्या सर्व शिफा-रसी मान्य केल्या गेल्या असत्या तर १९३३ मध्यें हिंदी किंग्ज कमिशन्ड ऑफिसर्स २१२ झाले असते, पण तसें झालें नसल्यामुळें १९३३ सालीं फक्त १०२ ऑफिसर्स होऊं शकले, म्हणजे अधिकारांचें हिंदीकरण १०० नीं मागें पडलें, व याचा अर्थ हाच कीं, स्कीन कमिटीच्या शिफारसींतील हिंदीकरणाची संख्या ५० टक्क्यांनीं कमी करण्यांत आली. स्कीन कमिटी नेमली गेली त्याच-वेळीं दुसरी एक एक्सपर्ट कमिटी नेमली गेली होती व हिनें केलेल्या शिफारसींत काय फरक करायला सांगितले होते त्याबद्दल कोणालाहि माहिती नव्हती ! ! या कमिटीनें ब्रिटिश व इंडियन यूनिट्सचे सबंध अधिकारांचें हिंदीकरणाचें धोरण आंखून ठेविलें होतें. व त्यांत ६८५४ अधिकारांच्या जागा धरल्या होत्या. या धोरणाचे मुख्य मुद्दे असे होतेः—

( १ ) हिंदीकरणाचा पहिला हप्ता १४ वर्षे. या कालांत प्रतिवर्षी ८१ हिंदी कॅडेट्सना कमिशनें द्यावयाचीं;

( २ ) हिंदीकरणाचा दुसरा हप्ता ९ वर्षांचा. या काळांत दरवर्षी १८२ हिंदी कॅडेट्सना किंग्ज कमिशन्स द्यावींत;

( ३ ) हिंदीकरणाचा तिसरा हप्ता ७ वर्षांचा; या काळांत दरवर्षी १०६ हिंदी कॅडेट्सना किंग्ज कमिशन्स द्यावींत;

या सर्व शिफारसी असून सुद्धां हिंदुस्थान सरकारनें दरवर्षी फक्त ६० जागा हिंदी कमिशनांना द्यावयाच्या असें ठरवून तें धोरण सरसेनापतींनीं जाहीर केलें.

त्यामुळें हिंदीकरणाचें काम फार मागें टाकण्यांत आलें हें सहज दिसेल. सध्यांच्या पद्धतीनें विशिष्ट काळांत एकूण अधिकारांपैकीं ६ टक्के अधिकारी हिंदी होतील! मग बाकीच्यांचें काय ?

रौन्ड टेबलच्या डिफेन्स सबूकमिटींतील दोन सन्मान्य सभासद सर शिवस्वामी आय्यर व जनरल राजवाडे ( ग्वालियर ) यांना, त्या कमिटीच्या सर्व शिफारसी मान्य नसल्यामुळें, वेगळी मतभेदपत्रिका लिहावी लागली. तिच्यांत हिंदीकरण व ब्रिटिशांची हिंदुस्थानांतील फौजीनीति यांजवर विदारक प्रकाश पाडण्यांत आला आहे. हिंदिकिरणाच्या द्रुतगतीविरुद्ध जीं कारणें पुढें करण्यांत येतात त्यांत हिंदी लोकांत फौजी पुढारीपणाची अपात्रता हें कारण प्रमुखत्वानें येतें. याबद्दल दोषी कोण याबद्दल स्कीन कमिटीनें म्हटलें आहे तें असेः-हिंदुस्थान सरकारनें आपल्या हातीं घेतलेलें कार्य (अधिकारांचें हिंदीकरण) तितकेंसें सोपें नाहीं. फौजेंतील उच्च अधिकारांतून हिंदी लोकांस मागील बरींच वर्षें दूर ठेविल्यामुळें ब्रिटिश सत्तेखालीं वागत असलेल्या हिंदी लोकांचा मागील इतिहास, व गतकालांत हिंदी लोकांस दुसऱ्यावर विश्वासून ठेवल्यामुळें व सिव्हिल व मिलिटरी राजवटींतील सत्तेपासून त्यांस पराङ्मुख केल्यामुळें आज अनेक भानगडी उपस्थित झाल्या आहेत, व त्या ओलांडून पुढील मार्ग सुकर करण्यास सहानुभूति, चतुरता आणि मनाची शांति या गुणांची परीक्षाच होणार आहे. मागील भागांत दिल्याप्रमाणें मराठा युद्ध, शीख युद्ध वगैरे गत ऐतिहासिक गोष्टींवरून हिंदी लोकांत फौजीपुढारीपण व युद्धकौशल्य परंपरागत आहे खास. मागील शंभर वर्षांत या गुणांचा परिपोष न झाल्यानें ते सध्यां सुप्त स्थितींत असले तरी त्यांस कार्य करण्याची संधि व प्राप्त कालाचें पाणी मिळाल्यास हिंदी लोक फौजीअधिकाराच्या जागीं अत्युच्च प्रकारची कार्यक्षमता दाखविल्याशिवाय खास राहणार नाहींत. फौजेंतील अधिकारी लोकांस ज्याप्रमाणें शरीरबल हवें तशीच त्यांस मानासिक बळाचीहि अवश्यकता असते, व या गुणांत सुशिक्षित माणसेंच अधिक काम करूं शकतील. हिंदुस्थानाखेरीज इतर सर्व देशांत स्वदेशांतील तरतरीत हुषार लोकांचा उपयोग फौजीखात्याकडे केला जातो, परंतु आमच्या या देशांत सुशिक्षित, तरतरीत व उच्चवर्णीय माणूस म्हटला कीं तो निरुपयोगी ठरतो. याचें कारण काय तर हिंदी लोकांवरील अविश्वास. सर जॉन अश्टन या इंग्रज गृहस्थानें लिहिलेल्या " स्टडी ऑफ वॉर " या पुस्तकांत तो म्हणतोः—

"कामाचा अधिक बोजा पडतेवेळीं सुशिक्षित मेंदूच कालावर स्वार होऊं शकतो, व सुशिक्षित माणूसच अशा वेळीं इतरेजनावर आपली हुकमत बसवूं शकतो."

( Only the educated brain can rise to the occasion in case of a strain and only the educated will take command over others. )

परंतु हिंदुस्थान सरकारचें लष्करी धोरण आजपर्यंत याच्या अगदीं विरुद्ध होतें हें जनरल रॉबिन्सनच्या पुढील उद्गारांवरून सहज कळेल. तो म्हणतो:-

"नेटिव्ह रेजिमेंट्समध्यें हें चुकीचें धोरण...आपल्या फौजेंतील हिंदी लोक
"इंग्रजी शिक्षण घेतलेले नसावेत हेंच बरें होईल. इंग्रजी शिक्षण
"फौजी लोकांस देणें म्हणजे सरकारी पैशाची उधळपट्टी व राजकीय
"दृष्ट्या गैरमुत्सद्दीपणा होय. खरोखर आम्हांस हवें तें हें कीं हिंदी
"शिपायांस त्यांची मातृभाषा, फारसी, देवनागरी, गुरुमुखी यांपैकीं
"आपपल्या जमातीची भाषा आली म्हणजे त्यांस मिळालेले हुकूम व रिपोर्ट
"लिहितां येतील एवढें ज्ञान त्यांना पुरें."

मागील सर्व प्रकरणें वाचून लष्करी धोरणांतील मुख्य मुद्दा हिंदी लोक फौजीखात्यांत कार्यक्षम होऊं नयेत हा होय, व हेंच धोरण हिंदीकरणाच्या द्रुतगतीची पिछेहाट करण्यांत स्वकारलें जात आहे. याबद्दल स्कीन कमिटीनेंहि स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे कीं,

"We are aware that the officlial view hitherto ex-
" pressed has been that the basis of any scheme of Indian-
" isation cannot be broadened unless and until a large
" number of fit candidates come forward to compete for
" the vacancies at present available. But we, regarding the
" matter from the human and practical standpoint, and
" looking to what we believe, must be the psychology of
" potential candidates, are convinced, that there can be no
" hope of real progress so long as the present official view
" which we have noticed, is maintained."

"हिंदीकरणाचे कार्याची व्याप्ति फौजेंत आज होणाऱ्या रिकाम्या जागा

भरण्यासाठीं योग्य व पुरेसे उमेद्वार मिळूं लागेपर्यंत वाढविणें बरोबर नाहीं या अधिकाऱ्यांच्या मुद्याची आम्हांस जाणीव आहे. परंतु या बाबतींत व्यवहार व मानवी शक्ति जमेस धरून व योग्य उमेद्वारांच्या मानसिक वृत्तीचा विचार करून आमची खात्री आहे कीं, अधिकाऱ्यांचा दृष्टिकोण जोंपर्यंत आम्हीं सांगितल्याप्रमाणें राहील तोंपर्यंत या बाबतींत खरी प्रगति होण्याची आशा नको. "

वस्तुतः अधिकारी म्हटला कीं, तो विद्यासंपन्न असावयास पाहिजे, कारण ज्यास लिहितां वाचतां येईल, ज्याचें उच्च शिक्षण झालें असेल त्याच माणसास जगतांतील नव्या उलाढाली, शोध, शास्त्रीय ज्ञान इत्यादिकांचें आकलन होऊं शकेल, व म्हणून परीक्षेंत पास होण्यास लागणारे सर्व गुण त्याजवळ असावयाचे. या संबंधांत सर चार्लस ब्राउन्सलो आपल्या स्ट्रेनोट्समध्यें म्हणतोः—

"The best educated are not the best valiant of our Indian "soldiers, and if competitive examinations were eventually "to divide the claims of candidates for the High Command, "the Sikhs, the Gurkhas and the Afridis would have little "chance against the Bengali and the Anglicised Indian "whose brain might weigh more than his heart. "

" जे उत्तम आणि विद्यासंपन्न हिंदी लोक असतात ते आमचे उत्तमोत्तम
" लढाऊ शिपाई नसतात आणि हाय कमांडच्या जागांसाठीं अर्ज
" करणाऱ्या उमेद्वारास चढाओढीच्या परीक्षेंतील निकाल हेच गुण
" जर गमक ठरले तर बंगाली किंवा आंग्लविद्याविभूषित इतर हिंदी
" लोकांपुढें शीख, गुरखे व आफ्रिडीज लोकांस संधि लाधणें शक्य नाहीं,
" कारण पहिल्या ( म्ह. सुशिक्षित ) लोकांचे मेंदू त्यांच्या हृदयापेक्षां
" अधिक वजनदार भरतात. "

कोणत्याहि देशांत आधीं लढाऊ व बिन लढाऊ असे भेद जनतेंत ठेवण्यांत येत नाहींत, पण ते हिंदुस्थानांत आधीं वाढविण्यांत आले, व आतां तो प्रयोग पुढें चालवावयाचा म्हणून हिंदीकरणाचा प्रश्न निघतांच ज्या वर्गांतील लोक आजपर्यंत हिंदी फौजेंत भरती करण्यांत आले व येतात, त्याच वर्गांतील लोकांस हिंदीकरणप्रसंगीं अधिकाराच्या अधिक जागा द्याव्या असें धोरण सरकारचें होतें, व म्हणून डिफेन्स सबकमिटीच्या रिपोर्टांतील बहुमतवाल्यांच्या शिफारसींत असें म्हटलें आहे कीं,

"Most of us consider it essential to reserve a large " number of vacancies for the classes that furnish recruits " to the army, in order to encourage those classes generally, " to assure them their representation in the King's Commi- " ssioned ranks of the Indian Army and to offer adequate " prospects of promotion to the rank and file."

"रँक अँड फाइल म्हणजे सामान्य सैनिकांस पुरेसें बढतीचें आश्वासन (प्रॉस्पेक्ट्स) असावें म्हणून, व ज्या वर्गांतील लोकांची आज फौजेंत भरती होते त्या वर्गास उत्तेजन देण्याकरितां व त्यांस पुरेसें प्रतिनिधित्व मिळावें म्हणून किंग्ज कमिशन्सच्या रिकाम्या जागांपैकीं बराच मोठा भाग या लोकांसाठीं राखून ठेवावा असें आमच्यापैकीं बहुतेकांचें मत आहे." याचा अर्थ हा की, इकडे हिंदी लोकांस अधिकाराच्या जागा खुल्या करण्यांत आल्या म्हणून म्हणावयाचें व ज्यांचे हितसंबंध आजपर्यंत हिंदी फौजेंत वाढले त्यांच्यापैकीं जमातींसाठीं पुनः अधिकीच्या जागा राखून ठेवावयाच्या; म्हणजे अर्थातच इतर लोकांची संधि कमी करावयाची; आहे कीं नाहीं खासा न्याय!! फौजेंतील रिक्रुटभरतींत साधारणतः शेतकरी व मजूर वर्गांतील अशिक्षित लोकच असतात व साधारणतः शिक्षित व उच्च वर्गी लोक यांत फार कमी असतात, म्हणून लढाऊ या नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या लोकांच्या मुलांसाठीं अधिकाराच्या जागा राखून ठेवाव्या असें म्हणणें योग्य होणार नाहीं.

अधिकाराच्या जागांसाठीं एकदां परीक्षा ही कसोटी ठेविली म्हणजे मग त्यांत एकास विशिष्ट राखीव जागा व बाकीच्यांस फक्त परीक्षाच असा भेदाभेद कां असावा? बापाच्या राजनिष्ठ नोकरीबद्दल तर त्याचे मुलास हें बक्षिस नव्हे? पण असें केल्यानें मग कमिशन्ड ऑफिसर्समध्येंहि भेदाभेद उगाच नाहीं कां होणार? सर्वांस सारखें शिक्षण द्या व त्या सर्वांना एकाच परीक्षेस बसूं द्या व तींत जे पास होतील त्यांस अधिकारपदें द्या म्हणजे सगळ्यांस सारखी कसोटी राहील व मग कोणालाहि कुरकुर करण्यास जागा उरणार नाहीं. शंभर जागांपैकीं सहासष्ठ जागा परीक्षेच्या उमेदवारास ठेवाव्या व बाकीच्या चौतीस टक्के जागा जमीनदार व लढाऊ लोकांच्या मुलांसाठीं राखून ठेवाव्या असें प्रथमतः जनरल राजवाडे यांचें म्हणणें होतें. स्कीन कमिटीनें परीक्षेच्या उमेदवारीसाठीं ८० टक्के जागा सोडाव्या व बाकीच्या २० टक्के जागा कमँडर-इन-चीफच्या

संमतीनें प्रवेशपरीक्षेस बसून पास झालेल्या मुलांस देण्यांत याव्या अशी शिफारस केली होती. सर मालकम व इतर मोठामोठ्या लोकांचें असें मत होतें कीं, अधिकाराच्या जागांसाठीं परीक्षेची कसोटी कमी प्रमाणांत ठेवल्यास पुरेसे विद्यार्थी लष्करी शाळांतून शिक्षण घेण्यास पुढें येणार नाहींत व म्हणून बहुमतास पुष्टि न देतां सर शिवस्वामि आय्यर व जनरल राजवाडे यांनीं आपलें स्पष्ट मत पुढील प्रमाणें दिलें आहेः--

"Unless the number of commissions available for competition is largely increased, we cannot expect young men to come forward in sufficiently large numbers for competitive examination. Nor is it possible to expect education at institutions to introduce any changes to adapt themselves to military requirements. We are therefore of opinion that the proportion of competitive vacancies should be fixed in accordance with the recommendation of the Skeen Committee, i. e. at 80%—(Dissenting minute Indianization College Com : 1931, P. 56.)

" कमिशन्सची संख्या परीक्षेंत उत्तीर्ण होणाऱ्या मुलांसाठीं वाढविल्याशिवाय
" चढाओढीच्या परीक्षेस अधिक मुलें बसणें संभवनीय नाहीं. त्याचप्रमाणें फौजी
" खात्यांत लागणाऱ्या गोष्टींना शिक्षणांत अन्तर्भूत करण्यासाठीं शिक्षणखात्यां-
" तील संस्थांनीं आपलें धोरण बदलणेंहि शक्य नाहीं. म्हणून आमचें मत
" असें आहे कीं, चढाओढीच्या जागांचें प्रमाण स्कीन कमिटीच्या शिफारसींस
" अनुसरून म्हणजे ८० टक्के ठरविण्यांत यावें. "

याप्रमाणें चढाओढींत सुशिक्षित विद्यार्थी अधिक शिरल्यास एकदम क्रान्ति होईल अशी भीति वाटणारे इंग्रज फौजी अधिकारी व कमिटीवरील व्हाइसराय-कमिशन्ड ऑफिसरांचे प्रतिनिधि यांनींहि व्हाइसरॉयचे कमिशन्ड अधिकारी व नॉन-कमिशन्ड ऑफिसर्सचें शिक्षण हीन दर्ज्याचें असल्यानें ते या चढाओढीच्या परीक्षेंत पास होणार नाहींत-निदान कमी पास होतील-अथवा मग त्यांस किंग्ज कमिशन्स मिळणार नाहींत, अथवा कमी मिळून ते नाउमेद होतील ही सबब पुढें करून त्यांचेसाठीं अधिकींच्या जागा राखून ठेवाव्यात असेंहि सांगण्यांत आलें. यावर एक प्रश्न असा कीं प्रांतिक खात्यांतून नोकरी करणाऱ्या

लोकांस उच्च दर्जाच्या नोकऱ्या किती प्रमाणांत द्याव्यात यासंबंधीं ली कमिशननें केलेल्या शिफारसींत फक्त २० टक्के जागा प्रांतिक नोकरींतल्या लोकांस द्याव्यात असें ठरलें होतें. मग फौजेंतच त्या अधिकीच्या कां राखीव ठेवाव्यात ? असो.

इतर राष्ट्रांत व खुद्द इंग्लंडमध्यें या किंग्ज कमिशन्सच्या बाबतींत काय कायदे आहेत ते पाहिले म्हणजे तोच कायदा हिंदुस्थानास लागू करण्यास हरकत नाहीं, म्हणूनच याचा जरा विचार करूं या. इंग्रजी फौजेंत अधिकारांच्या जागांची वांटणी पुढीलप्रमाणें असतेः--

( १ ) रॉयलआर्टिलरी व रॉयल इंजिनिअर्सः—खुल्या चढाओढीनें वुलविचच्या रॉयल मिलिटरी ॲकॅडमीमध्यें शिक्षण घेणारे.

( २ ) पायदळ व घोडदळः--चढाओढीच्या खुल्या परीक्षेनें रॉयल मिलिटरी कॉलेज सँढर्स्टमध्यें शिक्षण घेणारे विद्यार्थी ( ५० टक्के ). याशिवाय वसाहतींतील प्रजाजन व साधारण सैनिक वर्गांतील लोकांसाठीं ( २५ टक्के ). यांशिवाय क्वीन्स कॅडेट्स, युनिव्हर्सिटी कँडिडेट्स (इंग्लंडमधील), तसेंच वसाहतींचे युनिव्हर्सिटी कॅडेट्स व कलोनियल मिलिटरी फोर्सेसमधील लोक यांस या सदरांतील रिकाम्या जागांसाठीं उभें राहतां येतें. शिवाय नॉन-कमिशन्ड अधिकारीहि यांतच येतात.

कॅनडा, फ्रान्स, इटली, जपान व युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका या देशांत अशा तऱ्हेच्या राखीव जागा मुळींच ठेवण्यांत येत नसून परीक्षेंत उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांसच उच्च फौजी अधिकाराच्या जागीं घेण्यांत येतें. हिंदुस्थानला हाच नियम लावण्यास कोणती हरकत आहे ?

राउंड टेबलच्या बैठकीस गेलेल्या हिंदी प्रतिनिधींनीं एक संयुक्त पत्रिका तयार केली होती. तिच्यांत संरक्षण-खात्यासंबंधीं विशिष्ट धोरण आंखावें अशी एक योजनाहि मांडली होती. तिच्यांतच अधिकाराचे संपूर्ण हिंदीकरणासंबंधीं विचार पुढें मांडले होते. त्यांत २० ते २५ वर्षांत सबंध फौजेचें हिंदीकरण करावें, व हिंदी फौजी कौन्सिलरांचें एक मुख्य कर्तव्य म्हणजे हिंदीकरणासाठीं हिंदी अधिकारी तयार करण्याची तरतूद ठेवणें हें सुचविलें होतें. ( Vol. 1, P. 1, page 101 ) यावर सायमन कमिशननें सुचविलेल्या शिफारसींतील

मतासच पुष्टि देण्यांत जॉईट कमिटीनें आपलें बुद्धिवर्चस्व दाखविलें आहे. ते म्हणतातः—

"The issues involved are too vital and the practical difficulties too great to justify a precipitate embarkation on a wholesale process of substituting Indian for British personnel in the Indian army."

याचा अर्थ असाः—"हिंदीकरणांतील मुद्दे अत्यंत जिव्हाळ्याचे असून व्यावहारिक अडचणीही इतक्या प्रचण्ड आहेत कीं हिंदी सैन्यांत ब्रिटिश लोकांच्या ऐवजीं हिंदी लोक भरती करण्याची क्रिया एकदम मोठ्या प्रमाणावर सुरू करणें समर्थनीय ठरणार नाहीं !" पुढें जॉईट कमिटी असेंहि म्हणते कीं, १९३१ मध्यें हिंदीकरणाच्या आंखलेल्या योजनेस अनुसरून एक कॅव्हलरी ब्रिगेड व एक इन्फंट्री डिव्हिजन व तत्संबंधीं इतर लहान विभाग यांचें पूर्ण हिंदीकरण विशिष्ट काळांत होईलच, व हिंदुस्थानांतील फौजी अधिकाऱ्यांनीं (ब्रिटिश) या योजनेची पूर्ण जबाबदारी आपल्यावर घेतल्याची आम्हांस ग्वाही दिली असून या योजनेच्या यशापयशावर बाकीच्या फौजेचें हिंदीकरण अवलंबून ठेवण्यांत येईल.

फौजेंतील हिंदी विभागांत वरिष्ठ अधिकारी इंग्रज असल्यानें इतर सैनिकांबरोबर दळणवळण नीट रहावें व साधारण हिंदी लोकांची अधिकाराची हौस फिटावी म्हणून व्हाइसरायचे कमिशनच्या जागा निर्माण करण्यांत आल्या होत्या, व त्यांतील अनेक वर्षें कार्यक्षम अशा वयातीत अधिकाऱ्यासहि अपरिचित व नूतन आणि अननुभवी इंग्रजी कमिशन्ड अधिकाऱ्याच्या हाताखालींच रहावें लागे. या अननुभवी नूतन इंग्रज अधिकाऱ्यांचें व्यंग बाहेर पडूं नये म्हणून प्लॅटून्स व ट्रूप्सच्या शिक्षणप्रसंगीं होणाऱ्या हालचालींत या इंग्रज अधिकाऱ्यांस मदत म्हणून व्हाइसरायचे कमिशनचे अधिकारी या फौजेंत ठेवण्यांत येतात. हिंदीकरणाचा प्रश्न पुढें येतांच या व्हाइसराय कमिशनच्या अधिकाराच्या जागा कमी कराव्या व ज्या विभागाचें हिंदीकरण करण्यांत येईल त्यांतीलच फक्त व्हाइसराय कमिशन्ड ऑफिसर्स कमी करून ह्या जागीं सर्वच हिंदी किंग्ज कमिशन्ड अधिकारी ठेवण्यांत यावेत असेंहि मोठमोठ्या फौजी अधिकाऱ्यांनीं सुचविलें होतें. यांत दोन गोष्टी दिसून येतात व त्या अशा कीं, किंग्ज कमिशन्ड ऑफिसरला व्हाइसराय कमिशनच्या अधिकाऱ्यापेक्षां वेतन ज्यास्त, व सर्वच किंग्ज कमिशन्ड ऑफिसर हिंदी विभागांतील हिंदीकरण

विभागांत नेमल्यास त्या विभागाचा खर्च साहजिकच अधिक वाढेल. त्याचप्रमाणें नूतन अननुभवी इंग्रज किंग्ज कमिशन अधिकाऱ्यांचे पुढारीपणांत होणारी फजिती टाळण्यास व्हाइसराय कमिशन्ड अधिकारी तसेच ठेवावयाचे व हिंदी किंग्ज कमिशन्ड हिंदी अधिकारी नवीन व अननुभवी असतां त्यांस मात्र फौजी अधिकाराची पूर्ण संवय होण्यापूर्वीच त्याचे व्हाइसराय कमिशनचे अधिकारी कमी करावयाचे म्हणजे त्यांचें व्यंग सहजच खुलून दिसावयाचें, व मग पुनः "पाहिलं! आम्हीं म्हटलंच होतं कीं, हिंदी लोक फौजी पुढारीपणास अयोग्य आहेत, व तसंच झालं!!" असें म्हणावयाला हेच ब्रिटिश अधिकारी तयार! याशिवाय त्यांनीं जर म्हटलें, कीं कांहीं दिवस तरी आम्हांला व्हाइसराय कमिशन्ड अधिकारी मदतीस ठेवा कीं लागलीच "पहा हे नूतन हिन्दी कमिशन्ड अधिकारी कसे कामचुकार आहेत!" आजपर्यंत कोणत्याहि हिंदी कमिशन्ड अधिकाऱ्यानें कामचुकारपणा केल्याचें मुळींच ऐकिवांत नाहीं. शिवाय एकाच सैन्यांत एकाच किंग्ज कमिशन्ड इंग्रजी व हिंदी अधिकाऱ्यांचे बाबतींत वेगळाले भेद करणें शिस्तीच्या दृष्टीनें केव्हांहि योग्य नाहीं. कारण त्यामुळें एकांत उन्माद तर दुसऱ्यांत न्यूनगंड उत्पन्न व्हावयाचा.

याप्रमाणें हिन्दकरणाचे बाबतींत अजूनहि अनेक अडचणी उभ्या करून होतां होईतों पूर्ण हिंदीकरणानें तयार होणाऱ्या राष्ट्रीय हिंदी फौजेच्या कल्पनेस अनेक तऱ्हेनें विरोध होत आहे, व अनेक वर्षें हिंदी फौज आपल्या कह्यांत रहावी असें इंग्रज मुत्सद्यांस व हिंदुस्थान सरकारास वाटत आहे. यावर सर शिवस्वामी आय्यर व जनरल राजवाडे यांचे अल्प मतपत्रिकेंतील लहानसा उतारा देणें अप्रासंगिक होणार नाहीं म्हणून तो देऊं. ते म्हणतातः—

" We believe that if the policy of Indianization were "started in right earnest and carried out on sound national "lines it should be possible for us to train ourselves and to "undertake the responsibility for defence within a period "of something like 30 years."

याचा अर्थ असा कीं, हिंदीकरणाचें धोरण पोटांतील जिव्हाळ्यानें चालू केलें व राष्ट्रीय धोरण त्यांत गोंवलें गेलें तर आम्हांला लष्करी शिक्षण घेऊन तयार होणें आणि आपल्या देशाच्या संरक्षणाची जबाबदारी उचलणें या गोष्टी सुमारें ३० वर्षांच्या आंत सहज सिद्धीस जाऊं शकतील.



# भाग ७

# राष्ट्रीय जागृति व सहकार्य



प्रत्येक नागरिकास आजकालच्या काळांत स्वदेशसंरक्षणासंबंधी माहिती कमी-अधिक प्रमाणांत असावयास पाहिजे. सर्व जगभरच क्रान्ति होत असल्यानें उच्चनीच जाती या भावना नष्ट होत आहेत, स्त्रीपुरुष हे भेद नाहींसे होत आहेत, त्याचप्रमाणें संरक्षणाची बाब फक्त लढाऊ अथवा फौजी लोकांसच माहीत, बाकी इतरांस त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं, हा समजहि पार बदलून प्रत्येक नागरिकावर स्वदेशसंरक्षणाची जबाबदारी येते, व म्हणून युद्ध म्हणजे काय, त्यासाठीं कोणत्या गोष्टींची आवश्यकता असते, संरक्षणार्थ काय काय गोष्टी पाहिजेत, व त्यासाठीं राष्ट्रांतील स्त्रीपुरुषांवर कोणती जबाबदारी आहे, या सर्व गोष्टींचा विचार प्रत्येक स्त्रीपुरुषानें करावयास पाहिजे. दुसऱ्याच्या गोष्टी हिरावून त्यावर आपली सत्ता बसविणें हा मानवी धर्म नसला, तर सहज स्वभावप्रवृत्ति असते, व या वृत्तीमुळें एका राष्ट्रांतील लोकांनीं दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांवर स्वारी करून त्यांस लुबाडून, जिंकून, मारून त्यांस आपलें वर्चस्व कबूल करावयास भाग पाडावयाचें व त्यांजवर आपलें साम्राज्य प्रस्थापित करावयाचें ही वृत्ति फार पुरातन कालापासून चालत आलेली आहे. सर्व जगतांत शांतता असावी असें म्हणणारे लोक व राष्ट्रें स्वार्थासाठीं या शांततेच्या तत्त्वास हरताळ फांसून अत्याचार करतात. कोणी धर्माच्या नांवाखालीं, तर कोणी संस्कृतिप्रसारार्थ, कोणी समाजसुधारणेकरितां, तर कोणी राजकीय प्रगतीकरितां व व्यापारासाठीं, कोणी मानव्याच्या विकासाकरितां तर कोणी कल्पनेंतलें स्वर्गसुख या पृथ्वी-तलावर आणण्याकरितां—अशा अनेक हेतूंनीं प्रेरित होऊन परराष्ट्रांतील कमकुवत व दुभंगलेल्या लोकांवर आक्रमण करितात, व आपल्या जीवनांतील "देव" सुप्त करून "राक्षसी" अगर पाशवी वृत्तीला जागृत करून आपला आक्रमणचा मार्ग सुधारतात हा अनुभव प्रत्येक काल, देश व स्थितींत प्रत्यहीं माणसास येतो.

राष्ट्र म्हटलें कीं, त्याचे अन्तर्गत भौगोलिक, राजकीय व आर्थिक जविन व्यवस्थितपणें चालविण्याची व्यवस्था असणें जरूर असतें, व याचा नाश कर-

ण्यास उद्युक्त होणारें राष्ट्र आक्रमक समजलें जातें. आक्रमणापासून जित राष्ट्रास जेत्या राष्ट्रांच्या मनाप्रमाणें वागणें भाग पडतें. याप्रमाणें आपल्या मताप्रमाणें दुसऱ्या राष्ट्रास ऐकावयास भाग पाडण्याचे दोन मार्ग असतात. पहिला मार्ग म्हणजे लोकांचा जीवितनाश, शहरांची नासाडी, अन्तर्गत चळवळींचा नाश अथवा अन्तर्गत जीवनप्रवाह स्थगित करणें, आणि सर्व बाबतींत आपला पगडा बसविणें. दुसरा मार्ग म्हणजे त्यांचे जिन्नस निर्गत होऊं न देतां व त्यांस बाहेरील जिन्नस मिळूं न देणें, व त्यामुळें सर्व देशांत बेकारी वाढवून लोकांची पूर्ण उपासमार करून त्यांस शरणागतीला आणून त्यांस जिंकणें हा होय. पहिल्या मार्गानें राष्ट्रांतील प्राणहानि, शहरांची व ग्रामांची हानि वगैरे करावयासाठीं त्या राष्ट्रावर आपली फौज पाठवून देश जिंकावयाचे व तेथें आक्रमकांनीं आपलें वर्चस्व प्रस्थापित करावयाचें, किंवा वैमानिक दलामार्फत राष्ट्राचें नुकसान करून अन्तर्गत व्यवहार बंद पाडायचे. दुसऱ्या मार्गानें राष्ट्रांचा बाहेरच्या इतर देशांशीं असलेला संबंध तोडून त्यांचा कोंडमारा करावयाचा असतो. स्वदेशावर याप्रमाणें परराष्ट्राचें आक्रमण होऊं नये व आपले अन्तर्गत व्यवहार सुरक्षित चालावेत म्हणून संरक्षणाचे तीन मार्ग प्रथमतः हातीं ठेवणें इष्ट असतें, व ते म्हणजे निसर्गमार्ग जमीन, हवा व पाणी अथवा सरहद्द प्रांत, अन्तरिक्ष व जलमार्ग म्हणजे समुद्रालगतचा किनारा हे होत. यासाठीं खुष्की फौज-यांत पायदळ, घोडदळ, यांत्रिकदळ (मोटर व रणगाडे), नाविकदल अथवा आरमार, आणि अंतरिक्षसेना किंवा वैमानिक दल, या तीन साधनांनीं स्वदेशाचें संरक्षण करावयाचें असतें. हे तीन मार्ग कार्यक्षम राहण्यास्तव प्रत्येक देशाजवळ आपापल्या परिस्थितीस अनुसरून खुष्की फौज, व वैमानिक दल आणि ज्या राष्ट्रास समुद्रकिनारा असेल त्यास नाविक दलाची तरतूद करणें अवश्य आहे. यासाठीं प्रथमत: फौजेंत काम करणारीं जिवंत यंत्रें म्हणजे भरपूर माणसें पाहिजेत. आधुनिक कालास यांत्रिक युग म्हणतात व त्यासाठीं देशांत प्रथमतः कारखाने मोठ्या प्रमाणांत स्थापन करावयास पाहिजेत. हिंदुस्थानांत माणसांची मुळींच वाण नसून त्यांचें संघटन करण्याचीच फक्त अवश्यकता आहे. फौज म्हटली कीं तींत माणसांचा पुरवठा असावयास पाहिजे. याची हिंदुस्थानांत मुळींच कमतरता नाहीं. यानंतर अवश्यक साधनें म्हणजे शस्त्रास्त्रसुसज्जता. सैन्यांत माणसें असून शस्त्रें नसतील तर त्या माणसांचा उपयोग नाहीं. शस्त्रांचा

भरपूर पुरवठा मिळण्यासाठीं तीं तयार करावयास लागणारे कारखाने उभे करावयास हवेत. बंदुका, काडतुसें, तोफा, मोटरी, मोटरसायकली, विमानें वगैरे सर्व लढाऊ साधनें तयार करण्यासाठीं लागणाऱ्या जिनसांचा भरपूर पुरवठा असावयास पाहिजे, व हें सर्व सुरळित चालण्यासाठीं मुबलक पैसा हवा. या सर्वांचा विचार करणें अवश्य आहे.

कधीं कधीं वाइटांतून चांगलें निघतें तसेंच चांगल्यांतून वाइटाचा उगम होतो हें तत्त्व व्यवहारांत प्रत्यहीं नजरेस येतें. मरण आलेंच नाहीं तर जगतांत कांहींच बदल व्हावयाचा नाहीं व मग प्रगतीला थाराच मिळावयाचा नाहीं. दुःख झाल्याशिवाय माणूस सुखामागें लागत नाहीं, व सुखाचा अतिरेक झाला कीं दुःखाचा उगम होतो. प्रजावाढ अधिक झाली कीं त्रास होतो, व संतति-नियमनाचे ठगव व क्लृप्त्या पुढें येतात, तर ज्या देशांत प्रजावाढ कमी होते ते आपली लोकसंख्या वाढविण्याच्या खटपटीस लागतात. याप्रमाणें जीवितास होणाऱ्या अपायापासूनच नवीन नवीन शोधांचा उगम होतो. महायुद्धांत व तत्पूर्वीच्या अनेक युद्धांत झालेल्या जखमांतून उत्पन्न होणारी विरूपता नाहींशी करण्यासाठीं अनेक शस्त्रक्रियेंतील उत्तमोत्तम शोधांची भर वैद्यशास्त्रांत पडली. त्याचप्रमाणें काल व अंतर यापासून होणारी अडचण नाहींशी करण्यासाठीं टेलि-फोन, यांत्रिक वाहतुक, रेडिओ वगैरे अनेक आधुनिक शोध बाहेर येऊन त्यांतून जीवितास सुख होऊं लागलें. परंतु त्यांचा अतिरेक होतांच "आतां पुढें काय ?" हा प्रश्नहि आज जगतापुढें दृत्त म्हणून उभा ठाकला आहे ! राष्ट्रसंपत्ति वाढविण्यासाठीं भूमिगत द्रव्यांचा शोध व त्यांचा उपयोग सुरू झाला. त्यांचा व अनेक शास्त्रीय शोधांचा उपयोग जो मूलतः जीवित सुखमय करण्यासाठीं म्हणून करण्यांत आला तोच पुढें जीवितनाशाच्या कामीं पडूं लागला. म्हणून शास्त्रीय शोधाला नांवें ठेवून काय होणार ? शेवटीं प्रत्येक गोष्टीचा उपयोग जसा होईल तसा त्याचा परिणाम जगावर होईल यांत शंका नाहीं. जगतांत युद्धा-शिवाय इलाज नाहीं व अखेर आपल्या वर्चस्वासाठीं युद्धाची अत्यंत जरूरी आहे व पौरुष हेंच अखेरचें सत्य असें सांगणारे युध्यमान लोक व युयुत्सु, जसे जर्मन नीत्शे, बर्नहार्डी व तामसी बुद्धाचे लोक आहेत त्याचप्रमाणें आजहि जगतांत लॉर्ड ब्राइस, नॉर्मन अँगेल, बर्ट्रन्ड रसेल, रोमें रोलाँ, रवीन्द्रनाथ टागोर, महात्मा गांधी वगैरे अनेक शांततावादी लोकहि प्रत्युत्तर देण्यास आहेतच. मग खरें तत्त्व पाहतां

दोन्ही अन्तिम टोकांच्या मध्यबिंदूवर स्थित असणारें व्यवहार्य तत्त्व हेंच खरें धरावें लागतें, व अखेर "कालाय तस्मै नमः" म्हणून प्राप्तकालांत परिस्थित्यनुरूप आपल्या विचारसरणींत फेरबदल करावा लागतो. दोस्त राष्ट्रें व जर्मनी, रशिया, इटली वगैरे हतबल किंवा एकेवेळीं कमबल असणारीं राष्ट्रें यांच्या परस्परांतील चढाओढीमुळेंच आज जगांत दिसणाऱ्या वैमानिक दलांच्या सुधारणांचा शोध लागला ना! युद्धप्रसंगीं आपणांस नडणाऱ्या अडचणींचा परिहार करण्यासाठींच नवीन नवीन जिनसांची निर्मिति होत असते. वेळप्रसंगीं जमिनींतून उत्पन्न होणारें पेट्रोल आपणांस न मिळाल्यास त्याचे जागीं यंत्रांत शक्ति निर्माण होण्यास जमिनींतून उत्पन्न होणाऱ्या झाडांतून पेट्रोल निर्माण करतां येतें हा शोध फ्रेंच शोधकांनीं लाविलाच कीं नाहीं! व त्याकरितां फ्रेंच देशांत पेट्रोलचे ऐवजीं तेल उत्पन्न करण्यास मदतगार होणाऱ्या विशिष्ट झाडांची लागवड फ्रान्समध्यें करून या झाडांचीं जंगलेंच्या जंगलें उभारण्यांत आलीं आहेत.

प्रत्येक देशाला स्वसंरक्षणार्थ सैन्याची जरूरी असते. सैन्य म्हटलें कीं, आजच्या परिस्थितींत पूर्वीच्याप्रमाणें केवळ माणसें आणि थोडीबहुत शस्त्रें व प्राणी नसून आतां युद्धांतील शस्त्रास्त्रें म्हणजे बंदुका, तोफा, काडतुसें, मोठ्या पल्ल्याच्या तोफा, विमानें, रणगाडे, सबमरिन्स, ड्रेडनॉट वगैरे भूमि, जल व अंतरिक्ष यांतून वाहतुकीचीं साधनें व शस्त्रें यांचा पुरवठा–इत्यादि होत. हा पुरवठा नीट होण्यासाठीं हिंदुस्थानास अवश्य असणाऱ्या सैन्यांतील गरजा लक्षांत घेऊन त्यांचे सहाय्यानें आर्थिक धोरण, औद्योगिक कारखान्यांची वाढ आणि नौका बांधण्याच्या गोदी इत्यादिकांकडे लक्ष देणें अवश्यक आहे. औद्योगिक कारखान्यांत नित्य लागणाऱ्या भूमिगत द्रव्यांची छाननी करणारे भूस्तरशास्त्रज्ञ (Geologists), रासायनिक द्रव्यांचा अभ्यास करणार शोधक रसायनशास्त्रज्ञ व ज्या जिनसा हिंदभूमींत मिळत नसतील त्यांची उत्पत्ति इतर जिनसांपासून करण्याचा शोध लावणारे तज्ज्ञ, नाना तऱ्हेचे एंजिनीअर्स वगैरे लोकांची अवश्यकता आहे. या सर्व शास्त्रज्ञांचा समावेश होण्यासाठीं मोठाले कारखाने पाहिजेत व या कारखान्यांची ठेवण व संघटना शांतताकालीं वाहतुकीच्या उपयुक्त जिनसा तयार करणें व युद्धप्रसंगीं सर्वांचा उपयोग शस्त्रसामुग्री तयार करतां येणें या धोरणावर ठेविली पाहिजे. याचबरोबर या यांत्रिक युगांतील वाहतुकीचीं साधनें उपयोगी पाडून देणारे मॅकॅनिक्स, फिटर्स, ड्रायव्हर्स वगैरे तयार करण्याचीं साधनें व त्यांबरोबर

युद्धप्रसंगीं खुष्की सैन्यांत, वैमानिक दलांत व नाविक दलांत काम करण्यासाठीं या सर्व शिक्षणांतून गेलेलीं माणसें तयार करणाऱ्या शिक्षणसंस्थांची स्थापना झाली पाहिजे. या सर्वांसाठीं लागणारा पैसा मिळविण्यासाठीं एखादी आर्थिक योजनाहि आंखणें जरूर आहे. याकरतां आर्थिक तज्ज्ञांची कमिटी असणें अवश्य होतें. इतर राष्ट्रांप्रमाणें पंचवार्षिक, दशवार्षिक, सप्तवार्षिक असा कार्यक्रम आंखून त्या दिशेनें कार्य केल्यास गोष्टी सुकर होतील, पण हें सर्व पार पडावयाचें म्हणजे सत्ता व धोरण लोकांच्या हातांत असावयास पाहिजे व याचाच अर्थ " स्वराज्य हवें " हा होय. हें स्वराज्य नाहीं म्हणून वरील सर्व विवेचन फोल आहे असेंहि होईल, परंतु " अल्पारंभः क्षेमकरः " या न्यायानें निराश न होतां राष्ट्रांतील धनिक लोकांनीं आपली संपत्ति एकवटून तिचा उपयोग राष्ट्रहितार्थ करावयास पाहिजे हीहि गोष्ट तितकीच खरी आहे.

आज आपली परिस्थिति पाहूं या. हिंदुस्थानांत आज सुशिक्षित व अशिक्षित बेकार लाखोंनीं मोजतां येतील. या सर्वांस कामावर रुजू केल्यास त्यांच्या पोटापाण्याची सोय लावतां येण्यासारखी आहे व ती लावल्यास औद्योगिक चळवळी व कारखाने सुरू करतां येतील. कारखान्यांवर असा आक्षेप घेण्यांत येत असतो कीं, प्रथम कांहीं लोकांची सोय झाली तरी पुढें उत्पादनशक्ति वाढतांच मालाचा पुरवठा प्रमाणबाह्य होऊन तो विकेनासा होईल व मग साहजिकच त्या जिनसा पडून राहतील, व व्यापार मंदावेल. या सर्व गोष्टींचा विचार अर्थात्‌च अर्थशास्त्राचा आहे आणि त्याचें खोल विवेचन करणें हा या ग्रंथलेखनाचा विषय व उद्देश नव्हे. तरी विचार केल्यास त्यांतूनहि मार्ग निघणार नाहीं असें नाहीं. आज आपण कारखान्यांचें धोरण ठरवावयाचें तें कांहीं एका आर्थिक धोरणानुसारच आंखावें लागेल. त्यावर सरकारी नियंत्रण राहील व त्यासाठींच राष्ट्रीय धोरण आंखणारी समिति National Planning Committee बसविण्यांत आलेली आहे. या समितीचें मुख्य कार्य म्हणजे राष्ट्राच्या संपत्तिसंवर्धनाचें ध्येय समोर ठेवून औद्योगिक संघटना करण्याचे मार्ग आंखून देणें हेंच राहील. यांतून देशांत अनेक प्रकारचे औद्योगिक कारखान्यांचें धोरण आंखावयास पाहिजे, व त्यांत निर्मितीच्या वस्तूंचा प्रमाणबाह्य सांठा न होण्याची तजवीजहि करणें जरूर आहे. अॅडम स्मिथनें म्हटलें आहे कीं Defence is more important than opulence, म्हणजे पोट वाढून लठ्ठ होण्यापेक्षां

संरक्षणाचें तत्त्व अधिक महत्त्वाचें आहे. आपल्या देशांतील उत्पन्न होणारा माल विकला जाण्यासाठीं स्वदेशी मालास संरक्षण देऊन परदेशी मालाची आयात बंद पाडणें अगर कमी करणें जरूर आहे व हें कार्य राष्ट्रीय सरकार करूं शकेल.

आज युद्धास लागणाऱ्या वाहतुकीच्या साधनांचा उपयोग, नीट होण्यासाठीं त्याची चालक शक्ति म्हणजे तेल या जिनसेचा पुरवठा नीट व्हावयास पाहिजे. तो पुरवठा होणें हिंदुस्थानला तितकेंसें शक्य नाहीं; याचें कारण जागतिक तेलाच्या पुरवठ्यापैकीं खुद्द हिंदुस्थानांत उत्पन्न होणाऱ्या तेलाचें प्रमाण शेंकडा १ टक्का आहे ! व हें तेल शांततेच्या काळांतहि हिंदुस्थानच्या वाहतुकीची गरज भागविण्यास पुरेसें नसल्यानें या जिनसेचा पुरवठा इराण व रशिया या देशांतून आपणांस करून घ्यावा लागतो. याखेरीज केरोसीन तेल, जळतीचें तेल, व संघर्षणवर्धक तेल म्ह. वंगण ( lubricating oil ) यांचा पुरवठा आपणांस बाहेरूनच आणावा लागतो. भूस्तर शास्त्राचे मतें या तेलाचा पुरवठा हिंदुस्थानास काश्मिर, नेपाळ व टिराई प्रदेशांतून होण्यासारखा आहे. पण या माहितीच्या सत्यासत्यतेचा अनुभव अजून घेतला गेला नाहीं.

आज जगतांत चालूं असलेल्या महायुद्धाचे पोटांत तेलाचा भरपूर पुरवठा हा एक विषय महत्त्वाचा आहे. जगतांत पेट्रोल कोणत्या देशांत किती उत्पन्न होतें याचें प्रमाण साधारणतः असें आहेः—

| | | |
|---|---|---|
| युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका— | शें. | ६२·७ |
| रशियन रिपब्लिक— | ,, | ९·९ |
| व्हेनेझुएला— | ,, | ९·२ |
| इराण— | ,, | ३·८ |
| डच ईस्ट इंडीज्— | ,, | २·६ |
| रुमानिया— | ,, | २·५ |
| मेक्सिको— | ,, | ४·० |

हे आंकडे प्रो. अघारकर यांच्या "If war comes" या पुस्तकावरून घेतले आहेत. इंग्लंड, फ्रान्स, इटली व जर्मनी या देशांत पेट्रोल मुळींच उत्पन्न होत नाहीं. अलीकडे वाहतुकीसाठीं कोळशापेक्षां तेलाचा उपयोग अधिक होत आहे व त्यामुळेंहि तेलाचा खर्च अधिक, व म्हणून व्यय अधिकीचा. यांत सामान-

वाहतुकीसाठीं दगडी कोळशाचा अधिक उपयोग व्हावयास पाहिजे, म्हणजे पेट्रोलचा खर्च त्या मानानें कमी होईल.

रंग, पॉलिश, लिथोशाई, ग्रामोफोन रेकॉर्ड व विजेच्या तारांवर बसविण्याचे इनशुलेटर्स, शेलॅक किंवा लाखेपासून तयार करितात. हिंदुस्थानांतील सबंध लाख पाश्चात्य देश व जपानास कच्चा माल म्हणून विकली जाते, व त्यांतून उत्पन्न होणारा पक्का माल हिंदुस्थान येऊन आपला पैसा परदेशांत पाठविला जातो. यावर कांहीं आळा घातल्यास या जिनसांपासून उत्पन्न होणाऱ्या अनेक जिनसा विकून हिंदुस्थान परदेशांतील संपत्ति घरीं आणूं शकेल. ज्या स्निग्ध तेलांचा उपयोग वंगणासाठीं यंत्रांतून केला जातो तीं तेलें आपणांस बाहेरून मागवावीं लागतात. परंतु ज्या बियांपासून हें तेल उत्पन्न होतें त्या बिया म्हणजे कच्चा माल आपणच परदेशास विकत देतों. याच बियांतून उत्तम वंगण तेल आपणांस काढतां आल्यास बराचसा पैसा हिंदुस्थानांत बचत राहील, व नवीन कारखाने निघाल्यानें बेकारांचा प्रश्न सोडविण्यासहि महत्त्वाची मदत होईल.

आज हिंदुस्थानांत मोटरींचा प्रवाह परदेशांतून सारखा चालूं असून त्यापायीं कोट्यवधि रुपयांचा प्रवाह परदेशांत वाहत आहे. याकरितां हिंदुस्थानांत ऑटोमोबाइलचे औद्योगिक कारखाने निघाल्यास ही निर्गत थांबवितां येईल; व आज महाग पडणाऱ्या मोटरी हिंदुस्थानांत स्वस्त दरांत विकतां येतील. याप्रमाणें अनेक गोष्टींचा युद्धधोरणांशीं निकटचा संबंध येऊन पडतो, व त्याकरितां स्वदेशसंरक्षण, व्यापार, संरक्षणतत्त्व व औद्योगीकरण यांचा परस्परसंबंध असून त्यास लागणारा पैसा हिंदुस्थांत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत मिळवावा लागणार आहे. आज डेड कॅपिटल म्हणून पडून राहिलेली किंवा पुरून ठेवलेली संपत्ति हिंदुस्थानांत बरीच असून तिचा उपयोग राष्ट्रसंवर्धनार्थ करणें प्रत्येक देशहितचिंतकाचें कर्तव्य आहे. जीवनास अत्यन्त उपयोगी जिन्नस लोखंड असून त्याचा पुरवठा युनायटेड स्टेट्सच्या खालोखाल, किम्बहुना जवळपास बरोबरीचा असा हिंदुस्थानांत सांपडेल असें पुष्कळ भूस्तर शास्त्रवेत्त्यांचें म्हणणें असून त्या धातूचे अनेक पदार्थ मोठ्या प्रमाणांत उत्पादन करण्याचें कार्य टाटा आणि कंपनी हिंदुस्थानांत करीत आहे. आधुनिक युद्धकार्यांत लागणारीं सर्व लहान मोठीं आयुधें, वाहतुकीचीं साधनें यासाठीं लोखंडाचा उपयोग होतो, व आज तरी हिंदुस्थानांत मोटरी, टँक्स, ट्रॅक्टर्सच्या कारखान्यास लागणारे लहानमोठे जिन्नस, वॉटरपंपस्,

लिफ्ट्स वगैरे हजारों जिनसा परदेशांतून आणाव्या लागतात. किर्लोस्कर कंपनी-सारख्या कंपन्या कांहीं थोड्या लोखंडी जिनसा तयार करितात, परंतु त्यांनाहि फारसा व्याप वाढवितां येत नाहीं, याचें एक कारण त्यांस न मिळणारी सरकारी मदत हें होय. लेथ, कटर्स, प्लन्स, करवत, ड्रिल वगैरे मोठ्याल्या कारखान्यांतून कामासाठीं लागणाऱ्या सर्व जिनसा हिंदुस्थानांत करतां आल्या पाहिजेत. परदेशावर अवलंबून राहिल्यानें मराठेशाहींतील काळांत बंदुकीच्या बाबतीत नुकसान होई हें इतिहास सांगत आहे. परदेशांतून रेल्वे एंजिन्स, रूल, मेकॅनाइझ्ड वाहतुकीचीं साधनें व रणगाडे, ईरोप्लेन्स हे सर्व येथें आणले जातात. आजपर्यंत हे सर्व जिन्नस जहाजांतून येतात. हे जहाजीरस्ते समुद्रावरून, व पाश्चिमात्त्य देशांत तर ही यादवी! अशा स्थितींत सबंध युरोपांत महायुद्ध पेटून त्यास पुरेसे जिन्न-सच त्यांचे देशांतून निघत राहिले व अशा वेळीं हिंदुस्थानावर घोरपड आल्यास हिंदुस्थानास या सर्व जिनसांचा पुरवठा कोण करणार ? फिनलंड, पोलंड, डेन-मार्क या राष्ट्रांना पुरेसे सैनिक व लढाऊ जिनसा न मिळाल्यामुळें ते देश उध्वस्त होऊन शत्रूच्या भक्ष्यस्थानीं पडले ! हिंदुस्थानला लोकसंख्येचें बळ अमूप आहे, पण ते सर्व अशिक्षित. मग या सर्व अशिक्षित समाजाला संरक्षणाच्या हजारों बाबतींत शिक्षित करावयास नको काय ? त्यासाठीं इकडे सर्व शस्त्रसामग्रीचें उत्पादन करणारे कारखाने उभारावयास नकोत काय ? ते चालविण्यासाठीं मेकॅनिकल इंजिनीअर्स नकोत काय ? याप्रमाणें विचार केल्यास आज येथें रिकामे पडलेले हजारों कारखाने आहेत त्यांचा उपयोग लहान मोठ्या प्रमाणांत करतां येईल कीं नाहीं याचा विचार करावयास नको काय ? जिनिंग फॅक्टरीज् किती तरी बंद ठेवण्यांत आल्या असून त्या गंज खात रिकाम्या पडल्या आहेत. हिंदुस्थानांत जिन्नस नाहींत असें नसून त्यांची फुकट नासधूस होत आहे ती टाळणें अवश्य आहे, व यासाठींच नॅशनल प्लॅनिंगची जरूरी आहे. सध्याचें परकीय सरकार आपल्या स्वतःच्या मातृदेशाच्या हिताकरितां जिंकलेल्या देशांच्या नुकसानाकडे दुर्लक्षच करणार. स्वदेशी उद्योगधंद्यांस सरकारी उत्तेजन व संरक्षण यांची जोड पुरेपूर मिळावयास पाहिजे. टाटा स्टील कंपनीला १९२४-३४ पर्यंत सरकारी संरक्षण मिळालें नसतें तर कंपनीला फारच नुकसान आलें असतें. हिंदुस्थानांत या प्रकारचे कारखाने काढण्याची अत्यंत जरूरी आहे व या कारखान्यांतून उत्पन्न होणारा माल याच देशांत खपण्यासाठीं परदेशांतून येणाऱ्या मालास जकातीच्या

रूपानें प्रतिबंध करून स्वदेशांतील नूतन कारखान्यांची जोपासना करावयास पाहिजे. रशिया, झेकोस्लोव्हेकिया या दोन देशांनीं आपल्या देशांतील लोखंडाच्या कारखान्यांची गेल्या वीस वर्षांत केलेली वाढ पाहिली म्हणजे हिंदुस्थानला या गोष्टीकरितां कांहीं करतां येणें शक्य होणारच नाहीं असें नाहीं. आज रेलरोड सामान, कापसाच्या गिरण्या, सीमेंट, ताग व साखर यांचे कारखान्यांसाठीं लागणारें सर्व सामान परदेशांतून आणावें लागत आहे. जर्मनीनें आपल्या देशांत लोखंडाची नासधूस कायद्यानें थांबविली. हिंदुस्थानांत आज गंजलेले तसेच निकामी झालेले लोखंडाची होत असलेली नासधूस थांबवितां येईल. रस्त्यानें जातांना शेताच्या आसपास अशा कितीतरी तुटक्या लोखंडी जिनसा पडलेल्या सांपडतील. त्यांचा उपयोग करण्यासाठीं त्यांची जुळवाजुळव करणें राष्ट्रहितदृष्टीनें अवश्य नाहीं काय ?

हिंदुस्थानला लागणारीं रासायनिक द्रव्यें उत्पन्न करण्याचे कारखानेहि काढावयास पाहिजेत. सोडियम कार्बोनेट, व इतर जिनसा त्याचप्रमाणें आमोनियम सल्फेट परदेशांतून आपणांस जवळ जवळ ३ कोटी रुपये किंमतीचे आणावे लागतात व त्याचबरोबर परदेशी औषधांवर सुमारें २ कोटी रुपये परदेशीं पाठवावे लागतात. आज ॲलेंबिक केमिकल्स, बंगाल केमिकल, महाराष्ट्र केमिकल, सिप्ला लॅबोरेटरीज् वगैरे हिंदी कंपन्या औषधी रसायनें काढीत असल्या तरी परदेशावर अजून कितीतरी अवलंबून रहावें लागतें. जर्मनी, इटली, फ्रान्स देशांप्रमाणें क्लॉड, फॉसर व सिसेल पद्धतीनुसार ठरीव पद्धतीनें अमोनिया कॉंपाउन्ड तयार करतां येतील. म्हैसूरमध्यें इंपीरियल केमिकल्स लिमिटेड वगैरे कंपन्या ॲमोनियम सल्फेट वगैरे पदार्थ बऱ्याच मोठ्या प्रमाणांत काढीत आहेत. दारूगोळा वगैरे युद्धोपयोगी सामान तयार करण्यासाठीं ॲमोनिया, नायट्रिक ॲसिड वगैरे रासायनिक द्रव्यांची अवश्यकता अत्यंत आहे. याचप्रमाणें सल्फ्युरिक ॲसिडचीहि गोष्ट असून हे सर्व पदार्थ हिंदुस्थानांत उत्पन्न करतां आले पाहिजेत व यासाठीं स्वदेशांतील सर्व संपत्तीचा ओघ असल्या कारखान्यांकडे वळविणें अवश्य आहे. याशिवाय टिन, तांबें, ॲंटिमनी, अल्यूमीनिअम, निकल वगैरे धातूंचा संरक्षण कार्यांत अतिशय उपयोग असल्यानें या देशांत या पदार्थांचा पुरवठा होईल कीं नाहीं याचा शोध करावयास पाहिजे. याचप्रमाणें रबराचाहि उपयोग संरक्षणकार्यांत होत असल्यानें तो तयार करण्याचा उद्योग या देशांत करावयास हवा. म्हैसूर, त्रावणकोर या संस्थानांत रबर बऱ्याच

मोठ्या प्रमाणांत काढतात, व रबराचीं झाडें हिंदुस्थानांत उत्पन्न होतात, पण त्यांची लागवड अधिक व्हावयास पाहिजे. सैन्यांत चामड्याचा उपयोग फार आहे, परंतु हिंदुस्थानांतून ८ ते १० कोटी रुपयांच्या किंमतीची कमावलेली कातडी परदेशांत पाठविली जाते व त्यांचे बूट, खोगीर, मर्नी बॅग्ज, पट्टे वगैरे परदेशी माल सैन्यास पुरविला जातो. हा पक्का माल हिंदुस्थानांत तयार व्हावयास पाहिजे. आपल्या देशांतील स्वस्त मजुरी व कच्चा माल यांचे जोरावर बाटा कंपनीसारखी परदेशी कंपनी या देशांत मूळ धरते ती मुबलक परदेशी भांडवलाच्या जोरावर. पेट्रोलियम धंद्यांतील एक जिन्नस ( पॅराफिन ) मेण याचा उपयोग फार होतो. हिंदुस्थान व ब्रह्मदेश मिळून तीन कोट रुपये किंमतीचें मेण तयार होतें व तें सर्व इंग्लंड, बेल्जम्, पूर्व व दक्षिण आफ्रिका व नेदरलंड या देशांत पाठविलें जातें. याप्रमाणें या देशाच्या संरक्षणकार्यांत लागणारे जिन्नस कच्चा माल म्हणून या देशांत उत्पन्न होतात, परंतु त्यांचेपासून उत्पन्न होणारा पक्का माल याच देशांत तयार करून त्याचा उपयोग देशांतच केल्यास या देशांतील पैसा या देशांतच राहील. आतां यांत्रिक सुधारणा विरुद्ध हातकाम या विषयावर आपल्या देशांत रण माजलें असून आज सर्व भर हातकामावर देण्यांत येत आहे, व त्या वादाचा आजच्या प्रकृत विषयाशीं संबंध जोडणें प्रशस्त नाहीं. परंतु जगतांत चाललेल्या घडामोडींकडे लक्ष देऊन आपला देश संपन्न करण्यास्तव लहानमोठे उद्योगधंदे आपल्या देशांत उत्पन्न करणें अवश्य आहे. या विषयांत भलताच तात्त्विक हट्ट कामाचा नाहीं. या विषयावरील तज्ज्ञ लोकांच्या मतानुसारच या प्रश्नाची सोडवणूक करणें युक्त व व्यावहारिक होणार आहे.

प्रो. ए. एम्. लो आपल्या "मॉडर्न आर्मामेन्ट्स" या पुस्तकांत म्हणतोः— "A modern war is won at least as much in the factories as in the field. Quite apart from the production of weapons; it is in the factories that the money is obtained for continuing the fight." म्हणजे, "आधुनिक युद्ध प्रत्यक्ष रणक्षेत्राच्या बरोबरीचेंच कारखान्यांतहि जिंकतां येतें. युद्ध चालू ठेवण्यासाठीं अवश्यक शस्त्रोत्पादनाबरोबरच लागणारा पैसाहि कारखान्यांत उत्पन्न होतो." आज असा उद्योगधंदा नाहीं कीं ज्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें देशाच्या शस्त्रसुसज्ज सैन्याशीं या ना त्या प्रकारें संबंध येत नाहीं. आधुनिक युद्ध हा एक मोठ्या प्रमाणाचा धंदाच

होऊन बसला असून रणक्षेत्रावर प्रत्यक्ष लढणाऱ्या एका योद्ध्यामागें चार लष्करी मजूर लागतात. फौजी खात्यांत आज प्रत्यक्ष शिक्षण घेणाऱ्या उमेद्वारांकडे पाहिल्यास लष्करी विद्यार्थ्यांस आर्मर्स्, आर्टिफिसर, लोहार, इलेक्ट्रिशन, फिटर, इन्स्ट्रुमेंट, मेकॅनिक मेसन, पेंटर, डेकोरेटर, सर्व्हेयर, टिनगर, टर्नर, व्हीलर वगैरे धंद्यांचें लष्करी शिक्षण घेतां येतें, म्हणजे इतक्या धंद्यांची लष्करी खात्यास जरूरी लागते. यांत प्रत्यक्ष योध्याचें नांवच नाहीं, हें झालें खुष्की सैन्याबाबत. वैमानिक दल व आरमार या विभागांत यांत्रिक व रासायनिक शास्त्रज्ञान फारच पुढें गेलें असल्यानें त्याचें शिक्षण घेण्यास हजारों विद्यार्थी पाहिजेत. एका पायलटला पुरेसें सामान तयार करण्यासाठीं तीस विद्यार्थी इतर कारखान्यांतून कामें करीत असतात.

युद्ध म्हटलें कीं, त्यांत मारक शक्तीचा विचार येतो. आपलीं माणसें वांचवावयाचीं, शत्रूचीं मारावयाचीं व त्यांवर जय मिळवावयाचा व आपल्या मर्जीप्रमाणें शत्रूस वागावयास भाग पाडावयाचें हा युद्धाचा हेतु. मग युद्धास लागणारी मारक शक्ति कशांत ज्यास्त सांपडते हा विचाराचा मुख्य मुद्दा असतो. पूर्वीच्या काळीं भव्य शरीर व प्रचण्ड शक्ति व समोरासमोर युद्ध असें असल्यामुळें विशाल देह, शक्तिमत्ता व चापल्य यांपुढें दुबळ्या माणसास हार खावी लागे. पण शरीराचा कमकुवतपणा नाहींसा करण्यास शास्त्रीय शोधांचा व अकलेचा उपयोग होऊं लागतांच मोठें शरीर व सशक्तपणा यांचा तितकासा उपयोग राहिला नाहीं. आतां अकलेला प्राधान्य आलेलें आहे. तरवारींची जागा दारूगोळ्यांनीं घेतली, व त्यावर ४०० वर्षें माणसांनीं भागविलें. त्यानंतर माणसानें आपल्या सुपीक मेंदूतून आधुनिक नवे नवे शोध काढले. आज शस्त्रास्त्र-शोधांत पुढे आलेल्या ब्रेनगन्स व मशिनगन्समुळें एका माणसास हजारों बंदुकींचें काम एकट्यास करतां येऊं लागलें. युद्धांत स्फोटक द्रव्यांचा म्हणजे बारुदीचा उपयोग होऊं लागतांच बंदुकीची दारू ज्या जिनसापासून तयार करतां येते त्या जिनसांचें महत्त्व वाढलें व हे जिन्नस आपल्या देशांत तयार होणाऱ्या कच्च्या मालाचा पुरवठा व त्याप्रीत्यर्थ लागणारे कारखाने वाढूं लागले. याप्रमाणें पाश्चिमात्य देशांतील औद्योगिक उन्नतीचा व शास्त्रीय शोधांचा इतिहास आहे. आज जगतांतील मोठालीं बलाढ्य राष्ट्रें इंग्लंड, फ्रान्स, रशिया, अमेरिका, जर्मनी, इटली, जपान वगैरे पहिल्या व दुसऱ्या दर्ज्याच्या राष्ट्रांच्या प्रगतीकडे लक्ष दिल्यास त्यांत युद्धोपयोगी पदार्थ व तत्संबंधीं कारखाने व रासायनिक द्रव्यांची

उत्पत्ति या गोष्टींस फार मोठें महत्त्व आहे. जगतांत चाललेल्या घडामोडी व ज्ञानप्रसार यांचा विचार न केला तर हिंदुस्थानची गति एथिओपिया सारखी झाल्याशिवाय राहणार नाहीं. जगांत "सर्व्हायव्हल ऑफ दि फिटेस्ट" म्हणजे परिस्थितीला धैर्यानें तोंड देऊन पुरून उरणारा व तिजवर मात करणारा माणुसच जगण्यास योग्य असतो व केव्हांहि स्वतंत्रता भोगणारा माणूस परतंत्रतेंत राहणाऱ्या माणसाहून अधिक योग्य ठरतो. हिंदुस्थान गेलीं १५० वर्षें तरी परावलंबी राहिल्यानें त्यास स्वसंरक्षण करतां आलें नाहीं, व यापुढें स्वराज्याकडे धांव घेणाऱ्या हिंदुस्थानास स्वावलंबी बनल्याशिवाय गति नाहीं. स्वावलंबनासाठीं स्वतःच्या देशमर्यादांचें रक्षण करण्याचें सामर्थ्य त्याचे अंगीं पाहिजे, व त्यासाठीं जगतांत आज प्रचलित असलेल्या मारक शोधांना आत्मसात् करून जगांत जगतां आलें पाहिजे. आज ह्या बाबतींत इंग्लंडच्या सहाय्यानें आपण जगत आहों ही गोष्ट खरी असली तरी या जगतांत चाललेल्या घडामोडींत उद्यां स्थिति काय पालटेल याचा कांहीं नेम नाहीं. याकरितां हिंदुस्थानवासीयांनीं सर्व बाजूंनीं विचार करून आपल्या प्रगतीचें पाऊल टाकणें व तिची दिशा ठरविणें अवश्य आहे.

आधुनिक शास्त्रांत झालेल्या सुधारणांकडे लक्ष दिल्यास आज जग कोठें आहे हा विचार करावयास पाहिजे. अनेक युद्धशास्त्रतज्ज्ञांच्या मतें कोणत्याहि एकाच लढाऊ विभागावर विसंबून न चालतां युद्धांत जय मिळवावयाचा तर विमान, नौका व खुष्की सैन्य या सर्वांची जोड असावयास पाहिजे. या दृष्टीनें पाहतां गेल्या (१९१४–१८) महायुद्धांतील अनुभवावर लिडेलहार्टनें कांहीं धोरणें बसविलीं असून त्याच्याशीं ईमॅन्सबर्गर, स्टीफन पोसॉनी वगैरे लष्करी तज्ज्ञांचें सहमत आहे. डुहे या इटॅलियन तज्ज्ञाचे मताशीं सर्वांचें जुळत नसून वैमानिक दलावरच केवळ भिस्त ठेवून चालणार नाहीं. राष्ट्रास लागणारीं शस्त्रास्त्रें किती व कशीं पाहिजेत यासंबंधीं पोसॉनीनें आपल्या "टुमॉरोज् वॉर" या पुस्तकांत दिलेले आंकडे पाहिले म्हणजे क्षणभर संरक्षणाबाबत हिंदुस्थानची केवढी दैन्यावस्था होणार हें पाहून मन स्तंभित होतें. एक हजार किलोमीटरची आघाडी म्हणजे जवळ जवळ ७०० मैल लांबीचा प्रदेश. यावर एक वर्ष युद्ध चालल्यास वेगळाली शस्त्रसाधनसंख्या किती लागेल याबद्दल लिडेलहार्टनें केलेलें अनुमान दिलें आहे, त्यांत दोन प्रकारच्या युद्धांचा विचार केला आहे. (१) जमिनीवर संरक्षक व हवेवर आक्रमक यास नंबर एक पद्धति व (२)

जमिनीवर आक्रमक व त्यास वैमानिक व इतर विभागांची भरपूर जोड यास नंबर दोन पद्धति. यांत नाविक दलाचा विचार केलाच नाहीं. तटबंदीसाठीं लागणारें लोखंड व पोलाद यांचा अंदाज पुढीलप्रमाणें आहेः—

( १ ) पोलाद व लोखंड ( शत्रुसैन्यास अडचणी उभ्या करणें, रेल्स व कांटेरी तारांचीं कुंपणें ) यास ८० ते ९० लक्ष टन.

( २ ) सिमेंट ८० लक्ष टन.

युद्धांत लागणारीं साधनें म्हणजे मशिनगन्स, तोफा, ॲन्टी टँक गन्स, ॲन्टी एअर क्रॅफ्ट गन्स, आर्मर्ड कार्स वगैरे यंत्रें होत. यांची होणारी नासधूस भरून काढावी लागते. त्या सगळ्याचा अंदाज घेऊन पोसॉनीचे आंकडे पुढील कोष्टकांत दिले आहेत.

| नांव | संख्या | | वार्षिक संख्या | |
|---|---|---|---|---|
| | संरक्षक | आक्रमक | संरक्षक | आक्रमक |
| | नंबर १ | | नंबर २ | |
| १ मशिनगन्स | ८०००० | १००००० | १६०००० | २००००० |
| २ गन्स | १५००० | २२५००० | ३०००० | ४५००० |
| ३ अँटी टँक गन्स | ८००० | १६००० | १५००० | ३०००० |
| ४ अँटी एअरक्रॅप्ट गन्स | २५००० | २५००० | ३८००० | ५०००० |
| ५ ट्रेंच मॉर्टर्स | १२००० | ६०००० | २५००० | १२०००० |
| ६ आर्मर्ड कार्स | १२५०० | ४०००० | २५००० | १२०००० |
| ७ आर्मर्ड कार्स वाहतुकीसाठीं | १०००० | — | — | ३०००० |
| ८ टेहळणी व संरक्षक विमानें Reconnaissance and defence aeroplanes | ४००० | ८००० | ८००० | १६००० |
| ९ आर्टिलरी ऑबझर्वेशन ईरोप्लेन्स | ४००० | १०००० | १२००० | ३०००० |
| १० बॉंबर्स | ५००० | २२००० | १५००० | ६५००० |
| ११ फाइटर्स | २५०० | १३००० | ७५०० | ३९००० |
| १२ सर्चलाइट व ऐकण्याचीं साधनें | १००००० | १००००० | १२०००० | १५०००० |

वरील आंकड्यांकडे नजर दिल्यास आजचे युद्धांतील साहित्यसामग्रीची पुसट कल्पना करतां येते. या सर्व गोष्टींचा पुरवठा करण्यासाठीं हिंदी सैन्याला हिंदुस्थानांतच मोठमोठे कारखाने काढावे लागणार आहेत. हे कारखाने काढले असतां आज प्रथम कांहीं दिवस अडाणी कामकरीच मिळतील, पण हेच लोक अभ्यासानें व अनुभवानें तयार होतील व उद्यांचे तज्ज्ञ बनतील. आज हजारों विद्यार्थी जे संधीच्या अभावीं इतस्ततः उपाशी मरून राष्ट्रास निरुपयोगी ठरताहेत त्यांचा उपयोग होऊन त्यांची वैयक्तिक उपासमारहि थांबेल, व आज त्यांचे जीवनांतील दिसणारा निरुत्साह पार वितळून त्यांस उमेद येईल व त्यांचें जीवन सुखकर होऊन हिंदी देशभक्तांची होणारी झीज वांचून राष्ट्रबल वाढेल. आधुनिक युद्धांत साधारणतः मनुष्यसंख्याबलाचाहि विचार केला आहे. त्याचें प्रमाण पोसॉनीच्या मतें पुढीलप्रमाणें दिसतें. आजार, मरण किंवा अपघात अगर दुखापतीनें होणाऱ्या नुकसानीचा मुळींच विचार न करितां साधारणतः एकदम वेळप्रसंग पडल्यास वेगळाल्या विभागांतून लष्करांत माणसें कोणत्या प्रमाणांत असावींत हें पुढें दिलें आहे. प्रत्येक विभागास कशीं माणसें असावींत याचा विचार करितां प्रत्येक यंत्रामागें किती माणसें याचें प्रमाणः— बॅटरींत एका गनमागें २५ माणसें; ॲन्टी एअर क्रॅफ्टगनला २०; ॲन्टी-टँकगनला १०; ट्रेंच मॉर्टरला ८; मशिनगनला ७; लिसनिंग डिव्हाइस व सर्चलाइटला ५; बॉंबरला ४; रिकनॉयसन्स, आर्टिलरी ईरोप्लेन व लार्ज फायटरला २; स्मॉल फायटर १— या प्रमाणांत प्रत्येकामागें माणसें पाहिजेत. वैमानिक दलांत प्रत्यक्ष उड्डाणांत भाग घेणाऱ्यांची संख्या इतर वैमानिक संख्येंत शें. १० असावी लागते. रणगाडे— या बाबतींत फ्रेंच लोकांचें अनुमान मान्य धरण्यांत आलें तें:—लाइट टँकला ५·५ माणसें; हेव्ही टँक ३५; मीडियम टँक १५. यांचें गणित केल्यास दोन्ही पद्धतीच्या युद्धांत साधारणतः शिपायांची संख्या पुढीलप्रमाणें असावी लागेलः—

| | नं. १ पद्धतीचें युद्ध | नं. २ पद्धतीचें युद्ध |
|---|---|---|
| माणसें ....... | ३०,००,००० | ६०,००,००० |
| पैकीं डिव्हिजनमध्यें संघटित न केलेले | १४,००,००० | २०,००,००० |
| | १६,००,००० | ४०,००,००० |

याप्रमाणें १६ ते ४० लक्ष माणसें एकूण सैन्यांत लढाऊ म्हणून असावयास पाहिजेत, व यांस मदतनीस म्हणून वैमानिक दलाचा विचार करतां त्यांत पहिल्या पद्धतींत २५ लक्ष व दुसऱ्या पद्धतींत ५० लक्ष असावयास पाहिजेत. म्हणजे एकूण पहिल्या व दुसऱ्या प्रकारच्या युद्धांत मिळून पुढील संख्या पाहिजे.

| | प्रथम पद्धति | द्वितीय पद्धति |
|---|---|---|
| खुष्की फौज— | ३०,००,००० | ६०,००,००० |
| वैमानिक दल— | २५,००,००० | ५,००,००० |
| | ५५,००,००० | ६५,००,००० |

( स्टीफन पोसॉनी, " टुमॉरोज् वॉर " पान ९१ )

याबरोबरच या माणसांस लागणारीं साधनें व तीं निर्माण करणारीं माणसें व कच्चा माल यांचाहि विचार करून यासंबंधीहि आंकडे त्यानें दिले आहेत. हें सर्व पाहिलें कीं घटकाभर मनुष्य भ्रमांतच पडतो, परंतु हे आंकडे एकट्या पोसॉनींचेच नव्हत तर कमी अधिक प्रमाणांत लिडेलहार्ट, जनरल हर्, जनरल डेबेनी, झीमरमन, डेव्हिस वगैरे इंग्रज, जर्मन, फ्रेंच, अमेरिकन वगैरे सर्व राष्ट्रांच्या युद्धज्ञांनीं आपापल्या राष्ट्राच्या संरक्षणार्थ म्हणून याप्रकारें हिशेब करून काढून ठेविले आहेत. या गोष्टींकडे पाहून या सर्वांपुढें हिंदुस्थाननें काय करावें हा प्रश्न साहजिकच पुढें उभा राहतो व कांहीं वेळ तरी मन विषण्ण झाल्याशिवाय राहत नाहीं. या पद्धतीनें आंखलेल्या धोरणानें युद्ध करणें शक्य नाहीं, कारण प्रत्येक युद्धांत लागणारा कच्चा माल सर्व राष्ट्रांस एकाच प्रमाणांत वांटलेला नसून कांहीं जिनसा कोठें, तर कांहीं कोठें, याप्रमाणें **जगतावर वेगळाल्या गोष्टी वेगळाल्या राष्ट्रांत उत्पन्न होत असल्यामुळें राष्ट्राराष्ट्रास एकमेकांच्या सहाय्याशिवाय युद्धें जिंकतां येणार नाहींत,** व मग साहजिकच ज्या बाजूकडे जिनसांचा पुरवठा अधिक त्या बाजूकडे अखेर जय ठरलेला व याचा अर्थ हाच कीं ज्या राष्ट्राकडे सांठा अधिकीचा त्याचा जय होणार. आर्थिक धोरण संभाळणाऱ्या राष्ट्रास विजयश्री अखेरची माळ घालते हें निश्चित. याप्रमाणें माणसें, कच्चा माल व कारखान्यांत कार्यकुशल मजूर यांचा भरपूर पुरवठा पाहिजे. आज हिंदुस्थानांत कच्चा माल व माणसें यांचा भरपूर पुरवठा आहे, पण कार्यकुशल मजुरांची संख्या फार कमी सांपडेल, व यासाठीं कारखाने काढून त्यांतून कुशल

कारागीर तयार करण्याची सोय व्हावयास पाहिजे, म्हणजे सबंध हिंदी राष्ट्रांतील अपक्व व पक्व माणसें एकाच मार्गांत आणणें अवश्य आहे. आज युद्धाचा रंग पालटला असून रणक्षेत्र, देश व वाहतुकीचे मार्ग या सर्वांची एकवाक्यता होणें अवश्य आहे. आधुनिक युद्धांत नुसतें आघाडीवर सैन्य पाठवून चालत नाहीं, त्या सैन्याचा सर्व प्रकारें पाठपुरावा करावयास पाहिजे. ज्यास Total war सर्वसंग्राही युद्ध म्हणतात त्यांत राष्ट्रांतील प्रत्येक लहानथोर, वयांत आलेले व अल्पवयस्क, धडधाकड व दुबळेपतले अशा सर्वांना युद्धांत आपापल्या कुवती-प्रमाणें भाग घ्यावा लागतो.

युद्धांत या प्रकारें लागणाऱ्या सर्व जिनसा व कारखाने यांचा युद्ध संपल्यावर उपयोग काय, व मग या सर्वांचें काय करावें हा प्रश्न साहजिकच मनांत येतो. परंतु इतर देशांत काय होतें याचा विचार करावयास पाहिजे. शत्रूच्या युक्त्यां-मुळें आपल्याकडील माणसें फार मरूं लागलीं कीं त्यांचें रक्षण करण्याच्या युक्त्या किंवा शोध निघूं शकतात. याप्रमाणें १९१४ मध्यें विमानांचें उड्डाण, वाहतुक, वजन वगैरे गोष्टींचा फारसा शोध नव्हता परंतु युद्ध निकराचें होऊन पटापट माणसें मरूं लागतांच विमानाचे बाबतींत फार मोठे शोध झाले. त्याचप्रमाणें रणगाड्यांचा शोध बाहेर निघाला व या बाबतींत त्यावेळीं कारखाने पुढें आले. युद्ध थांबतांच हातांतील तलवारीचा उपयोग नांगराकडे करतात असें म्हणतात. त्याचप्रमाणें युद्धकालांत झालेल्या सर्व कारखान्यांचा उपयोग युद्ध थांबतांच कमी झाला व मग त्यांचा उपयोग कसा करावा हा प्रश्न पुढें आला व मग वैमानिक दलांतील लढाऊ विमानांचा उपयोग देशपर्यटन व टपाल पोंचविण्याकडे होऊन आज हयात असणारे वैमानिक मार्गांचा प्रसार सुरू झाला, व विमानांचा नाश न व्हावा व वैमानिक मार्गांचें संरक्षण व त्यांत उत्पन्न होणाऱ्या अडचणी दूर कर-ण्यास लागणारे शोध म्हणजे वायरलेस्—बिनतारी विद्युत्संदेश पद्धति सुरू झाली, व त्यासाठीं लागणाऱ्या जिनसा तयार करण्याकडे या कारखान्यांचा उपयोग होऊं लागला. १९१४ मध्यें बिनतारी टेलिफोनची पद्धति बाल्यावस्थेंत असली तरी तिच्यांत झालेल्या सुधारणांमुळें आज हवेंतील विमानें व समुद्रावरील जहाजें या मधील माणसांस परस्परांस पाहिजेत ते संदेश पाठवितां येऊं लागले व त्यांचा उपयोग शांतताकाळांत वैमानिक टपाल हवेंतील मार्ग आक्रमित असतां तिला येणाऱ्या अडचणी अगर संकटांची माहिती जमिनीवरील वैमानिक

स्थळांस देतां येते. यामुळें वैमानिक संकटें दूर करतां येतात. याकरितां विमानांची दिशा कळण्याचीं स्टेशनें जागजागीं बांधण्यांत आलीं व त्यांचा उपयोग शांतता-काळांतील व्यापारी व वाहतुकीच्या विमानांच्या मार्गांचा माग ठेवण्याकडे करतां येऊं लागला. याचप्रमाणें रणगाडे या लढाऊ साधनांचाहि उपयोग शांतता काळांत, त्यांतील कॅटरपिलर ट्रॅक्शन पद्धतीमुळें, अत्यंत खडबडीत जमिनीवरील वाहतुकींत करतां येऊं लागला, व या रणगाड्यांच्या कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या जिनसांचा उपयोग शांतता काळांत लागणाऱ्या व्यापारीवाहतुकींत करतां येऊं लागला. या कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा खपहि युद्धकाळाप्रमाणेंच शांतताकाळींहि चांगला झाला व यामुळें युद्धकाळांत व युद्धोपयोगासाठीं उभारलेल्या कारखान्यांमुळें राष्ट्राचें नुकसान न होतां फायदाच झाला. युद्धामुळें पुढें आलेल्या रासायनिक उद्योगधंद्यांसहि पुढें शांतताकाळीं चांगलीच बढती लाभली. रासायनिक कार-खान्यांत स्फोटक द्रव्यांचाच फक्त शोध न होतां अनेक उत्तमोत्तम उपयोगी द्रव्यां-चाहि शोध लागला व त्यामुळें इंग्लंडला पूर्वीं अनेक रासायनिक जिनसांसाठीं जर्मनी-वर अवलंबून रहावें लागे तें जाऊन त्या राष्ट्रांतील कारखान्यांतच देशांत लागणाऱ्या अनेक रासायनिक जिनसा तयार करतां येऊं लागल्या. या सर्व गोष्टींवरून एकच गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, आजच्या परिस्थितींत आघाडी-वरील सैन्य त्यास सामुग्री पुरविण्याचीं वाहतुकीचीं साधनें, व हीं उत्पन्न करणारे कारखाने यांचें परस्परांत सहकार्य मोठ्या प्रमाणांत ठेवणें अवश्य असतें. शांतता काळांत चालूं असणारे सर्व कारखान्यांचें रूपान्तर युद्धकाळांत युद्धसामग्रीच्या निर्मितीस्थळांत सहजासहजीं करतां येतें, व युद्ध संपतांच पुनश्च त्यांची ठेवण थोडीशी बदलून त्यांतून शांतताकाळीं लागणाऱ्या जिनसा तयार करतां येतात. युद्धकाळीं शत्रूचीं कांटेरी कुंपणें, तटबंदी किंवा वाह-तुकीचे रस्ते वगैरे उध्वस्त करण्यासाठीं उपयोगी पडणाऱ्या स्फोटक बॉम्बसनीं जसा नाश करतां येतो तसा त्यांचा उपयोग रेल्वेसाठीं पर्वतांतून बोगदे खोदून वाहतुकीचे मार्ग तयार करण्याकडेहि करतां येतो. मग सर्व गोष्टींची युक्ता-युक्तता माणसाच्या इच्छेवरच अवलंबून नसते का ? कोळशाच्या खाणींतून चांगला कोळसा बाहेर काढण्यासाठीं या स्फोटक द्रव्यांचा उपयोग केला तर कोळसा बाहेर येऊन त्याचा उपयोग होणार नाहीं कां ? रोमन बादशहास मौंट सालदियानोमध्यें तयार केलेला बोगदा खोदतांना दर महिन्यांत ५ फूट खडक

खोदण्याकरितां ३०,००० गुलाम लागत असत ! पण आधुनिक काळांत सॅन-फ्रॅन्सिस्कोमध्यें खोदलेला बोगदा तयार करतांना स्फोटक द्रव्यांमुळें दर महिन्यास ५ फुटांचे ठिकाणीं ७५० खोल फूट खोदणें सुलभ झालें. ही यांत्रिक प्रगति काय कमी महत्त्वाची आहे ? याप्रमाणें समुद्रांतून जाणाऱ्या गलबतांना लागून नाश करणारे बर्फाचे डोंगर (Ice-bergs) फोडून त्यांपासून गलबतांचा बचाव करण्याचे कामीं वरील स्फोटक द्रव्यांचा उपयोग शांतता काळांत करतां येतो, व शिवाय पाणी किंवा ज्वालामुखी पर्वतांमधून बाहेर पडणाऱ्या अग्निरसाचे प्रचंड वाहत्या प्रवाहास धक्का देऊन त्यास कलाटणी देण्याचे कामीं वरील स्फोटक द्रव्यांचा उपयोग आज करूं लागले असून त्यामुळें मानवी जीवित अधिक सुरक्षित करण्याचे कामीं या स्फोटक द्रव्यांचा उपयोग होतो. याचप्रमाणें जीवसंहारक विषारी वायू (Poisonous gases) चा युद्धकार्यांत उपयोग करण्यांत आल्यानें या वायूंची भीति वाटूं लागली, पण त्यांचाहि शांतता काळांत चांगल्या कामीं व जीवित सुरक्षित करण्याकडेच उपयोग करण्यांत येऊं लागला. यांपैकीं हैड्रोसियानिक गॅस आहे. जहाजांत उंदीर, घुशी व इतर वस्तु-नाशक प्राण्यांचा उपद्रव कमी करण्यासाठीं बोटींतून हैड्रोसियानिक गॅस सोडण्याचा प्रघात असे, परंतु या वायूला रंग व गंध नसून याचा शिरकाव मानवी फुप्फुसांत श्वासावाटें होतांच प्राणास अपाय होई व त्यामुळें माणसांची प्राणहानि करणाऱ्या या वायूचा उपयोग करतांना भीति वाटे. परंतु शास्त्रज्ञांनीं नवीन शोध करून या हैड्रोसियानिक गॅसबरोबर सायनोजेन क्लोराइड किंवा अश्रुजनक इतर गॅसेस यांचें मिश्रण करून त्यांचा उपयोग करावयाचा प्रघात पाडल्यानें व या नविन वायूंना वास असल्यामुळें त्यांचा वास येतांच ती जागा सोडून गलबतावर दुसरीकडे गेल्यानें जीवित–नाश टाळतां येतो हा शोध लागला. याशिवाय क्लोरार्सेनिक गॅससारख्या मारक वायूंचा उपयोग वनस्पति किंवा प्राणिनाशक जिनसांचा नाश करण्यांत होऊं लागला आहे. कांटेरी किंवा फड्या निवडुंग (Cactus) कापणें जड जातें व त्याचा नाश न झाल्यानें त्याचीं वनेंच्या वनें वाढून त्रास होतो. त्यांचा नाश करण्याचे कामीं वरील वायु या वनस्पतीच्या आंत टोंचण्यानें हीं झाडें मरतात व पुनः त्यांची वाढ होत नाहीं. याशिवाय पाण्यांत औषधी गुण उत्पन्न करण्यासाठीं व दलदलींत वाढणारीं मच्छरांचीं पिलें मारण्याचे कामींहि वरील वायूचा उपयोग होऊं लागल्यानें

मानवी जीवनाची सुरक्षितता वाढवितां येऊं लागली आहे. धामधुमीच्या प्रसंगीं थोड्याशा पोलिसांना किंवा सैनिकांना शांतता-रक्षणार्थ गोळीबार करावा लागतो तो टाळण्यासाठीं हल्लीं अश्रुजनक वायू (Tear gas) चा उपयोग करण्यांत येऊं लागला आहे. यामुळें किंचित् काल डोळ्यास अंधेरी येते व माणसास शिंका येऊं लागतात. पण मानवी जीवितास दुसरी हानि न होतां दंगेखोरांस सहजासहजीं वाटेवर आणतां येतें. हा शास्त्रीय शोधांचा फायदाच नव्हे काय ?

याचप्रमाणें अनेक युद्धकालीन जीवनाशक गोष्टींच्या शोधांचा उपयोग शांतता कालांत शरीरसुखाचे व आरोग्यरक्षणाचे कामीं करण्यांत येऊं लागला आहे. यावरून कारखाने काढल्यानें नुकसान होईल असें विधान करणें बरोबर होणार नाहीं. या कामीं योग्य वळण देणें हेंच कार्य करावयास पाहिजे, म्हणजे प्रत्येक गोष्टीचा सदुपयोग होऊं शकतो.

या सर्व गोष्टींचा विचार केला असतां इतर देशांच्या मानानें आज हिंदुस्थानची काय स्थिति आहे याचा विचार करावयास हवा. इतर देशांत नांदणारी व सतत वाढणारी संरक्षक साधनांची वाढ हिंदुस्थानांतहि व्हावयास हवी. त्यासाठीं लागणारा पैसा सधन लोकांनीं जमवून त्यांतून कारखाने काढावयास हवेत. याकरितां तज्ज्ञ लोक निर्माण करणें जरूर आहे व त्याकरितां शिक्षणाच्या संस्था उघडल्या पाहिजेत. लहान धाग्याचा कापूस उत्पन्न होतो त्याचा उपयोग करण्यासाठीं जपाननें आपले विद्यार्थी परदेशांत पाठवून शिकवून तयार करून त्यांचे करवीं आपल्या देशांतील कारखान्यांत नवीन यंत्रसामग्री तयार करवून त्यांचा उपयोग आपल्या देशांत केला. हिंदुस्थानचा विद्यार्थी यांत्रिक कलेंत निपुण झाल्यावर परदेशांतील माल बोलावून त्यावर आपले कारखाने उभारतो व एक प्रकारें परदेशांतील मालाच्या विक्रीचा तो हिंदी अडत्या बनतो. त्याचप्रमाणें देशी गिरण्यांतून उत्पन्न होणाऱ्या मालाच्या विक्रीनें गबर होणारे सधन मालक या पैशाचा उपयोग परदेशी चैनीच्या जिनसा विकत घेण्याकडे करितात. तसें न होतां या सर्व पैशाचा उपयोग हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीकडे त्यांनीं करावयास पाहिजे. पण यासाठीं आधीं स्वदेशप्रेमहि त्यांचे अंगीं बाणावयास हवें, व मगच या गोष्टी आपल्या देशांत घडूं लागतील.

अचिन्त्य योगायोगानें या गोष्टी हिंदुस्थानांत लौकरच होतील असें माना-वयास जागा म्हणजे हा ग्रंथ लिहीत असतां १९४० च्या मेअखेर हिंदुस्थानचे कमँडर-इन-चीफ सर रॉबर्ट कॅसेल यांनीं जाहीर केलेली घोषणा होय. युद्धोपयोगी सामान सरकार स्वतःच हिंदुस्थानांत तयार करणार आहे व हे कारखाने इतःपर वाढीस लागतील व हिंदुस्थानच्या युद्धविषयक गरजा हिंदुस्थान स्वतःच भागवील असा समय येऊन ठेपला आहे.



# भाग ८

# राष्ट्रीय फौज

" The Government had decided at once to introduce a Bill entitled 'Reserve and Auxiliary Forces Bill' which would simplify the procedure and enable the Government by an Order in Council to authorise the various service Departments to call up any class or description of Reserve and Auxiliary Forces. The Bill will be temporary in character......Every country in Europe had the powers which Government sought under the Bill. "

N. Chamberlain, 26 Apr. 1939.

आपण निद्रावश झालों असतां आपल्या घरांत गुप्तपणें शिरून आपल्या मूल्यवान जिनसा, दागदागिने, पैसाअडका चोरांनीं लुबाडूं नये म्हणून जागरूकतेसाठीं आपण एखादा कुत्रा बाळगतों, किंवा वेळेवर चोरावर हल्ला करण्यासाठीं एखाद दुसरा माणूस चाकरीस ठेवितों त्याचप्रमाणें आपल्या राष्ट्रावर आक्रमण करून आपणांस लुबाडूं पाहणाऱ्या आक्रमक राष्ट्रांनीं एकदम अथवा गुप्तपणें आपल्यावर आक्रमण करूं नये म्हणून प्रत्येक राष्ट्रास थोडी बहुत सेना ठेवणें भाग पडतें व या सेनेच्या कमी अधिक बळावर तें राष्ट्र आपलें स्वतंत्र अस्तित्व टिकवूं शकतें. " युद्ध हवेंच कशाला ? " किंवा " युद्ध हें अवश्यकच आहे " वगैरे तात्त्विक प्रतिपादन करणें हा या ग्रंथाचा विषय नव्हे, पण ही गोष्ट खरी आहे कीं आहे त्या परिस्थितीमध्यें आपलें अस्तित्व टिकविण्यास प्रत्येक राष्ट्रास सेना बाळगणें अवश्यक असतें, व आजवर कोणतेंहि राष्ट्र कोणत्याहि काळांत राष्ट्रीय फौजेशिवाय जगाच्या पृष्ठभागावर टिकाव धरूं शकलें नाहीं. माणूस हा प्राणी विचारशील आहे व सदसद्विवेकाच्या योगानेंच जगतांतील युद्धें नाहींशी करून शांततेनें जीवन कंठण्याचा मार्ग मार्गेपुढें उपलब्ध होईल असा विश्वास इंग्लंडांतील आजचा नामांकित ग्रंथकार व प्रोफेसर सी. ई. एम्. जोड यानें आपल्या " Why war ? " या पुस्तकांत ग्रथित केला आहे. याच सिद्धा-

न्तास पुष्टि देणारे अनेक तत्त्वज्ञ आज हयात असून म. गांधी यांची गणना या शांततावाद्यांत प्रमुखत्वानें, नव्हे अग्रेसरत्वानें होत आहे. आज हिंदुस्थानच्या पुढें तोंड वासून उभा राहिलेला प्रश्न म्हणजे जगायचें कीं मरायचें ! हा असल्या-मुळें जगतांत जगण्यासाठीं आपण कोणती धडपड करावयास पाहिजे एवढ्या लहानशा, पण जीवनास अत्यंत निकडीच्या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. माणसामध्यें दैवीगुणांबरोबरच आसुरी गुणांचें प्रत्यहीं तुमुल युद्ध चालूं असतें, व अनेकदां आसुरी गुणांचा जय झालेला दिसतो, अशा रीतीनें जगतांत कलहाचे प्रसंग सारखे सुरू असतात असल्या प्रसंगांत राष्ट्र सांपडलें म्हणजे मग तत्त्वांचा काथ्याकूट उपयोगी पडत नाहीं. आक्रमकास तोंड देऊन आपलें अस्तित्व टिकवावयाचें, बचावाचीं साधनें कोणती असावीं, त्यांचा उपयोग कसा करावा, नागरिकाचीं राष्ट्रसंबंधीं कर्तव्यें कोणतीं, व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे काय, त्याच्या मर्यादा कोणत्या, राष्ट्रस्वातंत्र्य म्हणजे काय, राष्ट्रीय जीवनाचा जगाशीं व मानवी जीवनाशीं संबंध कोणता आहे–इत्यादि गोष्टींचा आपण विचार करून ठेवलेला नसेल तर आक्रमकापुढें आपणांस मान खालीं घालून त्याचें जूं आपल्या मानेवर घेणें भाग पडेल यांत संशय नाहीं. राष्ट्र एकदां जिंकलें गेलें कीं त्याचें सत्त्व नाहींसें होऊन मग फक्त तात्त्विक चर्चा कायम राहते. आक्रमक नेत्यांचें वर्तन रास्त कीं नीतिबाह्य, रानटीपणाचें कीं सुधा-रणेस अनुसरून, दैवी कीं आसुरी वगैरे गोष्टींची चर्चा जरी पुढें फार काळ व अनेक देशांतून होत राहिली तरी त्या राष्ट्रानें स्वतंत्रता गमाविली हें सत्य मात्र कोणासहि पुसून टाकतां येत नाहीं. आज आपणांस सुधारलेले म्हणून समज-तात, व इतर सर्व धर्मापेक्षां ख्रिस्तीधर्मच खरा व ईश्वरप्रणीत म्हणून त्याचे पोवाडे गातात तीं ख्रिस्ती राष्ट्रें आपसांत देखील एकमेकांवर आक्रमण करून केवळ स्वार्थापायीं एकमेकांचा बींमोड करण्यास प्रवृत्त झालेलीं दिसत आहेत ! हिंदी संस्कृतीच्या अत्युच्च कालांतहि युद्धें, व महायुद्धें होत असत, व प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाकरवीं भारतीय युद्ध घडवून आणलें. त्या-पूर्वीं श्रीरामांनीं दशमुखी रावणाचा वध करून लंका जिंकली वगैरे पौराणिक कालांतील उदाहरणेंहि आपल्या डोळ्यांसमोर आहेत. इतिहासाचीं पानेंच्या पानें या लाखों युद्धांच्या भीषण वर्णनानें भरलेलीं आहेत ! युद्ध करूं नये, युद्ध करणें वाईट आहे या संबंधांत सर्वांची एकवाक्यताच होईल, पण युद्धाचा प्रसंग आला

तर काय करावें हा प्रश्न जेव्हां समोर येतो, तेव्हां तात्त्विक विवेचनानें किंवा युक्तिप्रयुक्ति लढविल्यानें प्राप्त प्रसंगांतून पार पडतां येत नाहीं. जगांत युद्धें होणार, सशक्त व अनैतिक लोक आक्रमण करणार, चोर चोऱ्या करणार, खुनी लोक खून करणार, गुन्हेगार घरफोड करणारच. ह्या सर्व क्रिया वाईट आहेत खऱ्या, पण त्या करण्याची प्रवृत्ति मनुष्यस्वभावांत तामस वृत्तीनें दृढमूल आहे. कांहीं किम्बहुना पुष्कळ लोकांनीं असल्या असत् प्रवृत्तींचें जरी आपल्या मनांतून विचारांनीं व निग्रहपूर्वक उच्चाटन केलें तरी कांहीं लोकांच्या अंगीं हे गुण राहणारच. म्हणून युद्ध नको असें केवढेंहि प्रतिपादन केलें, व युद्धें टाळण्याचें कसून यत्न केले तरी त्याचा प्रसंग जेव्हां अनिच्छेनें प्राप्त होतो तेव्हां फक्त परिस्थितीला तोंड कसें द्यावयाचें व त्यासाठीं काय योजना करावयाची एवढेंच कार्य राहतें व हें खरें असेल तर राष्ट्राला आपलें स्वातंत्र्य राखण्यास, अथवा तदर्थ प्रयत्न करण्यास्तव कोणत्या गोष्टींची अवश्यकता असते या एकाच गोष्टीकडे पाहिलें पाहिजे.

ज्याला स्वातंत्र्य प्रिय आहे त्यानें तें मिळविलें पाहिजे व रक्षण करण्यास तयार असलें पाहिजे. जगतांत कोणीच कोणाचा नाहीं. "जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला । जो स्वयेंचि कष्टत गेला । तोचि भला ॥ ". हिंदुस्थानला स्वातंत्र्य हवें म्हणणारांनीं स्वातंत्र्यरक्षणार्थ तयार असलें पाहिजे व तयार राहण्याची पूर्वतयारीहि केली पाहिजे. हिंदुस्थान ही आपली मायभूमि म्हणणाऱ्या प्रत्येक नागरिकानें मातृभूमीच्या स्वातंत्र्यरक्षणार्थ खटपट करावयास पाहिजे. त्यांत जातिगोताचा, श्रेष्ठकनिष्ठतेचा, उच्चनीच संस्कृतीचा व याच प्रकारें इतर भेदाभेदाचा विचार पार विसरावयास तयार झालें पाहिजे. हिंदुस्थान हें एक अखण्ड व अविभाज्य राष्ट्र असून त्याचें रक्षण करणें आपलें पवित्र कर्तव्य आहे ही भावना मनांत बाळगून संरक्षणक्षम होण्याच्या प्रयत्नांत मदत करावयास पाहिजे. प्रत्येक वयांत आलेल्या नागरिकानें स्वातंत्र्यरक्षणाच्या प्रयत्नांत आपापल्या शक्त्यनुसार भाग घेतला पाहिजे, व आपल्या कर्तव्यापासून च्युत होणाऱ्या माणसास युद्धांत मदत करण्यास भाग पाडतां येण्याचें बळ राष्ट्रीय सरकारास असावयास पाहिजे, व तें तसें असतेंहि हें या प्रकरणारंभीं दिलेल्या ब्रिटिश प्रधानांच्या भाषणांतील अवतरणावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. युद्धाचे वारे युरोपांत वाहूं लागतांच इंग्लंडच्या मुख्य प्रधानानें पार्लमेंटपुढें २६ एप्रिल १९३९ रोजीं केलेल्या भाषणाचा

सारांश असाः—"रिझर्व्ह व ऑक्झिलियरी फोर्सेस बिल या नांवाचें बिल पार्लमेंटपुढें सादर करण्याचें सरकारनें ठरविलें असून या बिलानें सरकारला कौन्सिलच्या हुकमतीनें सरकारी लष्करी विभागांतील राखीव अगर मदतगार म्हणून नोंदल्या गेलेल्या अगर जाणाऱ्या इसमांस नोकरीसाठीं हजर होण्याचा हुकूम देणें सुलभ पडेल. युरोपांतील सर्व राष्ट्रांस असणाऱ्या हक्कांचीच मागणी या बिलाअन्वयें करण्यांत आली आहे."

युरोपांत चालूं असलेल्या जर्मनांच्या आक्रमक हालचालींमुळें उद्यां काय प्रसंग येईल याचा नेम नाहीं हें जाणून आक्रमणास तोंड देण्याच्या तयारीसाठीं राष्ट्रांतील सर्व लोकांस वेळोवेळीं प्रसंग पडेल त्याप्रमाणें विशिष्ट वयाच्या माणसांस सैन्यांत रिक्रूट म्हणून भरती करतां यावें म्हणून वरील प्रकारचें एक बिल पुढें आणून राष्ट्राची युद्धार्थ मदतीस संमति घेतली गेली. या बिलावर भाष्य करतांना मि. चेंबरलेन म्हणतात कीं, "प्रथमतः फक्त २०—२१ या वयाच्या माणसांसच पाचारण करण्यांत येईल व यामुळें २ लक्ष माणसांस हुकूम करण्यांत येईल. यांत कोणत्याहि तऱ्हेचा भेद किंवा पक्षपात दाखविला जाणार नाहीं. यांत सगळ्यांस सारखेंच लष्करी शिक्षण दिलें जाऊन वद्यकीयरीत्या लायक असणाऱ्या कोणत्याहि माणसास वगळलें जाणार नाहीं. या सर्वांस सहा महिने शिक्षण दिलें जाईल व मग त्यांस टेरिटोरियल फोर्समध्यें साडेतीन वर्षें भरती होण्याचें अनुशासन देण्यांत येईल. या सर्व लोकांस आरमार, खुष्की सैन्य, वैमानिक दल, टेरिटोरियल किंवा सिव्हिल डिफेन्स याप्रमाणें कोणत्याहि खात्यांत आपल्या इच्छेनुरूप भरती होतां येईल. सहा महिने शिक्षणक्रम पुरा झाल्यावर टेरिटोरियल फोर्समध्यें भरती होण्याच्या संधीचा फायदा न घेणारांस खड्या फौजेच्या स्पेशल रिझर्व्हमध्यें घेतलें जाईल."

शांतता राखणें ही सापेक्ष क्रिया आहे. आपण युद्ध टाळावयाचा कितीहि प्रयत्न केला तरी आपल्या आवतीभोंवतीं अग्नि भडकत असतां तो विझविण्याची तयारी करण्यास कोण उद्युक्त होणार नाहीं? याचप्रमाणें हिंदी संरक्षणाच्या बाबींचा विचार करावयास पाहिजे. हिंदुस्थान हल्लींच्या महत्तम युद्धानंतर स्वतंत्र होणार ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट दिसत आहे. प्रश्न आहे तो फक्त कालाचाच! डोमिनियन स्टेटस कीं पूर्ण स्वातंत्र्य हा प्रश्न महत्त्वाचा नसून स्वातंत्र्यरक्षणार्थ राष्ट्रास सैन्य कसें असावें हा वादाचा प्रश्न राहील व याचाहि विचार करणें अवश्य आहे.

हिंदुस्थानांतील फौजेला "राष्ट्रीय" हें विशेषण लावणें सोपें नसून त्यांत अनेक कटकटी उभ्या राहण्यासारख्या आहेत, व त्यांत पहिली मुख्य अडचण इंग्रज सरकारची. हिंदी फौज राष्ट्रीय होण्यासाठीं प्रथमतः हिंदुस्थानांत राष्ट्रीय सरकार तयार झालें पाहिजे, व त्याकडे हिंदुस्थानांतील सर्व प्रकारच्या राज्य-यंत्राचा ताबा यावयास पाहिजे. हें घडणें आज घटकेस जरी दुरापास्त दिसत असलें तरी पुढेंमागें थोड्याच अवधींत हें शक्य कोटींत येण्यासारखें आहे, व मग सहजच "राष्ट्रीय फौजे"चा हिंदुस्थानांतील प्रश्न सुटण्याच्या मार्गाला लागून कांहीं अल्पावधींत तो सोडविला जाईलहि. हिंदी पुढाऱ्यांना व सामान्य जनतेला अजून कांहीं वर्षें झगडावें लागेल. कॉंग्रेस म्हणते त्याप्रमाणें कांहीं दिवस "वनवासांत भटकावें लागेल," पण अखेरीस याच खटपटींतून आज अनेक मतमतांतरें गोंधळ घालीत असलीं तरी सर्वांचें अखेर पर्यवसान हिंदुस्थानांत एकमुखी (unitary) मध्यवर्ति लोकशाहीची सत्ता प्रस्थापित होण्यांतच होईल, व त्यानंतरच "राष्ट्रीय" फौजेची निर्मिति होईल. प्रांतिक स्वायत्तता व त्या प्रांतांचें राष्ट्रीय एकीकरण म्ह. सांधेजुळणी होऊन मध्यवर्ती हिंदी राष्ट्रीय सरकार उत्पन्न होणार हाच एक मार्ग हिंदुस्थानपुढें आहे. "पाकिस्तान" कल्पनेनें भारलेल्या लोकांस आपला दुराग्रह सोडावाच लागेल व अखेरीस राष्ट्रीय विचाराकडेच झुकावें लागेल. आज हिंदुस्थानांत तिऱ्हाईत राजसत्ता असून प्रत्येक जातीय संस्थेचें लक्ष तिच्या हातून आपणांस विशिष्ट हक्क मिळतील इकडे आहे व त्याकरितां जाती–जातींचे आपआपसांत झगडे सुरू आहेत. ते झगडे दूर होतील हें निश्चित व मग मध्यवर्ती सरकार राष्ट्रीय स्वरूपाचें तयार होतांच त्यास स्वसंरक्षणाचा भार उचलावाच लागेल व मगच "राष्ट्रीय फौज" निर्माण होईल. परंत त्यासंबंधानें आगाऊ विचारहि करून ठेवावयास पाहिजे, व आज हयात असलेल्या फौजेच्या ठेवणींत व संघटनेंत महत्त्वाचे फरक घडवून आणले पाहिजेत. त्यासाठीं मुख्य दोन गोष्टी व्हावयास हव्यात व त्या म्हणजे हिंदी लोकांनीं आत्मविश्वासानें फौजेंत शिरण्याचा निश्चय करून त्या दिशेनें जोराची चळवळ करावयास हवी; व दुसरी म्हणजे इंग्रज सरकारनें आजपर्यंतचें आपलें अविश्वासीपणाचें धोरण टाकून हिंदुस्थान स्वतंत्र होणार, मग त्यांस वसाहतींचें स्वराज्य असो कीं पूर्ण स्वातंत्र्य असो, हें मान्य करून त्या दिशेनें भावी स्वतंत्र हिंदुस्थानाचा स्नेहसंपादन करून त्याचें सहकारित्व

आपल्याकडे राखण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे. आजच्या स्थितींत हिंदी लोकांस हिंदुस्थानचें स्वतंत्र संरक्षणखातें निर्माण करण्यासाठीं सर्व प्रकारच्या फौजी शिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे व तज्ज्ञ लोकांच्या मदतीची अपेक्षाहि आहे हें विसरून चालणार नाहीं. प्रथमतः हिंदी राष्ट्रीय फौज तयार करण्यासाठीं म्हणून लोकांत तेजस्विता, वीरवृत्ति व स्वाभिमान जागृत करण्यासाठीं पुढील पिढीला लहानपणापासून वळण द्यावयास पाहिजे, व त्यासाठीं इतर राष्ट्रांतील लोकांनीं केलेल्या प्रयत्नांकडे लक्ष देणें जरूर आहे. आज हिंदुस्थानचें स्वतंत्रपणें रक्षण करण्यास लागणारें आरमार, वैमानिकदल व सैन्य यांची संघटना करण्यास्तव अनेक तज्ज्ञ लोकांचें बोर्ड निर्माण करून त्यांचेकडून पक्की योजना आंखून त्याप्रमाणें व्यवस्था घडवून आणावी लागेल. राष्ट्र म्हटलें कीं त्यांतील प्रत्येक नागरिक स्वतंत्र व त्यावरील जबाबदारीहि तितकीच व ही जबाबदारी पार पाडण्याचें शिक्षण त्यास मिळावयास पाहिजे व त्यासाठीं इतर देशांप्रमाणें या देशांत ज्यूनिअर व सीनिअर कॅडेट कॉर्प्स उघडण्यांत येऊन त्यांचा सर्व शाळांतून पुरस्कार करणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें शिस्तवार "तरुण संघटना" अथवा यूथ मुव्हमेंटला प्रारंभ करावयास पाहिजे, व सर्वांचा रोख एकराष्ट्र बनविण्याकडे पाहिजे. सक्तीचें लष्करी शिक्षण व भरती करणाऱ्या राष्ट्रांसहि खड्या फौजेला संरक्षणांत मदत व्हावी म्हणून देशांतील इतर सेनाबाह्य संघटनाकडे आतुरतेनें, आस्थेनें व आपुलकीनें पाहणें जरूर असतें. इटलींत खडी फौज असूनसुद्धां तेथील काळे डगलेवाले स्वयंसेवकांचें शिस्तवार संघटन देशांत असून त्या दलांतील सभासदांची संख्या कांहीं दशलक्षांवर भरेल इतकी असल्याचें ऐकीवांत आहे. त्याचप्रमाणें नाझी पक्षाचे जर्मनींत ब्रौन शर्टवाले संघटित झाले असून राष्ट्रीय फौजेच्या बळांत भर टाकीत आहेत. या संघटनेंतहि शेतकरी व मजूर वर्ग बराच असून त्या सर्वांस सक्तीनें लष्करी शिक्षण देऊन तयार केलेले हजारों लोक आहेत. नाझी व फॅसिस्ट स्वयंसेवक दलांचे अधिकारीहि त्यांच्या लायकीवरून निवडले जातात. झेको-स्लोव्हेकियांतहि अशा प्रकारचें स्वयंसेवकदल असून त्यांतील सभासदांस "सोकोल" म्हणजे बहिरीससाणा हें नांव दिलें होतें. झेक लोकांच्या ७० लक्ष लोकसंख्येपैकीं ४ लक्ष ६० हजार लोक सोकोल स्वयंसेवकदलांत होते, व याच लोकांचा भरणा खड्या फौजेंत मोठ्या प्रमाणांत होत असे.

रशिया, चीन, जपान, ईजिप्त, तुर्कस्थान इत्यादि अनेक स्वतंत्र राष्ट्रांत याप्रमाणें अनेक स्वयंसेवक दलें उभारलीं जातात व त्यांत लाखांनीं मोजतां येण्याइतके स्वयंसेवक तयार असतात, व सर्वांचा स्वदेशावरील आक्रमणप्रसंगीं फौजेंत उपयोग होतो. इंग्लंडमध्येंहि युनिव्हर्सिटीज अर्चन व रूरल असोसिएशन्स असून त्यांतील सभासद देशांतील क्षात्रवृत्ति जागृत ठेवतात, व यामुळें स्वतंत्र देशांत वेळप्रसंगीं युद्धांत भाग घेणारा अर्धा कच्चा माल सतत तयारच असतो. हिंदुस्थानांत अलीकडे राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, स्वतंत्र मजूर स्वयंसेवक, गिरणी कामगार पथकें, किसान व मजूर स्वयंसेवक, भारत संरक्षक दल वगैरे स्वयंसेवक-पथकें अस्तित्वांत असून अकाली, अहरार, जमीआत उलेमा, खाकसार वगैरे इतर स्वयंसेवकदलेंहि आहेत. परतु स्वतंत्र राष्ट्राप्रमाणें यांस फौजी शिक्षण जितकें असावयास पाहिजे तितकें असत नाहीं. महाराष्ट्र व्यायाम शाळा, पुणें, हनुमान व्यायाम प्रसारक मंडळ, अमरावती, वगैरे संघहि आपापल्या परीनें देशांत वीरवृत्ति उत्पन्न करण्याचा प्रयत्न करीत असले तरी त्यांच्या मागें "राष्ट्राचा"—स्वतंत्र राष्ट्राचा हात नसल्यानें या संस्था प्रभावी होऊं शकत नाहींत. या सर्व संस्थांचा उपयोग करून त्यांस राष्ट्रीय संघटनेंत गोंवणें जरूर आहे.

फौजीखातें निर्माण करून स्वदेशरक्षणार्थ खडी फौज निर्माण करणें तर क्रमप्राप्तच असतें; परंतु केवळ एकट्या पगारी सैन्याकडून पुरेसें देशरक्षण न होतां त्या कामीं स्वदेशप्रेमानें भरलेल्या व भारलेल्या देशभक्त स्वयंस्फूर्त सेवकांचीच देशाला आवश्यकता असते हें गेल्या मेच्या अखेरीस फ्लँडर्समध्यें डंककेच्या आसमंतांत जें तुमुल रणकंदन झालें त्यांतील इंग्रज सैनिकांच्या शौर्यावरून जगाच्या निदर्शनास आलें. भाडोत्री लोक तात्पुरतीं कामें करतील, पण आपल्या मातृभूमीच्या संरक्षणाकरितां निराशामय स्थितींत आत्मबलिदान करण्यास प्रवृत्त होणें असंभवनीय आहे. पंजाबांत गुरु गोविंदांनीं आरंभिलेल्या राष्ट्रसंघटनेंत व दक्षिणेंतल्या श्रीशिवछत्रपतींच्या राष्ट्रीय संघटनेंत हजारों देशभक्त स्वयंस्फूर्तीनें पुढें सरसावून त्यांनीं फार मोठे व कल्पनातीत पराक्रम करून सोडले. विजापूर, बेदर, गुजराथ, मोंगल वगैरे बादशहांच्या पगारी फौजांचें या राष्ट्रीय वृत्तीच्या फौजांपुढें फारसें चाललें नाहीं. आजहि पॅलेस्टाइनमध्यें राष्ट्रीय वृत्तीनें भारलेल्या लोकांच्या संघटना ब्रिटिशांच्या साम्राज्यसत्तेशीं झगडून आपला देश स्वतंत्र करण्याच्या खटपटींत आहेत. आज हिंदुस्थानला

अशा प्रकारच्या राष्ट्रीय संघटनेचीं, राष्ट्रीय वृत्तीनें भारलेल्या लष्करी स्वयंसेवकांचीं पथकें उभारण्याची अवश्यकता आहे. हिंदुस्थानांतील शाळा व कॉलेजें यांजमधून लष्करी संघटनेसारखे विषय शिकवून त्यांचें प्रत्यक्ष व्यावहारिक शिक्षण देणाऱ्या संस्था निर्माण झाल्या पाहिजेत. १४ ते १८ वर्षें वयाचीं मुलें व नंतर १८ चे २२ वयांतील मुलें यांना फौजी शिक्षण देण्यासाठीं शाळांतून ज्यूनियर कॉर्प्स व कॉलेजमधून ऑफिसर्स ट्रेनिंग कॉर्प्स उभारले जाऊन शिवाय आरमार व वैमानिक दलासाठीं पूर्वतयारी म्हणून कांहीं सोय होणें अवश्य आहे. हें सर्व काम सरकारी रीत्या व्हावयास पाहिजे. यासाठीं हिंदुस्थानला स्वराज्य लौकर मिळावयाचें असून मधला अल्प काळच आपलें स्वामित्व हिंदुस्थानवर राहणार ही गोष्ट ब्रिटिश सरकारनेंहि आपल्या मनाशीं पटवून घेऊन हिंदुस्थानला स्वसंरक्षणक्षम करण्यांत हातभार लावणें अवश्य आहे.

हिंदी लोकांना आपल्या देशांतील लष्कर, परराष्ट्रीय राजकारण व जकाती इत्यादि सर्व बाबतींत आपला कारभार आपल्या हातानें करण्याचें स्वातंत्र्य मिळालें तरी त्यांना ग्रेटब्रिटनशीं आपला संबंध तोडून कॉमनवेल्थमधून फुटून निघणें अवश्यक व अपरिहार्यच होईल असें मानावयास जागा नाहीं; आणि अशा रीतीनें ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें राहून हिंदुस्थान स्वतंत्र झाला तर त्यानें हिंदुस्थानपेक्षां खास ग्रेटब्रिटनचा फायदा जास्त होईल व लौकिकहि अपरंपार वाढेल. स्वतंत्र व संतुष्ट बलशाली हिंदुस्थान मित्र असल्यावर दुनियेंतील सर्व राष्ट्रांनीं ग्रेट ब्रिटनचा द्वेष केला तरी त्यास भय बाळगण्याचें कारण उरणार नाहीं. हिंदुस्थानचे व इंग्लंडचे परस्पर हितसंबंध निगडित करून ते सुरक्षित ठेवणें इंग्लंडच्या हातीं व इंग्लंडच्याच हिताचें आहे; व त्याकरितां ब्रिटिश मुत्सद्यांनीं आजवरचा अविश्वासाचा व केवळ स्वार्थीपणाचा दृष्टिकोन बदलून सहानुभूतीचें, व विश्वासाचें धोरण अंगीकारावयास पाहिजे. करायचें म्हटलें कीं मार्ग आपोआप सुचूं लागतात. प्रथमतः अमुक धोरण अंगीकारावयाचें हें ठरलें म्हणजे त्याची आंखणी करतां येते. खड्या फौजेंत कितीहि लोक पगारी ठेवले तरी तिला मदतनीस म्हणून राखीव फौज ( Reserves ) व भौगोलिक दल ( Territorials ) व मदतगार दल ( Auxiliary ) वगैरे पुरवणी सैन्याची अवश्यकता लागतेच. फौजी खर्च कमी करावयाचा झाला तर टेरिटोरियल व ऑक्झिलियरी फोर्सची वाढ करावी लागते व त्यांतून ऐनवेळीं खड्या सैन्याची

वाढ करतां येते. कोणत्याहि स्वतंत्र राष्ट्रांत याच रीतीचा अवलंब करण्यांत येतो व फरक जर असेल तर तो शब्दाचा म्हणजे लष्करांत भरती व्हावयाची ती सक्तीची कीं ऐच्छिक हा होय. हिंदुस्थानांत आज तरी सर्वत्र सक्तीच्या पद्धतीचा अवलंब करावा लागेल व त्यासाठीं सर्व शिक्षणसंस्थांना निमलष्करी पद्धति लावावी लागेल. हिंदुस्थानांत सुमारें सात लक्ष खेडीं असून त्यांतून शिक्षण अत्यंत मागसलेलें आहे. सर्वत्र शिक्षणाचा व तदनुषंगिक वयोमानास साजेलसा कमीअधिक मानाचा लष्करी कार्यक्रम हा सर्वत्र सुरू व्हावयास पाहिजे, व या लष्करी शिक्षणांत सर्व लष्करी विभागांचें शिक्षण देणें जरूर आहे. शाळांतून शिक्षण घेऊन बाहेर पडणारे सर्व विद्यार्थी नाना प्रकारचे धंदे करणारे असतात व त्यांस त्यांच्या त्यांच्या आवडीनिवडीप्रमाणें सैन्यविभागांतील व तदनुषंगिक सहाय्यक विभागांतील कार्यक्रमाचें शिक्षण दिलें गेल्यास नाविक, वैमानिक, तोफखाना, घोडदळ, पायदळ, यांत्रिक रणगाडेदळ, मोटरित दळ, वाहतुकी दळ, मेडिकल लष्करी ज्ञान, ऑर्डनान्स वगैरे इतर मदतनीस खातीं यांचें ज्ञान घेणारे विभाग तयार करावे लागतील व याप्रमाणें एकाच राष्ट्रसेनेची तयारी शाळा व कॉलेजेसमधून करतां येईल. या सर्वांस राष्ट्राचा म्हणून गणवेष असणें अवश्यक आहे. गणवेषामुळें सर्व लोक एकाच सैन्यविभागांत खांद्यास खांदा लावून परेड, ड्रिल, निशाणबाजी, घोडफेंक व शस्त्रास्त्रफेंक शिकूं लागलें कीं जातिभेद, उच्चनीचता, भौगोलिक मतभेद यांचें विस्मरण आपोआप व न कळत पडूं लागतें, व राष्ट्रीयत्वाच्या कल्पनांचा विकास होऊन त्या बद्धमूल होतात. निशाण मारतां येण्यासाठीं मोठमोठ्या खेड्यांतून रायफल क्लब स्थापन करणें इष्ट आहे. हें कार्य प्रत्येक ठिकाणच्या श्रीमंत, सुखवस्तु व जबाबदार आणि वजनदार अशा देशप्रेमी लोकांनीं करावयास पाहिजे. शाळातून दिखाऊ लाकडी बंदुकी हातांत देऊन मुलांना ड्रिल करावयास शिकविलें पाहिजे व हें नीट चालण्यासाठीं प्रथमतः शिक्षकवर्ग निर्माण करून त्यांजकडून हें कार्य करवून घ्यावयास हवें. हें फौजी शिक्षण देणारे शिक्षक व साहित्यिक शिक्षक एक नसावेत. हीं कामें करणारे वेगळे असावेत. शारीरिक व फौजी शिक्षण देणारे लोक स्वतंत्र तयार करावयास पाहिजेत, व यांस विशिष्टशिक्षणक्रम घेऊन कोठेंतरी टेरिटोरियल व ऑक्झिलिअरी फोर्समध्यें स्थान असेल असे हे असावेत. आज हिंदुस्थानांतील लोक गेल्या सुमारें ८०–९०

वर्षांत शस्त्रास पारखे झाल्यामुळें त्यांस शस्त्रज्ञान मुळींच राहिलें नाहीं, व त्यांचे अंगीं एक प्रकारचा निरुत्साह दिसून येतो. ता जाण्यासाठीं म्हणून सर्वत्र रायफल क्लब स्थापन होणें अवश्यक आहे. व्यापारी, सावकार व ऐतखाऊ लोकांकडून यास फारसें उत्तेजन मिळणार नाहीं, नव्हे, विरोधहि होण्याचा संभव आहे; मजूरवर्ग व शेतकरी हेहि मुलांना वेळ मिळत नाहीं अशी सबब सांगतील, व पांढरपेशा वर्गांतील सुखवस्तु व नोकरी पेशाचे लोकांस हें शिक्षण थोडेंसें जड व अनवश्यकहि वाटेल. पण देशाचें संरक्षण करावयाचें व हिंदुस्थान स्वतंत्र करावयाचा तर शस्त्रें वापरण्यास शिकल्यावांचून गत्यन्तरच नाहीं. हें ज्ञान एवढें अवश्यक आहे की, हिंदुस्थान, देशभर कारखाने काढून संपत्तींत अमेरिकेच्या तोडीचा बनविला तरी शस्त्रास्त्रें वापरण्याच्या शक्तीच्या अभावीं तो परतंत्रच राहणार! म्हणून पंचवार्षिक, दशवार्षिक धोरणें आंखतात त्याप्रमाणें रायफल क्लबसंबंधाचें एखादें धोरण आंखून त्यांत १४ ते १८ वर्षें वयाच्या मुलांस निशाणबाजींत तरबेज झालेंच पाहिजे असा अट्टाहास राष्ट्रांतील सर्व लोकांनीं धरावयास पाहिजे. हें सर्व करण्यास जें सरकार हिंदुस्थानांत संक्रमण कालांत अस्तित्वांत असेल त्यानें या बाबतींत लोकप्रतिनिधींची संमति घेऊन आरंभ करावयास पाहिजे. आज इंग्लंडवर असलेलें संकट खरें आहे, पण तें निवारण करण्यासाठीं म्हणून निश्चयानें व निःस्वार्थबुद्धीनें जीं कार्यें हातीं घ्यावयाचीं आहेत त्यांत राष्ट्रीय निर्मितीचें कार्य अत्यंत अवश्यक आहे. आज लोकांमध्यें या संबंधानें असलेलें औदासीन्य पार घालविलें पाहिजे. संतुष्ट हिंदुस्थाननें इंग्लंडला मदत केल्यास काय होणार नाहीं? पण यांतील मुख्य गोष्ट म्हणजे हिंदुस्थानला संतुष्ट ठेवणें ही होय. शाब्दिक छल सोडून हिंदुस्थान खरोखरींचें वसाहती स्वराज्य भोगत आहे अशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे व मग सर्व राष्ट्रांतील लोकांचें लक्ष एक व तें हिंदुस्थानचें सर्व सरहद्दीवरील संरक्षण करून हिंदुस्थान एकजिनसी राष्ट्र, अभंग राष्ट्र केलें पाहिजे. वॉरफंड पुढें येतांच खेड्यापाड्यांतून, गोरगरीबांकडून श्रीमंत व सुखवस्तु लोकांतून, अधिकारीवर्ग, सावकार, व्यापारी, धंदेवाईक व गरजू इत्यादि सर्व प्रकारच्या लोकांकडून वसूल होतोच कीं नाहीं? संस्थानिक लोक अहमहमिकेनें आपल्या तिजोऱ्या उघड्या करतातच कीं नाहीं? मग हिंदुस्थान स्वतंत्र व अभंग रहावा म्हणून होणारे राष्ट्रफौजानिर्मितिसाठीं हे सर्व लोक मदत कां करणार नाहींत? खास करतील. परंतु यासाठीं थोडा सरकारी रीत्या व बराचसा पुढाऱ्यां-

कडून पुरस्कार व्हावयास पाहिजे. आज कॉलेजांतून दिलें जाणारें यु. टी. सी. मधील लष्करी शिक्षण अत्यंत कमदर्ज्याचें असतें; तें वाढवून त्यांतूनच सर्व शाखांची निर्मिति करावयास हवी. खर्चाची सबब पुढें करण्यांत येते. व्हाइस-रॉय, गव्हर्नर, पुढारी, बदललेले अधिकारी यांना मेजवान्या देणें व त्यांचा सन्मान करणें, लग्न-मुंजी व इतर सामाजिक देखाव्याचीं कार्यें यांत वाटेल तितका पैसा खर्च होत नाहीं काय ? या सर्व खर्चाचा ओघ बदलून राष्ट्रीय फौजेच्या कार्यांत त्याचा व्यय करतां येणार नाहीं काय ? सर्व कांहीं करतां येईल, पण मनांत यावयास पाहिजे.

प्रस्तुत परिस्थितीकडे लक्ष देणें अवश्य आहे. आज एका बाजूस जर्मनी व दुसरीकडे दोस्त राष्ट्रें जाऊन फक्त एकटें इंग्लंड व वसाहती यांमध्यें युद्ध सुरू असून इंग्लंडचे वाहतुकीचे मार्गांपैकीं भूमध्यसमुद्रांत इटलीचें संकट अल्प पण खरें, झालें आहे. इटली प्रत्यक्ष युद्धांत जर्मनीकडून सामील झाला परंतु तत्पूर्वी त्याचेकडून संकट होईल या शंकेनें भूमध्यसमुद्रांत विशिष्ट व्यापारी जहाजांस जाण्याची मनाई करून त्यांस आफ्रिकेस वळसा घालून हिंदुस्थानकडे जाण्याची व हिंदुस्थानकडून इंग्लंडकडे जाण्याची मार्गेच विनंति करण्यांत आली होती. इंग्लंड प्रबल आहे, इंग्लंडचे नाविक दलाचा दरारा जबर आहे, व त्याचा व्याप मोठा असून त्यास मदतगार रॉयल एअर फोर्सहि फार मोठा आहे. या सर्व गोष्टी जमेस धरल्या तरी मे महिन्याच्या अखेरीस ब्रिटिशांना फ्लँडर्सच्या रणांगणावरून ३॥ लक्ष सैन्य परत घेऊन ब्रिटनमध्यें माघार घेण्याचा दुर्धर प्रसंग ओढावलाच कीं नाहीं ? यानंतर युद्धाचा रागरंग पुष्कळच पालटला. तो पालट आणखी कसा होईल कोणीं सांगावें ? इंग्लंडला स्वसंरक्षणार्थ भूमध्य समुद्रांतील इटलीच्या संकटास तोंड देण्यास व आर्क्टिक समुद्रांत व नॉर्वेच्या आसपास नॉर्थसी व अटलांटिकमध्यें जर्मनांना तोंड देऊन मागें हटविण्यास नाविक दल किती लागेल व आपले वाहतुकीचे मार्गांवरील कनव्हॉय पद्धतीकडे किती फौज, गल-बतें ठेवावीं लागतात हें तज्ज्ञांस माहीत असलें तरी सर्वसाधारणपणें हिंदी महासागर व अरबी समुद्र यांत हिंदुस्थानचे समुद्रावरील व सरहद्द संरक्षणास लागेल ती मदत हमखास पोंचवितां येईलच याची कितीशी खात्री देतां येईल, याचाहि विचार केला पाहिजे.

इटलीला प्रसंगविशेषीं ५ लक्ष लोक फौजेंत भरती करतां येतील असें सि. मुसोलिनीनें एकदोन वर्षांपूर्वी एका जाहीर भाषणांत म्हटलें होतें. इटलीच्या लोक-

संख्येतून इतके लोक निघूं शकणार नाहींत मग बाकीचे येणार ते ॲबिसीनिया, लिबिया, एरिट्रिया, सोमाली लँड या इटलीच्या वसाहतींतील मूर, बांटू व एथिओपियन या लोकांमधूनच मिळणार व हे लोक उत्तम लढवय्ये म्हणून नांवाजलेले आहेत. यांस पुढारी उत्तम लाभला व आधुनिक शस्त्रास्त्रें त्यांना पुरविलीं कीं ते उत्तम प्रकारें लढतील. सरसेनापति सर कॅसेल्स यांनीं म्हटल्याप्रमाणें इंग्लंडवर स्वारी करण्यांत निराश झालेला हिटलर पश्चिमेकडून हिंदुस्थानला युद्ध परिघाजवळ खेंचण्याचा प्रयत्न करणार नाहींच असें नाहीं. वायव्य सरहद्दीवरील संकट नाहींच व रशियाची भीति नाहीं असें म्हणणेंहि धाष्ट्याचें ठरेल. पूर्वेकडे आज जरी जपान स्तब्ध दिसत असला तरी तो स्तब्ध बसेलच याची हमी कोण घेणार ? याप्रमाणें सर्व बाजूंनीं विचार करावयास पाहिजे व तसा केला असतां या सर्व अडचणींच्या परिहारास एकमेव उत्तर दिसतें तें हें कीं, हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतून राष्ट्रीय फौज तयार करण्याचीं केन्द्रें उघडून त्याची तयारी करावयास पाहिजे. पण घांट बांधावयाची कोणी ?

फौज तयार करावयाची कीं खर्चाची बाब पुढें आलीच व त्याची तरतूद काय हाहि प्रश्न सोडविणें जरूर आहे. आज हिंदुस्थानांत अस्तित्वांत असलेल्या हिंदी फौजेंतील ब्रिटिश विभागांत अंदाजें ६० हजार ब्रिटिश सैनिक असून त्यांजवर प्रत्येक शिपायामागें वार्षिक १४०० रु. खर्च येतो, व हिंदी शिपायामागें तोच खर्च दरमाणशीं फक्त ४०० रु. येतो. याप्रमाणें दर ब्रिटिश शिपायामागें होणारा अधिकीचा खर्च सैन्याचें हिंदीकरण केल्यानें पुष्कळच कमी होणार आहे हें उघड आहे. दरवर्षी लष्करावर अंदाजें ५० कोट रुपये खर्च होतात असें धरल्यास त्यापैकीं एक-तृतीयांश खर्च फक्त ब्रिटिश फौजेवर होतो. हा खर्च कमी केला पाहिजे व संरक्षणास अधिक लोक पाहिजे असल्यास ब्रिटिश फौजेच्या खर्चात तिप्पटीची फौज हिंदी सैनिकांची वाढवितां येईल. जपान, चीन वगैरे राष्ट्रांच्या लष्करी खर्चाकडे नजर टाकल्यास हिंदी फौजीखात्याची काटकसर फौजेच्या हिंदीकरणानेंच करतां येईल असें दिसतें. यासंबंधांत दोनचार गोष्टींचा उल्लेख केल्यास खर्चाची काटकसर कशी करतां येईल हें सहज लक्षांत येईल. फौजेंत शिपाई आजारी पडणारच व त्यांस औषधाची सोय करण्यासाठीं होणाऱ्या खर्चाचें मान पाहिल्यास हिंदी फौजेंतील इंग्रजी शिपायावर इंग्लिश फौजेंतील शिपायांपेक्षां जवळ जवळ दुपटीपेक्षां किंचित् अधिक खर्च होतो. कसें तें पहाः—

| देश | इंग्रज शिपाई | वार्षिक वैद्यकी खर्च | दर इंग्रज शिपायागणिक |
|---|---|---|---|
| हिंदुस्थान | ६०००० | ७३ लक्ष रुपये | १२१ |
| इंग्लंड | १४४००० | ८० लक्ष रुपये | ५५ |

( कॅप्टन मोडकांचें पुस्तक )

याप्रमाणें हिंदुस्थानांत दर इंग्रज शिपायामागें वैद्यकीय खर्च १२१ रु. तर त्याच इंग्रज शिपायामागें तोच वैद्यकीय खर्च इंग्लंडमध्यें फक्त ५५ रु. होतो. म्हणजे जवळजवळ दर माणसागणिक ६५ रु. खर्च अधिकीचा होतो व हा वांचविला तर फौजी खर्चांत ४० लक्ष रुपयांची काटकसर सहजच होते. ही झाली फक्त वैद्यकीय खर्चांची गोष्ट. याशिवाय हिंदी शिपाई व इंग्रज शिपाई यांतील भेद पाहिला तर हिंदीकरणानंतर तर यांत अधिकच बचत करतां येईल. तें कसें तें पहा. हिंदी शिपायास दरवर्षी वैद्यकीय खर्च दरमाणशीं फक्त २९ रु. होतो, पण तोच इंग्रज शिपायांवर दरमाणशीं १२१ रु. होतो, म्हणजे साडेचार पटींनीं अधिकीचा होतो. याप्रमाणें खर्चांकडे पाहिलें तर फक्त वैद्यकीय बाबतींतच जवळ जवळ ५५ लक्ष रुपये बचत टाकतां येतील. यानंतर दवाखान्यांतील शिपायांच्या आजारांत शुश्रूषेप्रीत्यर्थ सैनिकांवर होणारा खर्च कमी करतां येईल.

| हिंदी फौजी दवाखान्यांत नर्सेस व मेट्रन्स ( हिंदुस्थानांत ) | शिपाई संख्या | नर्सेस व मेट्रन्सची संख्या | १९३१-३२ खर्च | एकूण खर्च | हिंदीकरणानें होणारी बचत |
|---|---|---|---|---|---|
| | | | रु. | | |
| ब्रिटिश | ६०००० ( अ ) | २६५ ( अ ) | ९१९१८५ ( अ ) | १०८८४८५ | |
| हिंदी | १६०००० ( ब ) | ६० ( ब ) | १६९३०० ( ब ) | | |
| ब्रिटिशांच्या जागीं हिंदी भरती केल्यानें | ६०००० | २२½ | ७३७७८ | | ८४५४०७ |

( कॅप्टन मोडक, इंडियन डिफेन्स, पान. ३४६ )

वरील कोष्टकांत साठ हजार शिपायांस २६५ नर्सेस लागतात, पण १६०००० हिंदी शिपायांस फक्त ६० च नर्सेस लागतात व हेच प्रमाण हिंदीकरणाचे धोरणानें लावल्यास नर्सेस आणि मेट्रन्स मिळून फक्त २४३०७८ रुपये खर्च होतील, कारण हिंदी शिपायांस फार नर्सेस लागत नाहींत व हा खर्च दरवर्षी या बाबीवर आज होणाऱ्या १०८८४८५ रुपयांतून वजा केल्यास बचत ८४५४०७ रुपयांची होऊं शकेल. याचप्रमाणें फौजेंत इंग्रज कारकून ठेवतात व यांचा पगारहि भरभक्कम असतो. फौजीखात्यांत हिंदी व इंग्रज असे मिळून एकूण १०००० च्या वर कारकून असतात व याशिवाय शिपाई कारकून जवळ जवळ अंदाजें १५०० तरी असतील. या बाबतींत लक्ष दिल्यास फौजेंत ५३४२ इंग्रज माणसें कारकून, चेकर्स, फिटर्स, स्टोअर कीपर्स म्हणून असतात. यांत कमींत कमी पगार म्हणून २ कोट रुपये खर्च येतो. यांचे जागीं हिंदी माणसें नेमल्यास त्यांचा खर्च अंदाजें ७० लक्ष होईल तो वजा केल्यास बचत निदान १॥ कोट तरी होईल असा अंदाज आहे.

याशिवाय ब्रिटिश शिपायांसाठीं बांधलेल्या व बांधल्या जाणाऱ्या बराकींच्या खर्चांतून बराच खर्च कमी करतां येण्यासारखा आहे. यास पुरावा म्हणजे इंग्रज अधिकाऱ्यांच्याच हातचा आहे. ईडन रिपोर्टांत पंजाबचे गव्हर्नर म्हणतातः— " If the entire control of the funds now expended by the military works branch was vested in the military Department of the Government of India that department would have a stronger interest in making the money go further ; and doubtless many superfluities and excrescences would be lopped off, the accommodation now given to the British Regiments. " याचा साधारण अर्थ असा कीं लष्करी कामखात्याकडे होणाऱ्या खर्चाची व्यवस्था हिंदुस्थान सरकारच्या लष्करी खात्याकडे दिल्यास याच खर्चांतून अधिक कामें केलीं जातील. त्याशिवाय ब्रिटिश रेजिमेंटला राहाण्यासाठीं होणाऱ्या सोयींतून कितीतरी बिन गरजू व अवास्तव गोष्टींना काट देतां येईल. याचप्रमाणें जनरल बेअर कमँडर इन् चीफ, मुंबई, लिहितातः—"The present single-storeyed barracks are very substantially built, and are excellent in their designs ; but I think their use is

out of proportion to the regiments of the British soldiers, who are not accustomed to, and do not appreciate, so much cubic space."

याचा अर्थ–"प्रस्तुतच्या बराकी एकमजली व चांगल्या मजबूत बांधलेल्या आहेत आणि त्यांची बांधणीहि उत्तम आहे; परंतु ब्रिटिश सोल्जरला अवश्यक वाटणाऱ्या गोष्टींच्या मानानें यावर खर्च वाजवीपेक्षां फाजील होत असून ब्रिटिश सोल्जरांना इतकी मोकळी जागा आवडतहि नाहीं, किंवा त्यांना तेवढी वापरण्याची संवयहि नसते." याप्रमाणें रस्ते बांधणी, घरबांधणी, वगैरे अनेक बाबतींत काटकसर करतां येण्यासारखी आहे, परंतु यावर लक्ष जाण्यास हा पैसा आपला आहे असें वाटणारे फौजी अधिकारी सूत्रचालकांच्या ठिकाणीं असावयास पाहिजेत. पण येथें तर सर्व अधिकारी इंग्रज! वरील बाबींतून निदान दीडदोन कोटींचा खर्च कमी करतां येईल असें कॅप्टन मोडक यांचें म्हणणें आहे. यावरून निदान कमीअधिक अंदाजी मान धरलें तरी खर्च बराच कमी करतां येण्यासारखा आहे ही गोष्ट खरी आहे. ब्रिटिश सोल्जर्सना हिंदी शिपायांपेक्षां तिप्पट अधिक खर्च लागतो! याप्रमाणें तेवढ्याच खर्चांत हिंदी शिपाई तिप्पट वाढवितां येतील म्हणजे ६० ह. ब्रिटिश शिपायांच्या जागीं १ लक्ष ८० हजार हिंदी शिपाई ठेवतां येतील. हे १ लक्ष ८० हजार खड्या सैन्यांतील १ लक्ष ६० हजार हिंदी शिपायांत मिळविल्यास एकूण शिपाई ३ लक्ष ४० हजार होतात. परंतु आज हिंदुस्थानी फौजेंत तर २ लक्ष २० हजारच लोक असतात व त्यावर साधारणतः खर्च ३४ किंवा ३५ कोटी रुपये होईल व त्यामुळें १९ कोटी रुपयांची बचत करतां येईल, व या १९ कोटींचा उपयोग नाविक दल वाढविण्याकडे किंवा वैमानिक दल वाढविण्याकडे करतां येईल. अशा रीतीनें हिंदुस्थान स्वसंरक्षणक्षम करतां येणें शक्य आहे. याशिवाय स्ट्रॅटेजिकल रेल्वे लाइन्स, पोस्ट, टेलिग्राफ वगैरे गोष्टींवर होणाऱ्या फौजी खर्चांतहि बचत होण्यासारखी आहे. अर्थात् या सर्व गोष्टी ठोकळ मानाच्याच आहेत.

याप्रमाणें निवळ फौजी खात्यावर होणाऱ्या खर्चांतून जवळ जवळ २५ कोटी तरी खर्च वांचवितां येण्यासारखा आहे, व शिवाय राष्ट्रीय फौज उभारल्यास स्वदेशासाठीं पगारांतून झिज सोसणारे अधिकारीहि निघतील. आज हिंदुस्थान-

च्या राहणीकडे पाहतां तिची वाढ फारच मोठ्या प्रमाणांत झाली असल्यानें प्रत्येक कुटुंबाचा खर्च वाढलेला आहे. या बाबतींत चीन व जपानचें उदाहरण हिंदुस्थानास गिरवावें लागेल, व तसें करणें म्हणजे पगारांत काटकसर घडवून आणणें होय. याशिवाय नूतन काँग्रेसनें प्रारंभिलेल्या नॅशनल प्लॅनिंग कमिटीचें धोरण ठरेल त्याप्रमाणेंहि हिंदुस्थानच्या जमेच्या आढाव्यांत अधिकीची भर टाकतां येईल. याप्रमाणें धोरण आंखून फौजी खात्यावर अधिक लक्ष दिल्यास आजच्या हिंदी फौजेचें थोड्याच कालांत " राष्ट्रीय फौजें " त रूपान्तर करतां येईल, व मग बाकीचे प्रश्न हळूं हळूं सोडवितां येतील.

हिंदुस्थानांत " राष्ट्रीय फौज " निर्माण करतां यावी म्हणून कांहीं गोष्टींची जरूरी आहे. प्रथमतः हिंदी पुढाऱ्यांनीं हिंदुस्थानचें संरक्षण ही हिंदुस्थानची बाब आहे व त्यासाठीं आम्हांला शस्त्रास्त्रांची अवश्यकता नाहीं व आम्ही शत्रूचें मन पालटवून आपलें संरक्षण करूं शकूं हें वास्तवसृष्टींत अव्यवहार्य ठरणारें म्हणणें व या सिद्धान्तावरील आग्रह सोडावयास पाहिजे. केवळ तत्त्वाच्या तर्कशुद्धतेवर विसंबून राहिल्यानें जगतांत निभाव लागत नाहीं. माझी एकट्याची बुद्धि अत्यन्त शुद्ध केल्यानें जगतांतील सर्वांच्याच बुद्धि शुद्ध होतात हें मोक्षमार्गास लागलेल्या साधूं पुरतें खरें असेलहि कदाचित्, पण हा सिद्धान्त सर्व व्यापक करून तो राष्ट्रासहि लावूं पाहणें, म्हणजे शंभर नंबरी अहिंसेचें तत्त्व पस्तीस कोटी जनतेच्या मनावर बिंबलें आहे किंवा बिंबणार आहे असें गृहीत धरण्यासारखें आहे. सबंध राष्ट्रचे राष्ट्र अहिंसामय होणें शक्य नाहीं, तें पूर्वीं कधीहि नव्हतें, व भविष्यकाळींहि होणें शक्य नाहीं.

पारतंत्र्यांत काल कंठणें म्हणजे केवळ परकीयांच्या मर्जीवर अवलंबून असणें होय। रस्त्यानें जाणाऱ्या लोकांचे दगडधोंड्याचे मार शांतीच्या नांवावर सोसणाऱ्या सर्पाचें तत्त्वज्ञान जसें चुकलें होतें, व खरा गुरु नारद यानें त्यास नुस्ते फुसकारे टाकण्यास सांगून तें सुधारलें, तद्वत् हिंदुस्थाननें आपल्या अहिंसा धर्माचा व्यावहारिक अर्थ करावयास शिकलें पाहिजे. अंगांत अशक्ति, भीति बाळगणाऱ्या लोकांनीं अहिंसेचें तत्त्वज्ञान घटविणें म्हणजे आधींच दुबळे बनलेल्यांनीं राष्ट्र ज्यास्त दुबळं करून सोडणें होय. अहिंसाव्रताच्या प्रतिपादनानें व इंग्रज सरकारावर हल्लीं मोठेंच प्राणघातक संकट गुदरलें असल्यामुळें हिंदुस्थानला एकाद्या वर्षाच्या अवधींत डोमिनियन स्टेटसची सत्ता प्राप्त झाली व

ग्रेटब्रिटनच्या पार्लमेंटनें हिंदुस्थानवरील नियंत्रण ढिलें केलें अशी कल्पना केली तरी इतःपर हिंदुस्थानला लष्कर मुळींच नको असें प्रतिपादन करतां येणार नाही. अशक्तावर हल्ला करणें हा आम्हा हिंदवासीयांचा नसला तरी जगताचा स्वभाव आहे. नाहीतर ॲबीसीनियाला इटलीच्या भक्ष्यस्थानीं पडावें लागलें नसतें, व जपानचें चीनवर आक्रमण झालें नसतें. साराश, हिंदुस्थाननें लष्करी बळ कमावणें हें अहिंसाव्रतास मुळींच बाधक नसून तें केवळ स्वसंरक्षणास अत्यवश्यक आहे. जीवंत रहावयास व श्वासोच्छ्वास करावयास स्वतःचीं फुफ्फुसें व स्वतःचें अन्तःकरण हवें असतें. कृत्रिम व यांत्रिक श्वासोच्छ्वासानें मनुष्य किती वेळ जगूं शकेल ? शिवाय, जर्मन–इटली–जपान इत्यादि इंग्लंडचा हेवादावा करणाऱ्या देशांपासून होणारा उपद्रव टाळण्याकरितां इंग्लंडनें हिंदुस्थानचें ओझें कांहीं अटींवर दूर फेकून हिंदुस्थानला स्वातंत्र्य देऊन टाकलें अशी कल्पना केली, तर त्यानंतर स्वतःच्या राष्ट्रीय लष्कराच्या अभावीं भावी स्वतंत्र हिंदुस्थान सरकार देशाचें संरक्षण कसें करणार ?

जगणें, व मानानें जगणें ही राष्ट्राची पहिली गरज असून तत्त्वज्ञान व त्यावर उभारलेला आचार हा त्या गरजेस पोषक असला पाहिजे. हिंदी लोक पूर्ण अहिंसामय खरोखरच झाले, आतां त्यांचें स्वातंत्र्य त्यांच्या हातांत द्यावयास हरकत नाही असा विचार ब्रिटिशच काय, कोणत्याहि लोकांच्या मनांत याव-याचा नाहीं. व्यवहार कसा चालतो इकडे लक्ष दिलें पाहिजे व हिंदी नागरिक संरक्षण करण्यासाठीं उद्युक्त व्हावा म्हणून त्यास बृहन्नडेनें उत्तरास केलेला उपदेश

"शय्येवरि न पडाया योग्य रणक्षितिवरीच हा काय"

अहोरात्र घोकावयास लाविला पाहिजे. सर्वत्र आग पसरत असतां आपल्या घराभोंवतीं आग येणार नाहीं असें न म्हणतां, आल्यास तिचा ताबडतोब प्रतिकार करण्याविषयीं काळजी घेणें हें केव्हांहि वेडेपणाचें ठरणार नाहीं. झेको-स्लोव्हेकिया, पोलंड, फिनलंड, हॉलंड, बेल्जम या देशांची राष्ट्रिय फौज जय्यत तयार असूनहि जर्मनांच्या प्रचण्ड माऱ्यापुढें टिकाव धरूं शकली नाहीं, म्हणून राष्ट्रिय फौज उभारण्यांत शहाणपण कोणतें ? असा कोटिक्रम करणें योग्य ठरावयाचें नाहीं. मोठमोठाल्या राष्ट्रांच्या फौजांना तरी एकस्यानें कोठें लढतां येतें ? त्यांनाहि फौजी स्नेहसंबंध जुळवूनच दोस्त राष्ट्रांचे संघ निर्माण करावे लागतात. हल्लींच्या

जगांत केवळ वैय्यक्तिक जीवन कोणत्याहि राष्ट्राला करणें शक्य उरलें नाहीं. प्रथम स्वावलंबनानें आत्मरक्षणार्थ एखादें राष्ट्र पुढें सरसावतें व दुसऱ्या राष्ट्रास मदतीस हाक मारतें, व इतर राष्ट्रें सहाय्यास धावून येतात. पण मुळांतच जर एखादें राष्ट्र स्वसंरक्षण करण्यास असमर्थ, पंगु व बलहीन असेल तर इतर बलवान राष्ट्रें त्याजवर चढाव केल्याशिवाय राहणार नाहीत. राष्ट्रसंरक्षणांत भलत्याच तत्त्वज्ञानाचा पाठ घोकणें हितावह न होतां घातकीपणाचें मात्र ठरेल. हिंदी तरुणांस स्फूर्ति यावी म्हणून ऑल इंडिया, प्रॉव्हिनशल व डिस्ट्रिक्ट डिफेन्स लीग्ज सारख्या संस्था उभारून त्यांच्या मार्फतीनें फौजी खात्यांत शिरण्याबद्दल एकसारखा प्रचार तावडतोब सुरू केला पाहिजे. निशाणबाजी चांगली येण्यासाठी जागोजाग रायफल क्लब काढून त्यांत शक्य तितक्या जास्त सुसंपन्न लोकांस सभासद केलें पाहिजे. जगतांत चाललेले कलह, युद्ध, यांत्रिक सामर्थ्य, चढावाचीं व बचावाचीं यंत्रें व इतर साधनें इत्यादि संबंधाची माहिती व्याख्यानद्वारां, मॅजिक लँटर्नच्याद्वारां व शक्य तितक्या अन्यसाधनांनीं खेडोपाड्यांतील जनतेस दिली पाहिजे. मशिनगन्स, रणगाडे विमानें, बॉंबर्स, ॲन्टी टँकगन्स, ॲन्टी एअररेडगन्स, आरमार, ड्रेडनॉट्स, बॅटल, शिप्स, क्रूझर्स वगैरे आज प्रचालित असलेली लढाईची सामग्री व तिचें ज्ञान सर्वांस दिलें पाहिजे. स्वयंसेवक दलें उभारून त्यांस सांप्रदायिक व ठराविक सांचाचीं बनूं न देतां सर्वांत एकराष्ट्रीयत्वाची प्रबल भावना उत्पन्न केली पाहिजे. हें करण्याकरितां जोराचें प्रचार कार्य पुढाऱ्यांनीं केलें पाहिजे. प्रत्येक नागरिकास त्याच्यावरील देशसंरक्षणाच्या जबाबदारीची जाणीव करून दिली पाहिजे. राज्यकारभारांत व कायदेकौन्सिलांत "पक्ष" ही महत्त्वाची बाब असली तरी राष्ट्राच्यावर कोणताहि पक्ष असूं शकत नाहीं. राष्ट्र म्हटलें कीं त्यापुढें कोणत्याहि पक्षानें अथवा व्यक्तीनें आपलें महत्त्व गाजवितां कामा नये, अशी शिकवण द्यावयास पाहिजे. या प्रचाराबरोबरच पुढील महत्त्वाच्या गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत:--

( १ ) हिंदी नागरिक इतर कोणत्याहि देशांतील नागरिकापेक्षां कमी दर्जाचा नसून तो इतरांइतकाच श्रेष्ठ आहे.

( २ ) हिंदी मनुष्य आपलें स्वतःचें सरकार चालविण्यास अपात्र आहे व तो स्वसंरक्षणक्षम होऊं शकत नाहीं हा आजपर्यंतचा प्रचार खोडसाळपणाचा होता,

व ह्या प्रचारानें हिंदी लोकांच्या ठिकाणीं जो दुबळेपणा, परावलंबन व अविश्वास उत्पन्न केला तो भ्रम पार नाहींसा केला पाहिजे.

( ३ ) हिंदुस्थानच्या राष्ट्रसंरक्षणाची बाब, परदेशी हितसंबंध हे लोकांच्याच हातीं असावयास पाहिजेत. त्याबरोबरच आर्थिक धोरण ठरविण्याची सत्ता लोकप्रतिनिधींच्याच हातांत ठेवावयास पाहिजे.

( ४ ) हिंदी फौज " राष्ट्रीय " असली तरच तिचा खर्च बेताचा होईल व तिच्या धोरणांत राष्ट्रहितास अनुसरून फरक करतां येईल.

( ५ ) फौजी खर्चाची बाब " भारतीय समिति " म्हणजे मध्यवर्ती कायदे-मंडळांतील प्रतिनिधींस जबाबदार असणाऱ्या मंत्र्यांकडे सोंपविली पाहिजे.

( ६ ) हिंदी फौजेंत फक्त हिन्दी रहिवाशी ( नागरिक ) घेतले पाहिजेत. परकीयांस त्यांत अगदीं मज्जाव असावा.

( ७ ) फौज भरतीच्या बाबतींत जाति, धर्म, भौगोलिक प्रदेश इत्यादि सर्व भेद काढून सर्वांस सारख्या प्रमाणांत योग्यतेनुसार भरती करण्यांत यावें.

( ८ ) सर्व फौजी विभागांत हिंदी नागरिकांस भरती होतां आलें पाहिजे व त्यांत राखीव जागा किंवा विभाग नसावेत.

( ९ ) राष्ट्रीय फौजा तयार होण्यास्तव हिंदी फौजेंतील इंग्रजी विभागास योग्य मुदतींत कांट देऊन सबंध हिंदी फौजेंत इतःपर एकहि परदेशस्थ ठेवूं नये.

याशिवाय विश्वविद्यालयांत लष्करी इतिहास, युद्धशास्त्र, आरमार, वैमानिक दल वगैरे विषय ऐच्छिक या सदरांत ठेवण्यांत येऊन त्यांचा अभ्यासक्रमांत प्रवेश करावा.

याप्रमाणें प्रयत्न शिस्तशीरपणें चालू केल्यास व सर्व गोष्टी एका विवक्षित धोरणानें केल्यास हिंदुस्थानांत राष्ट्रीय फौजा निर्माण करावयास फार कालावधि लागणार नाहीं. तसें झालें म्हणजे हिंदुस्थानला स्वसंरक्षणाची भीति बाळगण्याचें प्रयोजन उरणार नाहीं. उलटपक्षीं, एवढें मोठें राष्ट्र इतर राष्ट्रांच्या मदतीस धांवत जाऊन आपल्या उज्ज्वल संस्कृतीचा लौकिक जगभर पसरवील. हिंदुस्थान अशाप्रकारें बलाढ्य व स्वसंरक्षणक्षम झाला म्हणजे युद्धपराङ्मुखतेचे धडे व अहिंसेचें उच्च तत्त्वज्ञान जगास शिकविण्याचा अधिकार त्याला प्राप्त

होईल, व त्यानंतरच जगांतील रणसंग्रामास आळा घालणें शक्य होईल. परंतु आज सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे हिंदी माणसानें स्वावलंबनाचा पाठ गिरवून स्वतः या बाबतींत—म्ह. संरक्षण व फौज—सतत विचार व अभ्यास करीत राहिलें पाहिजे. थोड्याच वर्षांत हिन्दुस्थान हें स्वातंत्र्यपद गांठल्याशिवाय खास राहत नाहीं.



# भाग ९

## १९४०

मागील प्रकरणापर्यंत हिंदुस्थानचे संरक्षणा बाबतींत आपण कुठें आहोंत याची माहिती दिलीच आहे. यानंतर प्रस्तुतच्या महायुद्धाचा प्रारंभ ३ सेप्टेंबर १९३९ रोजीं होऊन एक वर्ष पार पडून अनेक महत्त्वाचीं स्थित्यंतरें युरोपांत झालीं व त्याचे परिणाम सर्व जगतास भोगावे लागत आहेत. या स्थित्यंतराचा परिणाम काय झाला व त्यामुळें हिंदुस्थानचें लष्करी संरक्षक धोरणाचे बाबतींत काय फरक झाले तें पाहणें बोधप्रद व हितावह होईल. ता. ३ सेप्टेंबर १९४० ला हिंदुस्थानचे सरसेनापति सर रॉबर्ट कॅसेल्स यांनीं ब्रॉडकास्ट स्पीच सिमल्याहून केलें त्यांतील महत्त्वाचे मुद्दे पुढीलप्रमाणें आहेतः—

(१) फ्रान्स या दोस्त राष्ट्रानें शस्त्र म्यान करून युद्ध तहकुबी केल्यामुळें, व फ्रेंच वसाहतींनींहि तीच परिस्थिति पत्करल्यामुळें भूमध्य समुद्र, तांबडा समुद्र किनारा व युरोपच्या लगतचे एशियाटिक भाग ( Middle East ) यांत नाना प्रकारच्या अडचणी उत्पन्न झाल्या व यांत इंडोचायना व त्यांजवळील इतर फ्रेंच वसाहतींच्या अस्थिर राजकारणानें अधिकीची भर पडली.

(२) याचा परिणाम गेल्या वर्षांत युद्धक्षेत्रापासून दूर असणारा हिंदुस्थान देश युद्धपरिघाजवळ खेंचला गेला.

(३) यामुळें हिंदुस्थानचे संरक्षक धोरणानें स्थानिक संरक्षणक्षमतेंत पूर्णता आली असली तरी त्यास युद्धांत उत्तम मदत करतां यावी म्हणून पूर्वी कधींहि विचारांत अथवा अस्तित्वांत नसलेल्या औद्योगिक कार्यक्षेत्रांत हिंदुस्थानचें पदार्पण अतिजलदगतीनें व प्रमाणबाह्य तऱ्हेनें करणें जरूर पडलें.

(४) बाहेरून वरवर पाहणारास जरी आमची ही संरक्षणक्षम तयारी ढिलाईची दिसत असली तरी हिंदुस्थानी फौजेची वाढ अत्यंत मोठ्या

प्रमाणांत पुढें करावी लागेल, या धोरणास आम्हीं कधींच दृष्टीआड केलें नव्हतें.

( ५ ) हिंदुस्थान सरकारनें १९३९च्या उन्हाळ्यांत ब्रिटिश सरकारशीं केलेल्या करारान्वयें शांतता काळच्या हिंदुस्थानी खड्या फौजेंत महत्त्वाचें फरक करावयाचे होते. अगदीं आधुनिक पद्धतीची संरक्षक व आक्रमक शस्त्रास्त्रें पुरवावयाची म्हणजे यांचा पुरवठा अधिकीचा वाढवणें क्रमप्राप्त पण हें अल्पावधींत उरकतां येणें शक्य व सोपें नव्हतें. यासाठीं आर्डनान्स खात्यांत लागणाऱ्या सर्व जिनसांचें उत्पादन मोठ्या प्रमाणांत देशांतल्या देशांत करून हिंदुस्थानास त्या बाबतींत स्वावलंबी व स्वयंपूर्ण होतां येण्यास त्या त्या उत्पादनांचे प्रचंड कारखाने उभारणें जरूर होतें.

( ६ ) हें कार्य बऱ्याच अंशानें हातीं येत असतां नूतन परिवर्तनांत आधुनिक संरक्षक व आक्रमक शस्त्रास्त्रें व यांत्रिक ज्ञान यांचें शिक्षण व अनुभव यांची जोड हिंदी लष्करास देणेंही भाग होतें व हें सर्व करीत असतां मधेंच प्रस्तुत युद्धास प्रारंभ झाला व त्यामुळें युरोपांत पश्चिम रणक्षेत्रांत चाललेल्या घनघोर प्रसंगासच साहजिक प्राधान्य मिळालें.

( ७ ) जर्मनी व इटलीनें ब्रिटिश कॉमनवेल्थला जोरदार धक्का देण्यास प्रारंभ केला असून त्यांत त्यांस यश येणें शक्य नाहीं. ब्रिटिश आइल्स (Great Britain) जिंकण्याचें काम मागें पडत चाललें असून ज्यांस जिंकावयाची हिटलरची मोठी महत्वाकांक्षा होती, तेच लोक त्यावर हल्ला करूं लागले आहेत.

( ८ ) या जर्मन प्रयत्नांस पीछेहाट मिळाल्यानें पुढेंमागें आपल्या भूमध्य समुद्रांतील सहायकास ( इटली ) मदत करून पूर्वेकडील देशांवरील आक्रमणास हिटलर प्रारंभ करण्याचा संभव आहे व यांत यशाचा वांटा आम्ही संरक्षक पद्धतीनें लढत असतां मागेंपुढें डोलत राहिला तरी युद्धदुःखें हिंदुस्थानपासून दूरच राहतील.

( ९ ) आरंभीं व शेवटास यश प्राप्त होण्यास शत्रूच्या शस्त्रसुसज्ज व प्रचंड फौजांना टक्कर देण्यासाठीं आपणासही शस्त्रसंपूर्ण व शस्त्रज्ञानी प्रचंड फौजा ठेवणें अवश्य आहे.

(१०) सद्य:स्थितींतल्या यांत्रिक युद्धांत नुसती वीरवृत्ति व संख्याबल कामीं येणार नाहीं. रणक्षेत्रावर जाणाऱ्या सैन्यांतील सैनिक हुषार, शस्त्रास्त्र-सुसज्ज व युद्धशिक्षणांत पारंगत असे तयार झालेले असावेत व आक्रमक आणि संरक्षक कार्यांत ज्यांच्या अंगीं धैर्य व सहनशक्ति अमोघ असेल असे लोक तयार असतील तरच यश मिळेल व आपली सुरक्षितता टिकूं शकेल.

याप्रमाणें फ्रान्सच्या शरणागतीमुळें इंग्लंडच्या साम्राज्यावरील संकटाची कल्पना देऊन हिंदुस्थानानें या कामीं काय केलें याचें वर्णन करून सर्वांनीं तनमनधनें करून मदत केल्यास खात्रीपूर्वक आक्रमकांस पराभूत करतां येईल व तसें होणारच असा निर्वाळा दिला आहे.

नाझी आणि फॅसिस्ट व टोकियो संघटनेंत जगावर आपत्ति आहे यांत शंका नाहीं व त्यास तोंड देण्यास सर्वांनीं कंबर कसून लढावयास पाहिजे हेंही खरें. पण त्यासाठीं लागणारी तयारी यापूर्वी आधींच करून ठेवावयास पाहिजे होती व ही तयारी करण्यासाठीं प्रथमत: इंग्लंडनें हिंदुस्थानवर पूर्ण विश्वास टाकावयास पाहिजे होता. पूर्ण विश्वास टाकावयाचा म्हणजे मध्यवर्ती सत्तेंत राष्ट्रीय सरकार तयार करून त्याचे हातीं सत्ता द्यावयास पाहिजे. लोकप्रतिनिधींतूनच एक कार्यकारी मंडळ ठरवून त्याचे करवीं कार्य करून घेण्यास प्रारंभ करावयास पाहिजे. यांत कामें सुरळितपणें पार न पडतां नित्यकर्मांत कटकटी पुढें होऊन कार्यांत खंड पडला असता अशी भीति वाटण्याचें कारण खरोखर नको होतें. संकटकाळांत हिंदी प्रतिनिधि बेगुमानपणें वागले असते असं म्हणणें बरोबर नाहीं. जगतावर असलेल्या व त्यामुळें आपल्यावरही असलेल्या संकटाची जाणीव सर्वांस आहे. या ठिकाणीं प्रश्न एकच होता तो म्हणजे हिंदवासीयांवर पूर्ण विश्वास टाकण्याचा. भारतमंत्री अमेरी यांच्या भाषणांत याचा थोडा ओझरता खुलासा आहे. त्याकडे पाहिलें म्हणजे अजूनही हिंदवासीयांवर विश्वास नाहीं हें स्पष्ट होतें. भारतमंत्री म्हणतात:—

"I would again point out that to attempt to set up at this moment an Executive Council composed of ministers responsible to any one else, but the Viceroy would at once raise all the constitutional problems which are yet unsettled."

" यावेळीं व्हाइसरॉयला जबाबदार नसून इतरांस ( मध्यवर्ती कायदेमंडळ ) जबाबदार राहणारें मंत्रिमंडळ ( Executive Council ) स्थापन केल्यास घटनात्मक विषयांतून निघणाऱ्या व अजून पुरतेपणीं न ठरलेल्या गोष्टींच्या अडचणी ताडकन उभ्या राहतील." याचप्रमाणें मध्यवर्ती सत्तेच्या जागीं राष्ट्रीय सरकार स्थापन करावें या कॉंग्रेसच्या मागणीसंबंधीं बोलतांनाही हीच साशंकवृत्ति ठळकपणानें दिसत आहे. व या सर्वांचा एकच अर्थ होतो व तो हा कीं वरून कितीही शब्दावडंबर माजवलें तरी हातची सत्ता जाऊं न देण्याचा या ब्रिटिश मुत्सद्यांचा मानस आहे व या स्थितींत हिंदी लोकांनीं तरी कोणत्या ब्रिटिश वचनावर विश्वास ठेवावयाचा. मागील सर्व गोष्टींचा विचार सोडून दिला तरी अजूनही " फोडा आणि झोडा " ही नीति या ना त्याप्रकारें चालूच आहे व त्यास वरून उपयुक्तता व सद्यःस्थिति हीं कारणें दाखवण्यांत येत आहेत. हें हिन्दी फौज वाढविण्याचे बाबतींतील प्रश्नोत्तरांवरून सहज दिसून येईल.

## हिंदी फौजांची एक लक्षाची वाढ

युरोपांतील युद्धास सहा महिने झाल्यानंतर हिंदुस्थानी फौजेंत एक लक्ष अधिकीची भरती करावयाची, हंगामी सेनाधिकारी हिंदी नेमावयाचे, व लष्कराच्या सर्व विभागांत हिन्दी लोकांस खुल्या दिलानें घ्यावयाचें अशी घोषणा सर रॉबर्ट कॅसेल्स भारत सरसेनापती यांनीं केली. त्यासंबंधीं माहिती ५ नोव्हेंबरला हिंदुस्थान सरकारचे फडणीस सर रेजमन यांनीं नुकतीच दिली. तिच्यांतील सारांश असाः—

सैन्यास आवश्यक असणाऱ्या गोष्टींसाठीं हिंदुस्थानास युनायटेड किंग्डम व इतर बाहेरील देशांवर अवलंबित राहावें लागे व त्यासाठीं या गोष्टी हिंदुस्थानांत उत्पन्न करण्याचे कारखान्यांची वाढ करणें जरूर होतें. हिंदी कारखान्यांची शस्त्रवाढ आणि परदेश व इंग्लंड मधून येणाऱ्या जिनसांच्या पुरवठ्यानुरूप हिंदी सैन्याची वाढ करतां आली. सध्यां अर्धा मिलियन ( ५ लक्ष ) सैन्यवाढ शक्य तितक्या अल्प काळांत करावयाचा उपोद्घात केला असून आधुनिक पद्धतीचीं शस्त्रास्त्रें पुरवलेलें व लष्कराच्या सर्व शाखोपशाखांत शिक्षण घेऊन सज्ज असलेलें लष्कर उभारावयाचा संकल्प असून हें संपतांच जरूर पडल्यास अधिकीची वाढ कशी करावयाची हें हातीं घेतां येईल. आर्मंड फाइ-

टिंग व्हेइकल स्कूल ( लढाऊ चिलखती वाहतुक शाळा ) मध्यें १९३९ मध्यें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पांचपट अधिक विद्यार्थी आज शिक्षण घेत असून त्यांतील तीन चतुर्थांश हिंदी लोक आहेत. संकेतशाळांतून ( Signal ) तिप्पट वाढ केली आहे. नवीन सेनाधिकारी शिक्षणसंस्था उघडल्या असून ह्यांतून वर्षाला ५००० ऑफिसर्स तयार होण्याची शक्यता आहे. यांत्रिक रणगाड्या चालवणें व शस्त्रसुसज्जतेनें लढवणें या शिक्षण-विभागांची वाढ करण्यांत आली असून यांत्रिक घोडदळ व तोफखाना यांतील शिक्षण घेणारे लोक वगळूनही इतर यांत्रिक गाड्या हांकण्याचें शिक्षण घेतलेल्या लोकांची संख्या १९३९ च्या सोळा पट अधिक वाढविली आहे. सॅपर्स अँड मायनर्स वर्गांची वाढ याच प्रमाणांत वाढविली आहे.

लष्करी शिक्षण व शस्त्रपुरवठा जितका सुलभतेनें मिळाला त्या प्रमाणांत फौज वाढविण्यांत आली आहे. हिंदुस्थानच्या व मध्य एशियांतील सरहद्दीमध्यें ६०,००० हिंदी फौज पाठविली असून सर्व सैनिक विभागांत लष्करी शिक्षण घेऊन सुसज्ज असलेले असे १,००,००० हिंदी लोक सज्ज झाले आहेत. आधुनिक सैन्यांत अनेक नवीन तऱ्हा शिरल्यामुळें लष्करी संघटनेचें कार्य अत्यंत गुंतागुंतीचें झालें आहे. विशिष्ट तज्ज्ञ मदतगार पोटशाखांची वाढ लष्करांत पूर्ण झाल्याशिवाय आधुनिक सैन्यास दंड थोपटून रणक्षेत्रावर उभें राहतां येत नाहीं व या पोटशाखा म्हणजे रेल्वे उभारणी संस्था, रेल्वे चालविणें, एंजिनिअरिंग वर्कशॉप, तळावरील पुरवठा कोठार, क्षेत्र पहाणारीं दलें, पूलउभारणी दल, ऑर्डनान्स कारखानेदल आणि इतर अशींच अनेक कामें करणाऱ्या संस्था. आज यांत्रिक वाहतुक साधनांची भरमसाट वाढ झाली असून शिवाय अधिकीच्या ८५ तुकड्या करूं घातल्या आहेत. वैद्यकीय शाखा फार मोठ्या प्रमाणांत वाढविली असून १९ जनरल हॉस्पिटल्स मध्यें एकूण २९० विभाग पाडले आहेत. याशिवाय जखमी शिपायांस रणक्षेत्रापासून परत आणणें, फील्डॲम्ब्युलन्सेस, ॲम्ब्युलन्स-रेल्वे गाड्या व हॉस्पिटल शिप्स सुरू केलीं आहेत.

आरमाराची वाढ झपाट्यानें करण्यांत येत आहे व मागील वर्षीं स्थानिक समुद्रसंरक्षणाचें धोरण शांतता, कालानुसारच होतें, परंतु आतां त्यांत माइन स्वीपर्स व पाणबुड्या प्रतिकारक बोटींची वाढ केली आहे. विलायतेंत तयार होत असलेल्या अनेक स्लूपबोटी थोडक्याच महिन्यांत हिंदुस्थानांत येऊन

पोंचतील. याबरोबरच नाविक सैनिक (Rating), ऑफिसर्स व वॉरन्ट ऑफिसर्सहि वाढवले असून या बोटींच्या तरतुदीसाठीं समुद्रकिनाऱ्यावरील शक्य ती जागा अडवण्यांत येत आहे.

वैमानिक दल वाढविण्याची खटपट जोराची सुरू असून जितकीं विमानें मिळणें शक्य असेल तितकीं कामीं आणतां यावीं म्हणून त्या मानानें वैमानिक शिक्षित लोक भरती करणें सुरू आहे. हिंदुस्थानांतील वैमानिक दला( R.A.F.) ची मदतनीस फौज म्हणून ३०० पायलटस व २००० यंत्रकलाप्रवीण लोक शिक्षण घेत आहेत. या दलांत अधिकारी होणाऱ्या लोकांस शिक्षण देणाऱ्या संस्था काढल्या असून त्यांत ५० माणसांस जमिनीवरील व अंतरिक्षांतील प्राथमिक शिक्षण देऊन तयार करतां येईल. याचप्रमाणें यांत्रिक वाहतुकी शिक्षण देण्यासाठीं ३५० हिंदी लोकांची एकाच वेळीं शिक्षणाची सोय केली आहे.

या सर्व सैन्यांत लागणारा यंत्रांचा पुरवठाही वाढवण्यांत आला असून लष्करोपयोगी मोटारी पूर्वी ५००० होत्या त्या जागीं आज प्रत्यक्ष नोकरींत आलेल्या व लवकरच येणाऱ्या अशा मिळून ३०००० मोटारी असून पुढच्या वर्षीं ही संख्या याच्या दुपटीवर जाईल. बंदुकी, गोळे, गोळ्या व इतर शस्त्रास्त्रें हिंदुस्थानांत तयार होत असून यांचा उपयोग हिंदुस्थानासच होत नसून त्यांपैकीं बराचसा माल बाहेरील फौजांसही पाठवितां येईल इतका तयार होत आहे. १०००००००० बंदुकीच्या लहान गोळ्या हिंदुस्थानाबाहेर पाठवितां आल्या व शिवाय ४००००० गोळ्या मोठ्या बंदुकीच्या पाठविल्या गेल्या. १½ दशलक्ष बूट, १½ मिलियन ब्लँकेटस, १ कोटी यार्ड खाकी ड्रिल, ५ लक्ष सुती शर्ट व २५ लक्ष पायमोजे जोड्या पाठविल्या गेल्या.

वर सांगितलेल्या एक लक्ष नवीन रिक्रूटभरतींत प्रांतवारी व वर्गवारी प्रमाण व अधिकाऱ्यांचें प्रमाण पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

| प्रांत | संख्या (रिक्रुट) |
|---|---|
| पंजाब | ४८००० |
| संयुक्तप्रांत | १२००० |
| मद्रास | १०००० |
| मुंबई | ७५०० |
| राजपुताना व मध्यहिंदुस्थान | ५३५० |
| नेपाळ | ३३०० |

यांत पंजाबी मुसलमानांची संख्या शेंकडा २५ टक्के असून बाकीच्या ७५ टक्के रिकुटांत इतर जमातींची संख्या अशी:--

| जात | संख्या |
|---|---|
| शीख | ११६०० |
| मराठे | ५००० |
| जाठ | ४५०० |
| रजपुत | ४००० |
| डोग्रा | ४४०० |
| इतर हिंदू | १५००० |

यांवरील अधिकाऱ्यांच्या संख्येमध्यें युरोपीय १०५० असून हिंदी ९४६ आहेत. तात्पुरते कमिशनें मिळालेले ३०० अधिकाऱ्यांत प्रांतवारी वांटणी पंजाब ६७, मुंबई ५०, युक्तप्रांत ४४, बंगाल बहार आसाम मिळून ४३, दिल्लीप्रांत २१ व मद्रास २९ याप्रमाणें केली आहे. या अधिकाऱ्यांची शिक्षण-सोय डेहराडून व महू येथें केली आहे.

याच वेळीं इंग्लंडमध्यें गृहसंरक्षक ( Home Guard ) फौजेंत १७००००० फौजेची वाढ केली आहे.

आतां याप्रमाणें हिंदुस्थानच्या फौजेच्या वाढीचें प्रमाण कितपत उपयोगी आहे याचा विचार करावयास पाहिजे. याबद्दल दिल्ली असेंब्लींतील वादविवादाचे प्रसंगीं भाषण करतांना युरोपीय सभासद सर हेन्री गिडने काय म्हणतात तें पाहूं. " इतर राष्ट्रांच्या बरोबरीनें पाहतां हिंदुस्थानांत २०००००० सैन्य आज सुसज्ज तयार असावयास पाहिजे होतें. परंतु आज हिंदुस्थान राजनिष्ठ असला तरी तो दुर्बळ असून त्यास प्रत्यक्ष युद्धक्षेत्रांत भाग न घेतां प्रेक्षकाचें काम करावें लागत आहे. आम्हाला आमची व्यापारी जहाजें, आमचें आरमार, व वैमानिक दल असतें तर इंग्लंडला प्राणावरील संकटांतही आपल्या संरक्षक फौजांस थोडेसे रोडावून इजिप्त, ग्रीस व इतर मध्य आशियांतील लष्करी भागांवर इंग्रजी सैन्य पाठवावें लागत आहे त्याची गरज पडली नसती. हेंच काम हिंदुस्थाननें उत्तम रीतीनें पार पाडलें असतें. यापुढें तरी मागील चुकांची पुनरावृत्ति सरकारनें करूं नये म्हणून ही टीका आहे व आशा आहे कीं, इंग्रज

लोकांनीं यापुढें हिंदी लोकांवर विश्वास टाकावयास शिकावें व ते तसा विश्वास ठेवतीलच." ( टाइम्स ऑफ इंडिया २०–११–४० )

आजच्या परिस्थितीकडे पाहतां सर्व लोकांचें लक्ष एकाच गोष्टीकडे असावयास पाहिजे व ती म्हणजे हिंदुस्थानचें संरक्षण. युद्धाची आग भडकन भडकत कुठवर जाईल याचा नियम नाहीं. परंतु हिंदुस्थान सरकारच्या प्रयत्नाकडे पाहिलें म्हणजे ही सैन्यवाढ दर्यामें खसखस अशीच ठरणार. आज सैन्यांत अधिकींचे हंगामी अधिकारी हिन्दी घेण्यांत येत आहेत त्यांना यापुढें युद्धोत्तर कालांत पर्मनंट करण्यांत येईल कीं नाहीं याची वानवाच आहे. सैन्यांत विशिष्ट जमातीच कां घेतल्या जातात व बाकीच्या कां घेतल्या जात नाहींत याबद्धल मध्यप्रांतांतील असेंब्ली सभासद गोविंदराव देशमुख यांनीं कांहीं पत्रें लिहिलीं व माजी पंतप्रधान डॉ. खरे यांनीं गव्हर्नरकडे ब्राह्मणवर्गांस लष्करांत भरती करण्यांत अडथळे उत्पन्न होतात याबद्धल तक्रार केल्यावर एक कम्युनिक निघालें तें टाइम्स ऑफ इंडियांत प्रसिद्ध झालें होतें. त्यांत एका कंपनींतील शिपायांस जेवण एकाच जागीं केलें जातें व त्यांत जातीय निर्बंध पाळणें शक्य नसतें म्हणून ब्राह्मण कंपनी पुण्याकडे वेगळी काढायची आतां ठरलें आहे अशा पद्धतींचें कारण पुढें दिलें होतें. व रिक्रुटमेंटींत मध्यप्रांतांतील लोकसंख्येपैकीं शेंकडा ३ ते ३·५ च लोकांस म्हणजे फार कमी लोकांस कां घेण्यांत आलें या प्रश्नास मागील युद्धांत ज्या जमाती युद्धोपयोगी ठरल्या त्यांस प्राधान्य सहजच देण्यांत येतें असें सांगण्यांत आलें.

बॅरिस्टर गोविंदराव देशमुख यांचे प्रश्नास डिफेन्स सेक्रेटरींनीं ता. २२–२३ नोव्हेंबर ४० ला, तसेंच लो. ना. बापूजी अणे यांचे प्रश्नास दिलेल्या उत्तराकडे पाहतां आजही हिंदी सैन्याचे भरतीमध्येंही जुनें तत्त्व आवड ( Preference ) हेंच चालू आहे हें सहज दिसतें. १९३९ मध्यें हिंदी आरमारांत २३६९ रेटिंग्ज, ९९ वॉरंट ऑफिसर्स व १८९ ऑफिसर्स ही संख्या असून यांत एकूण हिंदु १८६ व मुसलमान १८१९ होते. आजच्या १९४० च्या सप्टेंबरमध्यें असणाऱ्या आरमारांत शेंकडा ७ हिंदु असून ६९ मुसलमान आहेत असेंही डिफेन्स सेक्रेटरींनीं सांगितलें. यापैकीं मुंबई प्रांतांतून फक्त ७७१ असून सर्वांत अधिक शिपाई पंजाबांतून घेण्यांत आले असेंही सांगितलें व यावर हिंदु या विभागांत जायला खुषी नव्हते म्हणूनच त्यांची संख्या कमी असून त्यांत

सरकारी धोरण हें नाहीं असेंहि सांगण्यांत आलें. परंतु त्याबरोबरच आरमारांत शिरणारास उर्दू भाषा यावयास पाहिजे अशी अट असल्यानें पूर्वीचे दर्यावर्दी महाराष्ट्रीय किंवा इतर लोकांस आरमारांत भरती होण्यांत अडथळे होतात हें मात्र सांगावयाचें सोडलें. या सर्व गोष्टींचा विचार करतां आजहि लष्करी इंग्रजी अधिकारी हिंदी लोकांपैकीं बहुसंख्य हिंदूंकडे साशंकतेनेंच पाहतात, असेंच प्रत्ययास येतें. असो.

आज अशा संकटकालींही हे भेदभाव राहावे हें देशाचें खरोखरीच दुर्दैव होय. आज निःपक्षपात बुद्धीनें पाहूं गेल्यास वस्तुतः सैन्यांतील सर्व विभागांत शिरण्याइतके मनुष्यबलाचा कच्चा माल हिंदुस्थानांत तयार आहे पण मग त्यांत हा उच्च, हा नीच, हा मध्यम हे भेद बाह्यांगावरून करीत न बसतां सर्वांस सारखी सोय असावयास पाहिजे, व मग त्यांत हा पंजाबी, हा मराठा, हा ब्राह्मण, हा हरिजन हे भेद कामाचे नाहींत. सरकारी नोकऱ्यांत विशिष्ट जाती पुढारलेल्या व त्यांचें प्रमाण बाह्य भरती असल्यानें यापुढें मागासलेल्या व कमी प्रमाणांत नोकरींत असलेल्या लोकांस नाहीं का अधिक भरती करण्यांत येत ? मग हेंच तत्त्व लष्करातील भरतींत कां मान्य करण्यांत येत नाहीं ? प्रत्येक प्रांतानें आपापली संरक्षक जबाबदारी उचललीच पाहिजे व तसे प्रयत्न झाले पाहिजेत. मराठे लोकांनीं ते ठेंगणे म्हणून शौर्यांत किंवा लष्करी कष्टांत कांहीं माघार घेतली आहे कां ? मग सबंध एक लक्ष नवीन वाढीच्या सैन्यांत मराठे फक्त ५००० च कां ! भंडारी व कोळीवर्ग दर्यावर्दीपणांत शिवकालांत पुढारलेला असतां तो आज मागें कां पडावा ? हिंदुस्थानास युद्धोत्तर कालांत वसाहती अथवा संपूर्ण स्वातंत्र्य लोकांच्या एक धोरणानुरूप मिळावयाचें हें खरें असेल तर आजच या गोष्टीचा पाया लष्करी किंवा प्रांतिक व मध्यवर्ती नोकऱ्यांतून व अधिकारांतून घालावयास नको काय ? प्रॉव्हिन्शिअल व मध्यवर्ती असेंब्लीमध्यें एकत्र बसतां येऊन आज मतमतांतरें असूनहि सामाजिक व्यवहार चालले नाहींत कां ! मग राज्यशकट हांकण्यास एकत्र बसलों तर हे वरवर दिसणारे भेद पार नाहींसे नाहीं कां होणार ? पण हे नाहींसे व्हावे अशी खरोखरीच सर्वांची व विशेषतः सरकारची इच्छा आहे का ? मनःपूर्वक इच्छा सर्वांनीं सुखी रहावें अशी असेल तर तशी भूमिका उत्पन्न होण्याचीं साधनें निर्माण करण्यांत बुद्धिसर्वस्व खर्च करा, फळ आल्याशिवाय राहणार नाहीं. हिंदुस्थान खरोखरीचा

भागीदार असता तर दोघांचेंही हित सारख्या प्रमाणांत इंग्रजांनीं पाहावयास पाहिजे होतें. परंतु दे. भ. भुलाभाई देसाई यांनीं असेंब्लींतील भाषणाचे वेळीं म्हटल्याप्रमाणें व वर्किंग कमिटीनें म्हटल्याप्रमाणें "युद्ध लोकशाहीचे रक्षणार्थ आहे हा मुद्दा असेल तर हिंदुस्थान या प्रश्नाकडे लक्ष देण्यास तयार आहे. इंग्लंड या तत्त्वाकरितां झगडत असेल तर वसाहतींतील साम्राज्यवादास थांबवा व हिंदुस्थानला स्वयंनिर्णयाचा हक्क द्या." याबद्दल हिंदुस्थानचे लोकच हांकाटी करीत आहेत असें नसून इंग्लंडचे लोकहि याच तत्त्वाचा पुरस्कार करीत आहेत. ब्रिटनला हिंदुस्थानची मदत खरोखरीच ( न्याय्य ) पाहिजे असेल तर हिंदुस्थानला न्याय्य हक्क व बरोबरीचा दर्जा द्यावयास पाहिजे, व त्याचें स्वरूप आजच नॅशनल गव्हर्मेंट स्थापन करून ठरवावें. पण त्या गोष्टीचा उल्लेख नसून भारतमंत्री व व्हाइसरॉय लॉर्ड लिन्‌लिथगो यांनीं आपले जुनेच मुद्दे पुढे करून "दार उघडें आहे यायचें असेल तर या" असेंच जवळपास म्हटलें आहे. आजचे हिंदुस्थानचे वाद हिंदुस्थान अखंड राहून त्यास युद्धोत्तरवसाहतीचें स्वराज्य मिळेल व त्यासाठीं सर्वांनीं एकत्र बसावें असें म्हटल्यशिवाय मिटणार नाहीत. हिंदुस्थानांत बहुमत कॉंग्रेस, मुस्लीम लीग, हिंदुमहासभा, शिख सभा, हिंदी संस्थानें, आर्यन लीग, अहरार व उदारमतवादी व इतर अनेक पक्षोपपक्षांचें अस्तित्व आहे व या सर्वांस सगळ्यांना आपापल्या संख्याबलाप्रमाणें सत्ता मिळणार आहे व ती सत्ता स्वातंत्र्य कायद्यांत येईल व त्यांत भाऊबंदकी नाहीं असें स्पष्ट सांगतांच भांडणें मिटतील. पण तुम्ही आधीं कुणी कुणी, किती किती वांटणी करावयाची तें ठरवून एकमत करा असें म्हटलें कीं, एकी होणें शक्यच नाहीं. स्वतंत्र हिंदुस्थान स्वावलंबी, स्वयंपूर्ण होऊन स्वयंनिर्णय करूं लागला तर त्यास खरे मित्रांस सोडण्याचें कारण राहणार नाहीं; कारण जगतांत एकटा कोणीच जगूं शकत नाहीं मग हिंदुस्थान तरी एकटा कसा राहील ?

असा हिंदुस्थान, स्वतंत्र हिंदुस्थान, जगतांत मानानें राहूं इच्छील तर त्यास राष्ट्रीय फौज निर्माण केल्याशिवाय गति नाहीं व लष्करी शिक्षणानें अंगीं शिस्त बाणते असें म्हणतात. शिस्तीनें जबाबदारी येते व जबाबदारी म्हणजेच स्वातंत्र्य ( Liberty is Responsibility ). सर्व हिंदी नागरिक लष्करी शिक्षणांत तरबेज झाल्यास त्यांस शिस्तींत राहणें आवडूं लागेल. लष्करी तज्ज्ञांच्या मतें लोकसंख्येचा $\frac{1}{७}$ भाग युद्धांत भाग घेण्यास समर्थ असतो.

मग आज हिंदुस्थानांत या मानानें ५ कोट लोक तयार होण्यास हरकत नाहीं. इंग्लंडनें गेल्या वर्षांत स्वतःचें ५ लक्षांचें सैन्य ३० लक्षावर आणून १९४१-४२ मध्यें त्यांत अधिक प्रचंड वाढ व्हावयाची आहे. मग इंग्लंडच्या ७-८ पटीनें मोठ्या शरीराच्या हिंदुस्थानास त्या मानानें कमींत कमी २-२॥ कोटी सैन्य याच दोन वर्षांत हिंदुस्थानच्या संरक्षणार्थ तयार करावयास नको का ! हें खरें असेल तर हिंदुस्थान संरक्षणक्षम होण्यास अजून किती तरी अधिक तयारी पाहिजे व त्यासाठीं सर्वांस एकत्र बसवलें पाहिजे, पण इंग्लंड हें करील का ! त्यानें तें करावें असें इंग्लंडचेच देशबांधव मँचेस्टर गार्डियन व इतर उदारमतवादी व मजूरपक्षपत्रें सांगत आहेत. आज प्रत्यक्ष संकटांत सांपडलें असतां अमेरिकेला अटलांटिक महासागरांतील इंग्लिश बेटें १०० वर्षांकरतां युद्धतळ बांधण्याकरतां देतांना इंग्लंडच्या मूळ घटना कायद्यांत युद्धकालींहि फेरबदल घडवून आणतां येतो व इतर ब्रिटिश घटनाकायद्यांत नसलेल्या गोष्टींतहि इंग्लंडच्या हितासाठीं युद्धाच्या भयंकर आपत्तींत बदल करतां येतो मग हिंदुस्थानच्या घटनाकायद्यांतील गोष्टींच्या वेळीं मात्र या अडचणी पुढें कां करण्यांत येतात ? यावरून इंग्लंडला आपली हिंदुस्थानवरील पकड सोडण्याची इच्छा नाहीं असें म्हटलें तर राग कां यावा ! हिंदुस्थानला स्वातंत्र्य पचणार नाहीं असें कां समजावें ! ईश्वर करो, सर्वांस सुबुद्धि सुचो, व हिंदुस्थान अखंड राहो व त्यांत सर्व जमातींच्या नागरिकांनीं भाग घेऊन हिंदुस्थानचे रक्षणांत सर्वांचें सहाय होवो व त्याचे मदतीनें जगतांत शांतता लवकर प्रस्थापित होवो.



# हिंदुस्थाना तूं कुठें !

## सूचि

( प्रथम संदर्भ देऊन पुढें पृष्ठांक दिले आहेत. )